## गुन्हेगार जातींच्या वसाहतीसंबंधीं

सुमारें २५ वर्षांपूर्वीं ब्रिटिश सरकारनें (क्रिमिनल् ट्राइब्ज सेटल्मेंट्स् ॲक्ट) गुन्हेगार जातींच्या वसाहतींचा कायदा केला. चोरी हेंच उपजीविकेचें साधन असणाऱ्या कित्येक वन्य व भटक्या जाती होत्या. त्यांना या कायद्यानें 'गुन्हेगार जाती' म्हणून जाहीर केलें.

वाहिमी किंवा प्रत्यक्ष गुन्हा करणाऱ्या या गुन्हेगार जातींच्या लोकांचीं सर्व कुटुंबेंच सरकारनें निरनिराळ्या ठिकाणीं वस्तीला आणलीं. ही वस्ती गांवापासून दूर असे. त्यांवर अंमल प्रत्यक्ष सरकारचा असे किंवा कित्येक मोठमोठ्या वसाहती मिशनऱ्यांकडे चालवावयास दिल्या गेल्या होत्या. कोणाकडेही अंमल असला तरी वसाहतींतील गुन्हेगार जातींना तोच सरकारी कायदा लागू असे.

प्रत्यक्ष गुन्हा केलेल्या अगर वाहिमी लोकांचीं कुटुंबें त्यांच्या अपराधाप्रमाणें एकेरी अगर दुहेरी कांटेरी तारांच्या कुंपणांत ठेवलीं जात. तेथें त्यांच्या मुलांना शाळेची सक्ति असावी, मोठ्यांना नागरी राहणीचें शिक्षण देण्याचा प्रयत्न केला जावा आणि न्याय्य उपजीविकेचीं साधनें मिळवून दिलीं जावीं हा कायद्याचा मुख्य हेतु असे. चोरीला प्रवृत्त होणाऱ्या मनांची धाटणी बदलली जावी, हा कायद्याचा खरा हेतु होता.

वाहिमी व गुन्हेगार माणसांना पोलिसकडे एकदां-दोनदां तीनदां ज्याप्रमाणें बंधन घातलें असेल त्याप्रमाणें हजेरी देण्याची सक्ति असे. त्यांना स्थलांतर करण्यास सरकारी पास मिळवावा लागे.

तारांच्या कुंपणांत राहणाऱ्या लोकांचें कांहीं विशिष्ट व प्रामाणिक आचरण दिसल्यास त्यांना तारांच्या कुंपणाबाहेर वस्ती करतां येई. अशा रीतीनें बाहेर राहणाऱ्या लोकांच्या वसाहतीला 'स्वतंत्र वसाहत'—फ्री कॉलनी म्हटलें जाई.

हा पंचवीस वर्षांपूर्वींचा कायदा कॉंग्रेस सरकारनें नुकताच मागें घेतला आहे व अट्टल गुन्हेगारांसंबंधीं नि[illegible] [illegible] केला आहे.

# शुद्धिपत्र

कांहीं महत्त्वाच्या दुरुस्त्याः—

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १४ | भसूर | भेसूर |
| १८ | ५ | मिळणार | मिळनार |
| ३९ | २७ | खडा | खडी |
| ५४ | ५ | देईन | देईल |
| ५४ | १९ | वर्षाचं | वर्साचं |
| ५५ | १७ | करा | कराल |
| ५७ | ९ | महाराच्या | मांगाच्या |
| ५७ | १२ | महार | मांग |
| ६० | ७ | कड | कढ |
| ६१ | १५ | तशीं | तशींच |
| ६३ | ११ | विचार | विखार |
| ६८ | १५ | पण | पन |
| ६८ | १५ | करावयाची | करायाची |
| ६८ | १८ | पाहिजे | पायजे |
| ६८ | १८ | वेळीं | येळला |
| ६८ | १९ | होणार आहे. | होनार हाये. |
| ७१ | ७ | त्याला | त्यांना |
| ७३ ते ७५ सर्वत्र | | बन्या | वन्या |
| ८४ | ८ | वाटून | वाढवून |
| ८५ | ६ | चारही गिरणीच्या | गिरणीच्या चारही |
| ८७ | २४ | कीं | कींव |
| ८९ | १ | पण | ( हा शब्द नको ) |

१

पानवडच्या खोऱ्याभोंवतीं उंच टेकड्या होत्या. एका उंच टेकडीवर गगनवाडी शहरांतील माणसें फिरायला येत. टेकडीच्या एका बाजूला अनंत घरांचा व हवेल्यांचा पसारा पसरलेला आणि दुसऱ्या बाजूला ठेंगणीं, भुई-सरपटी दरिद्री पालें. टेकडीवरून हीं दोन्हीं दृश्यें मोठीं सुंदर दिसत. त्या भिकार पालांमध्यें शहरांत शोभणाऱ्या दोन तीन इमारती दिसत होत्या. त्या इमारतींचें सौंदर्य त्या भिकार पालांनीं वाढवलेंच होतें.

केवळ दूरतेनेंच ती वस्ती सुंदर दिसत होती. देहाची दूरता आणि अंतःकरणाचीही दूरता. ती होती म्हणून ठीक. नाहीं तर शेजारीं उठणाऱ्या तेथील आर्त आक्रंदनानें सारें जग रडायला लागलें असतें आणि भेसूर हंसण्यानें सारें जग हबकून पाहूं लागलें असतें. पण त्या टेकडीनें रयतेचीं आणि चोर-वस्तीचीं अंतःकरणे दुरावलीं होतीं. त्या दूरतेनें जवळजवळचीं रडणीं, हंसणीं, धुसफुसणीं, कण्हणीं, तळमळणीं जेथल्या तेथें रहात होतीं. त्या खोऱ्यांतून बथ्थड अंतःकरणाचे बदसूर उठत होते. कुत्र्यांचीं केंकाटणीं आणि मुलांचीं रडणीं त्यांत मिसळून एक कोलाहल जणुं भेसूर संगीताचें स्वरूप घेऊन वातावरणा-वर निनादे. टेकडीवर फिरायला येणारांना तो निनाद सुखाचा वाटत असे. खालीं त्या खोऱ्यांत अनंत जीव-जीवाणु वळवळत होते. आणि त्याला "सुंदर खोरें" म्हणून टेकडीवर उभे राहणारे लोक म्हणत. त्या सुंदर खोऱ्यांत पांढऱ्या स्वच्छ राहणीसाठीं धडपडणाऱ्या जगानें पापासारखी ओंवाळून टाकलेली मानवता धांपा टाकीत तळमळत पडली होती.

टेकडीच्या दुसऱ्या बाजूला स्टेशनवरून धूर ओकत आगगाड्या मधून मधून जात. आणि गगनवाडींतून पोहोरे भरभरून माणसें नेत—आणीत. गगनवाडींत हिंडणाऱ्या नवख्या माणसांना गगनवाडी हें गांव घाणेरडे कपडे घालून

अस्ताव्यस्त पसरणाऱ्या श्रीमंत मारवाड्यासारखें वाटलें असतें. तेथें सत्ता, श्रीमंती आणि गरिबी तिघीच राहात होत्या. एकीकडे पार्शी, युरोपियन हा सत्ताधीश वर्ग, गुजर, लिंगायत, मारवाडी हा श्रीमंत वर्ग तर दुसरीकडे कंगाल मजूरवर्ग. मूठभर पांढरपेशांचें अस्तित्वही तेथें जाणवत नव्हतें. एकीकडे तलम कपड्यांचे, मोठमोठ्या हवेल्यांत राहणारे, मोटारी उडवणारे लक्ष्मीपुत्र, तर एकीकडे भुकेले, जरत्कारू देहांचा बाजार मांडणारे, कळकट फाटकीं लक्तरें पांघरलेले, फाटक्या झोपडींत राहाणारे, रस्त्यावर विसावणारे, देहाची अब्रू घालवीत हिंडणारे कंगाल. एकाची श्रीमंतीची मिजास वाढविण्यासाठीं जणुं दुसऱ्यांचा जन्म आणि दुसऱ्यांना पायांनीं लाथाडण्यासाठीं जणुं पहिल्यांचा जन्म असें तें गगनवाडीचें रूप कुणाच्याही लक्षांत येण्यासारखें होतें.

सकाळचे सहा वाजले कीं असंख्य कष्टाळू दरिद्रांना सामावून घेणाऱ्या गिरण्या भुकेनें जणुं आक्रंदून " या ऽ ऽ " म्हणून आपले बळी पोटांत घेत. आणि संध्याकाळी सहा वाजले कीं पुनः आक्रंदून माणसांचीं चिपर्टी बाहेर टाकीत. त्यावेळीं गगनवाडीच्या रस्त्यावर दारिद्र्याची पेवें फुटल्यासारखीं मजूर मंडळी बाहेर पडत आणि आपल्या खुराड्यांतील ममतेच्या आश्रयाकडे धांवत.

दिवस गिरणींत आणि रात्र खुराड्यांत घालवणारीं गगनवाडींतील हीं बहुसंख्य माणसें धनिकांच्या नजरेला पडत. पण धनिकांना त्यांच्या सुखदुःखांचें पापपुण्य नव्हतें. त्यांना या माणसांचा आपल्याशीं कांहीं संबंध आहे किंवा काय याचा विचार करण्याचीही गरज वाटत नव्हती.

पांढऱ्या स्वच्छ जातगंगेच्या प्रवाहाबरोबर अमंगल मानवतेचे प्रचंड प्रवाह वहात होते. कांहीं शहारांतल्या शहरांत आणि कांहीं पानवडच्या खोऱ्यांत. पण शहरांतील अमंगल मानवतेनेंही धिक्कारलेली, अवमानलेली, नजरेबाहेर टाकलेली, अमंगल मानवता शहरापासून दूर, अगदीं दूर थंडीवाऱ्याबरोबर झगडत, उन्हानें करपत, पावसानें भिजत जीवनाचे शाप भोगीत पडली होती.

त्या वस्तीला पानवडची चोर-वस्ती म्हणून शहरांतील रयत ओळखी. आणि त्या बाजूला कधींही फिरकत नसे. पण पानवडच्या खोऱ्यांतील वस्ती पोट भरण्याच्या निमित्तानें गगनवाडीकडे धांवे. कोणी मोऱ्या उपसायला

तर कोणी खडी फोडायला, कोणी गिरणीला तर कुणी कांटक्याकुटक्या गोळा करण्याच्या निमित्तानें. पोटाचे भलेबुरे सारे मार्ग चोखाळायला संभावित माणसांप्रमाणें ती वस्ती रोज खोऱ्याबाहेर पडे. पोलिसांच्या नजरेखालीं. रांगा नि रांगा. कितीक स्त्रिया, कितीक पुरुष नि कितीक पोरें. ब्रह्मयानें माणसें निर्माण करतांना उरली सुरली ओंगळ माती चिवडून टाकलेली—जणुं रस्त्यानें जिवंतपणाचें नाटक करून जात होतीं. सुंदरता अवकळा घेऊन स्त्रीरूपानें धांवत होती. ओजस्विता आणि तेज हतबुद्ध होऊन पुरुषांच्या मातींत लुप्त झालें होतें. आणि विधात्याच्या मायेचा कर्जबाजारीपणा चव्हाट्यावर दाखवीत पोरें रानोमाळ हिंडत होतीं.

संध्याकाळ झाली कीं ते लोक माघारे फिरत—बडबडत, रडत, ओरडत.

● ● ●

## २

अतुल मिलचे मालक मथुरादास यांना आजपर्यंत औरस संतति नव्हती. इतक्या वर्षांनीं झाला तो मुलगा. त्याच्या बारशाचें जेवण म्हणून सारी गगनवाडी त्यांच्या घरीं जेवत होती. धुळींत फतकल मारून घोंघावणाऱ्या माशांना वारीत माणसें रस्त्यावर बसलीं होतीं. जवळच उकिरडा होता. मथुरादासांच्या घरांतून फेंकल्या जाणाऱ्या उष्ट्या पत्रावळी त्या उकिरड्यावर मधून मधून पडत होत्या. टाकलेल्या पत्रावळींवर माणसांची झुंबड पडत होती नि कुत्र्यांचीही. त्या झुंबडींत पत्रावळींचीं पानें फाटत. शीतही लाभणें कठीण होऊन बसे. त्यांतच भांडणें उबत. चेष्टामस्करीही चाले. माणसांना माणसें ढकलीत. कुत्र्यावर कुत्रीं तुटून पडत. सकाळीं सहा वाजल्यापासून संध्याकाळीं चार वाजेपर्यंत तीं सगळीं माणसें त्या उकिरड्याशेजारीं रेंगाळत होतीं. आमटीसाठीं पोचे आलेलीं टिनपाटें हातांत धरलेलीं मुलांच्या अगर स्वतःच्या पंचेंद्रियांच्या घाणीनें दरदरलेली अंगावरची लक्तरांची झोळी सारखी भिकेसाठीं पुढें धरलेली. घरांतून येणाऱ्या-

जाणाऱ्याला त्यांनीं विनवावें, " महाराज, वो बाईसाब, वाढा कीं गरिबाला दोन घांस."

" चल जा. चालती हो— "

" निघा. "

" हट जाव— "

पण तीं सारीं माणसें लोंचट हंसूं हंसत. हंसत, हटत, नि पुनः जमत. आंत पुण्यकर्म म्हणून पोटें सुटलेल्या ब्राह्मणांच्या पंक्तीवर पंक्ति उठत होत्या. ढेंकरा देत होत्या. बाहेर आंतडीं सुकलेल्या लोकांचे थवे आर्त स्वरानें ओरडत होते. आंत सुखवस्तु लोकांना चार चार आणे दक्षिणा ठेवली जात होती. बाहेर लाकूडफांटे उगारून लोक हाकलले जात होते. तीं लूत भरलेलीं कुत्रीं, चिंध्या पांघरलेलीं पोरें आणि माणसें. रस्त्यानें जाणाऱ्या-येणाऱ्याला ती एक घाणेरडी अडगळ वाटत होती. जाणारे-येणारे नाकाला पदर लावून जात. धान्यांतील कीड निवडतांना किळस वाटते, तशीच किळसवाणी दृष्टि त्या लोकांवर पडे.

आबाचीही नजर तेथें पडली; पण ती निराळ्या तऱ्हेनें. त्याचीं भावंडें कोणतीं तीं त्याला माहीतच नव्हतीं. आई ? तीही त्याला ओळखतां आली नसती. ती कुठें असेल ? बाप कुठें असेल ? म्हशी भादरायला ? सुरं वळायला ? कीं कुठें मेलेलीं ढोरं उचलायला ? रस्ते उकरायला कीं भीक मागायला ? तो शोधकपणें त्या उकिरड्यापाशीं जमलेल्या लोकांकडे पाहूं लागला.

त्यांच्यांतीलच तो एक. त्याची दृष्टि शोधकपणें तेथें विसांवली. लंगड्या, लुळ्या, पांगळ्या, आंधळ्या भावाबहिणींकडे पाहतांना अंतःकरणाला चटके बसतात. नजरेला शीण होतो. तोच शीण आबाच्या दृष्टीला आणि मनाला होत असावा. त्यांच्या त्या किळसवाण्या दारिद्र्यानें आबा ओशाळला होता. त्याचा शाळासोबती सोमदत्त त्याच्याबरोबर होता. तोही स्टेशनवरून आपल्या घराकडे जात होता. सोमदत्त कदाचित् नीटनेटक्या घरांतील नीटनेटक्या माणसांना भेटणार होता आणि आबाचीं आईबापें, बहिणी, भावंडें कदाचित् या उकिरड्याशींच सांपडलीं असतीं. लाजेनें सोमदत्ताचें सान्निध्य आबाला असह्य झालें.

" तूं जा. मी येईन तुला भेटायला केव्हां तरी." असें म्हणून तो एकदम थांबला.

सोमदत्तही घराच्या ओढीनें " बरं " म्हणून निघाला. आबा क्षणमात्र तेथेंच थबकला. उद्वेग, लाज, चीड, कानकुंडेपणा इ.नीं त्याचीं कानशिलें उडत होतीं. जणुं उष्ण वाफा निघताहेत असें त्याला वाटत होतें.

" चांगुणाबाई इथें आहे का ? " त्यानें विचारलें.

त्याच्या आईनें त्याला पाहिलें. आबानें किती वर्षांत आईला पाहिलें नव्हतें. आईनें किती वर्षांत त्याला पाहिलें नव्हतें. मनानें वात्सल्याची आणि मायेची जोपासना भरपूर केली होती. पण शरीरें ओळखणें कांहींसें कठीण झालें.

" अहं, आबासारखा आहे ? आबा ? खादीची टोपी, पांढरं चांगलं कपडं—त्याला इक्त चांगलं कपडं कुठून मिळत्याती ! "

पण ती भीत भीत जवळ आली. " आबा ! " तिच्या स्तनांच्या झोळ्या कमरेपर्यंत लोंबत होत्या. कमरेवरचें पोर वांकून पिण्याचा प्रयत्न करीत होतें. ती त्याची आई !

" आई ? "

चांगुणेच्या डोळ्यांना पाणी आलें. तिचें मन गोंधळलें. आबाचें मन गोंधळलें. चांगुणेच्या मांड्या शंभर तुकड्यांच्या लुगड्यानें कशाबशा झांकल्या होत्या.

" मी म्हनत्यें आता कवां येतोस नि कवां नाई. "

एकीकडे तिनें डोळ्याचें पाणी निपटलें. दुसऱ्या हाताचीं बोटें केसांतील लिखांच्या घरांवर नांगर फिरवूं लागलीं. चांगुणेला पुढें बोलतां येईना. आबाच्या नीटनेटक्या पोशाखाकडे, स्वच्छ शरीराकडे ती स्तिमितपणें पहात होती. नीटनेटके केस कापल्यानें त्याच्या चेहऱ्याला तरतरीतपणा, रुबाब आला होता. चांगुणेच्या जागत्या मायेला कसली तरी कातरता आली. याच आबाला बारा वर्षांपूर्वीं तिनें कवटाळून धरलें होतें. त्या तिच्या घाणीनें उबलेल्या पदरांत तोंड खुपसून रडतांना त्या घाणीची जाणीवही त्यावेळीं आबाला नव्हती. तेंच तेंच आईचें प्रेम आणि तेंच आईला नि घरच्या मंडळींना भेटण्याला उत्सुक असलेलें आबाचें मन. पण कसली तरी अदृश्य नि अभंग भिंत दोघांत उभी

असल्यासारखें त्याला वाटलें. तो जवळिकेसाठीं आला पण दुरून दुरून चालत होता.

आईच्या मागेंच एका घमेल्यांत बरेंचसें खरकटें गोळा करून, डोक्यावर घेऊन त्याची धाकटी बहीण आली.

" आयव, ह्ये बघ. भात, भाजी, काय काय तरी हाय. "

चांगुणेनें तिच्याकडे समाधानानें पाहिलें. त्या आठ वर्षांच्या पोरीनें ' हा कोण नवा बाबा आला आहे. ' म्हणून नजर टाकली. तिला कांहींच ओळख नव्हती. आबानेंही तिला ओळखलें नाहीं.

" ही येशी का ? "

" हां. तूं गेलास तवां चालत बी नव्हती. " दिवसांचें स्मरण न राहून चांगुणा म्हणाली.

" खूप गोरी आहे नाहीं येशी ? " आबा म्हणाला.

पण चांगुणानें नुसतें " हां " म्हटलें.

आबा विचार करीत होता, " ही येशी धुतली तर किती छान दिसेल ! "

" चालत व्हती कीं लई तुरतुर. येशी, वळखलंस का ग ? " येशी कांहींशी कुतूहलानें, कांहींशी भीतीनें पहात होती. " आबा, आबा करीत व्हतीस ना ? "

येशीच्या मनानें आबाचीं चित्रें निराळीं रेखाटलीं होतीं. तिला आपला आबा असा असेल असें कधींच वाटलें नाहीं. आतांही आबाबद्दल प्रेमापेक्षां भीतीच तिला वाटली. चांगुणेनें समाधानानें घमेल्यांतील अन्नाकडे पाहिलें. ' तें घमेलंभर अन्न, त्यांतला भात त्या दिवशीं तरी आबाला वाढायला पुरेल. आज किती वर्षांनीं आलाय. ती पुरवून पुरवून देईल. येशी, राया, अन् तीं बाकीचीं पोरं काय नेहमीचींच आहेत.' उघड्या घमेल्यावर कावळे मधून मधून टोंकी मारीत. त्यांच्या मुखीं पडायंच अन्न तें माणसांचे बनलेले पशु नेतात याची त्यांना चीड येत असावी. कितीदां हांकून दिलें तरी तेथल्या तेथेंच उडून ते पुनः घमेल्यावर बसत.

" हात मेल्यांनो, हाय तरी काय ? कितीदां हाकावं तरी पुना हैच. "

चांगुणेला मुलाशीं बोलतांना कावळ्यांचा होणारा अडथळा असह्य झाला. तिनें जोरानें म्हणून कावळ्यावर हात उगारला तो घमेल्याला लागला. येशीच्या

लहान हातांना डोक्यावरील पडतें घमेलें सांवरतां आलें नाहीं आणि तें सारें अन्न विचकटपणे खिदळत जमिनीवर पडलें.

" हा रांड, हात मोडलं का काय तरी ! " चांगुणेनें येशीला थप्पड दिली.

" तूंच तर ढकाललं अन् मालाच मारतीया. " येशीनें रस्त्यावरील अन्न भरायला सुरवात केली. कीड-मुंग्यांनीही तोंडभर कण उचलायला सुरवात केली.

" आई, कशाला तें रस्त्यांत पडलेलं अन्न उचलते आहेस ? "

" आं ? म्हंजे ? " चांगुणेला आश्चर्य वाटलें. ' मुलाला वेड तर नाहीं लागलं ? अन्न उचलायचं नाहीं तर काय ? इथंच टाकायचं ? इतकं अन्न ? अन्न ? '

आईच्या स्तंभित उद्गारांनीं आबा एकदम भानावर आला. तो कांहीं बोलला नाहीं. विषय बदलण्यासाठीं त्यानें बापाची चौकशी करायला सुरुवात केली.

" मुन्शीपाल्टींत हाय ना रस्ते झाडाया. त्यो देवबाप्पा पाहतोय जरा बऱ्या नजरेनं. ह्योच पहिला महिना. अजून एक दाम बी हातीं नाय. " आबाचें मन थिजत होतें.

तीं बोलत बोलत पानवडच्या खोऱ्यांत आलीं. कांटेरी तारेच्या कुंपणांत चोर जातींचीं शेंकडों पालें. त्यांवर पोलिस पहारा. आबाचें मन एकदम खचलें. इतके दिवस विसर पडलेल्या गोष्टी त्याच्यापुढें जिभा परजीत नाचूं लागल्या. तीं झोंपडीजवळ आलीं. सगळीं जातवालीं माणसें त्यांच्याभोंवतीं जमलीं. आबाला आनंद झाला. तीं कुतूहलानें डोकावून पहात. आबाला अभिमान वाटला, आणि 'दनाही. त्या वेदना मनानेही दुसऱ्यानें भोगायला कठीण. सुखाच्या पोटीं असह्य वेदना होत्या त्या.

आई–बाप–बहीण–भाऊ सगळ्यांना भेटणार, या आनंदांत असतांना, त्या सर्वांना केवळ गाढ मायेचे बंध याच गोड स्वरूपांत आबाचें मन पहात होतें. घाणेऱ्या गलिच्छ जागेंत गलिच्छ लक्तरांनीं झांकलेलीं अमंगल माणसें आई, बाप, भाऊ, बहीण म्हणून त्याच्यापुढे उभीं राहिल्यावर त्याचें मन भांबावलें. इतके दिवस त्याच्या मनानें पाहिलेलीं आई, बाप, बहीण, भाऊ जणुं त्याला सांपडलीं नाहीं.

निराळ्या जगांत राहून निराळ्या वातावरणांत स्वतःला गुंडाळणारा आबा मायेसाठीं धांवत आला. पण जणुं त्याच्या मायाबंधनांनीं त्याचें सत्त्व पहाण्या-साठीं हे अमंगल देह धारण केले होते. त्या मागें टाकून आलेल्या जगाची माया अजून त्याचा पाठपुरावा करीत होती. सुंदर स्वप्न भंगलें. पुनः तो त्या कर्दमांत आला. हो. त्याचींच तीं आई, बाप, बहीण, भाऊ. तीं लक्तरं? हो. तींच त्याचीं. त्यानें अंगावरील स्वच्छ कपड्यांकडे पाहिलें. झालें. हे कपडे फाटले, चिंध्या झाल्या, गेले, पुनः मिळवतां आले नाहींत, पुनः त्या मागें टाकलेल्या जगांत वावरतां आलें नाहीं कीं आबा इथलाच! याच चिखलांतला.

कुणाच्या तरी मर्जीनें तें जग मिळालें होतें. पण मिळालें तरी कसलें? पाऱ्याच्या बाटलींत बोट बुडवून कांहीं पारा नाहीं होत बोटाचा. कमळाचें पान कांही पाण्याच्या थेंबाला पोटांत घेणार नाहीं. आबाला तें स्पृश्यांचें जग सामावून घेणार नाहीं. मग हीच त्याचीं आई–बाप–बहीण–भाऊ. त्याचें अंतःकरण कापीत विचारांची धार फिरत होती.

त्याच्या आईनें प्रेमानें त्याला घमेल्यांतून जिलब्यांचे तुकडे दिले. घरांत दुसरें काय होतें? शिळ्या भाकरीचे तुकडे एका पटकुरावर पडले होते. आबाला त्या रस्त्यावरील जिलबीपेक्षां भाकरीचे तुकडेच बरे असें वाटलें.

धूळ, घाण, रोगजंतु–सारें पुस्तकीं नि गुरुमुखीं. पढलेल्या शास्त्रानें त्याचें मन कोरून काढलें होतें. ते अन्न त्याला जाईना. त्याला काय करावें सुचेना. लहानपणीं याच झोपडींत तो होता. प्लेगनें उंदीर पटापट मरत होते. आईनें चुलीवर एका मडक्यांत भात शिजत घातला होता. किती दिवसांनीं ताजा भात मिळणार, म्हणून लालसावलेल्या दृष्टीनें नि जिभांनीं सगळीं भोंवतीं भोंवतीं फिरत होतीं. शेवटीं एकदांचा भात झाला. आईनें निजायच्या कांबळ्या गोधडीवर भराभर भात वाढला. प्लेगचा उंदीर त्यांतच शिजला होता. तो तसाच काढून सगळीं भात जेवलीं. 'वेड्या! धूळ, घाण, रोग-जंतु हें तुला नाहीं. तुम्हांला नाहीं. तुमच्यासारख्यांना नाहीं. ज्याचं भरलेलं ताट दूर सारण्याइतकं, लाथाडण्याइतकं नशिब असतं त्यांनीं हीं सारीं शास्त्रं विचारांत घ्यायची असतात.' आबानें घांस गिळला. एकच. आईबापामागें धांवत आलेलें मन त्यांच्याजवळ बसल्यावर शेंकडों मैल त्यांच्यापासून दूर गेलें.

वस्तींत ताडी माडी पिऊन बडबड, कचकच चालली होती. पुरुषांची शुद्ध गेलेली आणि बायकांचीही ! हा आमचा जातधर्म ! ताडी माडी देवाला वहायची नि आम्हीं प्यायची. चोरी करायची. नरकांत लोळायचें. "देवा ! कुठल्या जगांत मला आणून टाकलंस ! किळस ! किळस ! बीभत्सपणा ! मी रातोरात पळून जाऊं का ? पण आबा ! कुठें पळशील ? हेंच तुझं घर !"

● ● ●

## ३

रात्रभर आबाचा भाऊ तापानें कण्हत होता. आबाला नीट झोंपही आली नाहीं. आबानें क्षणाचाही विलंब नको, म्हणून दुसऱ्या दिवशीं सकाळींच एक अर्ज लिहिण्याचें ठरवून टाकलें. आतां नोकरी लागेल. मग आपण घराच्या भिंती दगडविटांच्या बांधूं. वर पत्रे ठोकूं. खुंट्या—कोनाडे हें सगळें सगळें आपल्याला करतां येईल. त्याचें दुःखी मन सुखाचीं स्वप्नें पाहूं लागलें. अर्ज कसा लिहावयाचा हें शिक्षण त्याला मिळाले होतें. पण अर्ज लिहायला सामान कसें मिळवावें हें त्याला कोणीही सांगितलें नव्हतें. त्याच्या कोणत्याही मास्तरांना ही कल्पना असेल का ? कीं एक दोन मैलांच्या परिघांत दऊत, टाक, पेन्सिल, कागद या गोष्टी—बघायलासुद्धां मिळणाऱ्या नव्हत्या ! त्याला हसूं आलें. विषण्णतेनें त्यानें आपल्या पिशवीतून कागद-पेन्सिल काढली. कागद कोरा नव्हताच. पण सगळे शिष्टाचार विसरणें भाग होतें. चोर-वस्तींतील अधिकाऱ्यांनाही माहीत असेल—चोर-वस्तींतील लोकांजवळ कागद मिळणार नाहीं म्हणून.

सकाळीं उठून तो लिहायला बसला. चांगुणा, गेन्या कौतुकानें पहात होतीं. लहान मुले त्याला त्रास देतील या कल्पनेनें त्यांच्या अंगावर ओरडत होतीं. आई-बापांच्या कौतुकाची जाणीव आबाला होत होती. तरी तो उदासीन होता. त्यानें अर्ज लिहिला.

" अग, तुझा पोर सायबाच्यासारखं लिवाया लागला ना ! "

" मंग ? त्या दिवशीं धाडून दिला म्हून ठीक झालं. न्हाई तर हितंच बसला असता ना ! " चांगुणा कौतुकानें म्हणाली.

"आबा, समदं लिही बरं का. अरं, तुला रोजगार मिळाया जड न्हाई जायचं. हिथं हाय कोन र ? "

त्याची आईबापे किती आशेनें त्याच्याकडे पहात होतीं, याची त्याला जाणीव होत होती. आबालाही विश्वास वाटत होता. त्यानें कागदाची घडी करून आपल्या खिशांत ठेवली. अजून ऑफिसाला वेळ होता. त्याच्या मनाचे तुकडे त्याला सांधतां येईनात. तो नुसता विचार करीत होता. तो बोलणें जणुं विसरला होता. नव्हे; बोलणार कुणाशीं ? आईबापाशीं ? त्याच्या मनाची भाषा त्यांना कळणेंच शक्य नव्हतें.

संतू नि महाद्या गेन्याच्या झोपडीजवळ येऊन डोकावून पहात होते. आपल्या मुलीसाठीं आबाला गळ घालावी असें त्यांच्या मनांत होतें. आबा झोपडीच्या बाहेर उभा राहिला. बायका पाणी भरत होत्या. एक पोरगी उगीचच लाजून मुरकून निघून गेली. तो पहात राहिला. तिला ' नामे ' म्हणून कुणीसें हाक मारीत होतें. कांहीं बायका आणि पुरुष गिरणीला जायला निघालीं. पोरांची रडारड सुरू होती. हैदर पट्टेवाला " ए, चला, चला पोरांनो ! शाळेकडे चला. " म्हणून पोरें हांकलीत होता. मास्तर-मास्तरणीही आपापल्या वर्गाची पोरें हाकलीत होतीं. पोराचा लपंडाव सुरू झाला.

आबाला हंसू आलें. त्यानेंही लहानपणीं असेंच केलें होतें. पण आतां त्या सगळ्या धांवपळीकडे कींव येऊन तो पहात होता. " बिचारीं ! शिकलीं तर सगळं भवितव्य निराळं होईल. नाहींतर आहेत तिथंच पिचत पडतील." त्याच्या बाजूनें धांवणाऱ्या पोराना त्यानें थांबवलें आणि तो कळकळीनें म्हणाला, " जा रे जा शाळेला. " तो आतां मास्तर-मास्तरणींची व पट्टे-वाल्याची धांवपळ पहात सगळीकडे मंदमंदपणें हिंडत होता.

शेंकडोंनीं त्या आवारांत दिसणारीं पोरें क्षणार्धांत अदृश्य झालीं. पहातां पहातां ओरबाडणाऱ्या कांटेरी तारांच्या कुंपणालाही न जुमानतां कित्येक बाहेर पडलीं. आयाबाया स्वस्थपणें हा देखावा पहात झोंपडीशीं नाहीं

तर नळाशीं उभ्या होत्या. त्याही जणुं पोरांच्या बाजूनें या लपंडावांत सामील होत्या. पट्टेवाल्याची पाठ फिरतांच त्या फिदीफिदी हंसत.

आबाला चीड आली. आपलीं भावंडें तरी शाळेला गेलींच पाहिजेत. तो झोपडीकडे येऊं लागला. तो पट्टेवाला त्याच्याच झोपडीशीं उभा होता.

" काय ग चांगुणे, तुझीं पोरं शाळेला येत न्हाईत. "

" कुठें हाएत पोरं ? "

" याद राख, मॅनेजरसायबाला नांव सांगून दीन. "

चांगुणा म्हणाली, " अरे जा साग. मला काय ठावं पोरं. असतील तर बघुनशानी घ्येना. ए अंत्या ! अंत्याव ! "

पट्टेवाला दुसरीकडे गेला. आंत लपवलेला अंत्या फटींतून झोपडीबाहेर बघत होता. आबा जवळ आला. अंत्याला चांगुणा म्हणाली, " म्येलं मढं ग्येलं तुझं चुलींत. भाईर कशाला येतोयू ? धरून न्हील ना. " तिनें अंत्याच्या डोक्यावर चापट मारली. आबाला राग आला.

" आई, तूं त्याला कां लपवतेस ? जाऊं दे त्याला शाळेंत. काय वाईट व्हायचंय् त्याचं ? जा रे अंत्या शाळेला. "

पण अंत्या 'अंऽऽ' म्हणून आईला बिलगला. ती म्हणाली,

" अरे कसली शाळा घिऊनशानी बसलास. आजपवतर इक्तीं शिकलीं प्वारं. त्यांना कुठं अंमलदाराच्या रोजगाराला न्हाई घेतलं त्ये ? "

पण आबानें अंत्याचें बगाट धरलें. तो त्याला पट्टेवाल्याकडे घेऊन चालला. चांगुणेला थोडें शरमल्यासारखें झालें.

तो अंत्याचें बगाट धरून चालला. पुनः तीच पोरगी ! काय तिचें नांव ? ...नामी ! मुरडत होती. त्यानें तिच्याकडे पाहिलें. त्याला त्या बायकांकडे आणि पुरुषांकडे पाहून हीं आपलीं माणसें ही भावनाही येईना. तो जणुं कुठल्या तरी पांखरासारखा त्या भुईवर क्षणभर थांबला होता. आणि क्षणांनीं उडून जाणार होता. तीं दूरदूरचीं माणसें, बथ्थड, घाणेरडीं म्हणून त्याची नजर पहात होती.

पट्टेवालाही इकडे तिकडे धांवून ओरडूं लागला. " ए पिल्या, ए जाल्या, चलतां का नाहीं रे ? का करूं हेडमास्तरापुढें उभा ? ए माध्या, तुला ऐकूं येत न्हाई का रं ? " असें म्हणून पट्टेवाल्यानें एकाचा कान पिरगा-

ळला. मेंढरांना हर्रर्र करावें असा तो हात उंचावीत पोरांना गोळा करून हांकीत होता. त्याला पाहतांच सहा सहा वर्षांचीं दोन पोरें पत्र्याच्या संडासांत लपलीं. आबा सारें दुरून पहात होता. पट्टेवाला त्यांना सोडणार थोडाच ? त्यानें संडासाचें दार उघडलें. त्याबरोबर तीं पोरें बेधडक संडासांतील कमरे-इतक्या सांचलेल्या विष्ठेंत उडी टाकून पसार झालीं. आबाला उमासा आला. इकडे पोरें पळत् होतीं. सारा मळ त्यांच्या अंगावरून थबथबत होता. पट्टेवाल्याला, आजूबाजूभोंवतींच्या मंडळींना त्याचें कांहींच वाटलें नाहीं !

आंबाला दुःख झालें. नरकांतले किडे ! माणसें लोपलीं तरी कुठें त्यांच्यां-तलीं ? मिशनऱ्यांनीं इतकीं वर्षें श्रम करूनही त्यांची माणसें झालीं नाहींत ? का ? पुढें तरी होतील का ?

● ● ●

## ४

आबा लहानग्या भावाला थोपटीत दवाखान्याकडे गेला. तेथें रोगी विशेषतः पोरें गर्दी करून बसलीं होतीं. शाळा सक्तीची होती. दवाखान्यांत डॉक्टरांनीं तपासून 'खरोखर आजारी आहे' अशी चिठ्ठी दिल्याशिवाय पोरांना रजा मिळत नव्हती. पण शाळा चुकवण्यासाठीं पळतां पळतां पट्टेवाल्याच्या हातीं सांपडलेलीं पोरें एकाएकीं कण्हूं लागलीं. ओयू ओयू ओय् म्हणून ओरडूं लागलीं.

आबाला तिरस्कार आला. त्यांच्या आयाही " माझं पोर म्येलं ऽऽ " म्हणून मोठमोठ्यानें रडायला लागल्या म्हणून पट्टेवाल्यानें त्यांना दवाखान्यांत डॉक्टरांपुढें आणलें होतें. सगळीं पोरें कण्हत होतीं. पट्टेवाला हिडीसफिडीस करीत होता. आबाला तें बघवेना; पण त्याला पोरांचाही अंदाज येईना.

इतक्यांत पट्टेवाला म्हणाला, " नर्सबाई, हा भाज्या रोज आजाराचं ढोंग करतो अन् हीं पोरंबी ! "

असें म्हणून त्यानें दहा पोरांच्या डोक्यावर टप्पल लगावले. आबाची ही पशूसारखी वागवणूक पाहण्याची संवय गेली होती. पण आजवरच्या शिस्तींतील ती एक तऱ्हा असल्याखेरीज पट्टेवाला असें करणार नाहीं हेंही तो समजला.

पट्टेवाल्याचा राग आणि आईबापें व मुलें याबद्दल चीड. सगळेंच किळसवाणें !

" डॉक्टरपुढें उभीं कर त्यांना. " नर्स म्हणाली.

" डॉक्टर म्हणतात यांना कायबी होत नाहीं. "

" मग ने त्यांना वर्गांत. " कठोरपणें नर्स म्हणाली.

आतां त्या पोरांचें कण्हणें थांबलें. तीं पुनः पळण्यासाठीं भिरभिर पहात होतीं.

आबा अंतरंगांत कळवळून सांगूं लागला, " बाबांनो, अशी संधि मिळायची नाहीं. आपलीं मुलं शिकवा. पुष्कळ शिकवा. तीं मोठीं झालीं तर तुमचाच फायदा आहे. "

पांच मिनिटें तेथील लोक त्याच्याकडे पाहूं लागले.

" कोण बाबा हाए ह्यो ? "

कुणाला ओळख पटेना.

कुणीसें हळूंच म्हणाले, " नवा मास्तर असल. "

कुणी म्हणाले, " हापीसर असल. "

ते त्याच्या स्वच्छ कपड्यांकडे पहात होते. ते दबकून पहात होते. आबाला बरें वाटलें. ' लोक ऐकतील माझें. '

मग कुणीसें म्हणालें, " अरे ह्यो त्या गेन्याचा मुलगा ! "

आणि मग सगळ्यांना हंसूं आलें.

" गेन्याचा मुलगा ! लई शानपन सांगाया लागला. तूं काय शिकूनशानी क्येलस ? "

आबाला कसेसेंच वाटलें. तो त्यांना निरुत्तर करण्यासाठीं म्हणाला, " मी ? मीं पुष्कळ केलं. तुमच्यापेक्षां स्वच्छ राह्यला शिकलों. स्वच्छ बोलायला शिकलों. आणि आतां नोकरी मिळाली कीं तुमच्या पोरांना सक्तीनें नेणार आहे शाळेला. "

कांहीं भोळ्याभाबड्या जीवांनीं आशेनें म्हटलें, " हां. आपलीं प्वारं शिकत्याल तर वाईट न्हाई. "

पण बाकी हंसले. कुणीसें म्हणालें, " आनखी महिनाभरानं सांग तुझं शानपन. आमचा पोर ढोरामागं ग्येला तर चार आनं मिळत्याल. पोरगीनं भाकर क्येली तर प्वारं खात्याल. शिकूनशानी काय मिळणार हाए ? "

" आज नाहीं मिळणार. चार सहा वर्षांनीं मिळेल. "

" अरं कामाला जातो ना दोघं बी. लहान लहान प्वारं पडत्यात मागं. त्यांना सांभाळाया तर व्हावं कुनी ? का तूं संभाळनार हाएस ? "

त्यांच्या जिभांच्या फटकाऱ्यांनीं आबाला उद्वेग आला.

" जिथें आईबापांनाच आपल्या मुलांना शिकवावंसं वाटत नाहीं तिथें पोरं काय रडणार ? " तो स्वतःशीं म्हणाला.

पट्टेवाला ऐकत होता. त्यानें आणखी डोक्यावर दिलेले टप्पू खात आणि निर्लज्जपणें तिरक्या डोळ्यांनीं एकमेकाकडे बघून चोरटें हंसू हंसत तीं पोरें शाळेकडे हाकललीं गेलीं. आबा विस्मित होऊन हीं नवीं मनें पहात होता. अशीं आमचीं मनें ! म्हणूनच वीस वर्षें दावणीला बांधलेलीं आम्ही राहिलों. चोरवस्तीला आपलें हित कसें कळत नाहीं ? आबा विचारांत पडला.

• • •

## ५

शाळेचीं पोरें शाळेच्या रस्त्याला लागलीं. आबा माघारा झोपडीकडे वळला. देखरेखीचें काम करणाऱ्या बायका—दयाबाई—शेवंतीबाई—आशाबाई आधींच पुढें जाऊन बायकांना केस विंचरायला व झोपड्या झाडायला सांगत होत्या. आजारी पोरांना दवाखान्याकडे आणीत होत्या. दुपारच्या बायकांच्या वर्गाला येण्याबद्दल बजावीत होत्या. आबा झोपडीशीं आला.

समोरच्या त्याच्या लहान भावंडांनीं किळसवाणे चाळे चालवले होते. आबा शरमून गेला. इतक्यांत चांगुणा बाहेर आली.

" मेल्या, ग्येलं तुझं मढं ! काय चालवलंत ह्ये ! "

तिनें दोन्ही मुलांना तडाखे देण्यास सुरवात केली. आबाही शरमला होता.

मुलें मात्र " आम्हीं काय केलं ग ? आम्हांला मारती ! " म्हणत दूर पळालीं.

शरमेनें चांगुणेला मात्र धरणी दुभंग होईल तर बरें असें आबाला पाहून झालें. त्यांच्या खोड्या बीभत्स असतील ही बिचाऱ्या मुलांना कल्पनाही नसावी. ती चांगुणाच्या मारामुळेच आली असली तर ! तीं दोन्हीं पोरें हंसत एकमेकांकडे पहात राहिलीं.

आबाला त्यांच्याकडे पाहून चीड आली. त्याला किळस आली....हो, पण त्यानेंही एकदां असेंच केलें होतें. असाच आईच्या हातचा मार खाल्ला होता...त्यानें चौफेर दृष्टि टाकली. तीं सगळीं घरें—नव्हे घरटीं होतीं. दोन वावा लांबी रुंदीचींच. त्यांतच चूल, गाडगीं, मडकीं, लक्तरें. एक-मेकांना चिकटून थडीवाऱ्याचीं सातआठ मुलें—माणसें एकेका घरट्यांत झोंपत.

त्याला आठवलें—चांदणी रात्र. त्याचा बाप उशीरां दारू पिऊन घरीं आला. त्याला आपण काय करतों याची शुद्ध नव्हती. मुलेंबाळें झोपलीं कीं नाहीं हें पाहण्याइतकीही शुद्ध नव्हती. आईच्या पाठीशींच झोपेंत असलेला तो बापाच्या बडबडीने अर्धवट जागा झाला. त्याला नीटसें कळलें नाहीं. तरी त्याला धक्का बसण्याइतकें, त्याच्या मनावर कायम परिणाम करण्याइतकें आईबापांचें वागणें चमत्कारिक दिसलें. तो गुपचुप पडून राहिला. पण त्याला बराच वेळ झोंप आली नाहीं.

आबाचें मन त्या आठवणीनें उद्विग्न झालें. हो; बोर्डिंगांत जाण्यापूर्वीं तोही आईवरून घाणेरड्या शिव्या देई. त्याला कुणी हटकलें नव्हतें. पण बोर्डिंगांत पहिल्याच दिवशीं त्याला ' आपण किती वाईट बोललों ' याची जाणीव मुलांनीं आणि मास्तरांनीं करून दिली. त्यानंतर कितीक वेळां संवयीनें शिव्या जिभेवर येत पण माघारीं फिरत. आणखी कांहीं दिवसांनीं शिव्यांची आठवण बुझली. ती पुनः येण्यासारखें कांहीं घडलें नाहीं.

आज पुनः त्या सर्वांची आठवण झाली. त्याला वाईट वाटलें. तो विचार करूं लागला.

" इथेंच राह्यचं ? मग मी लग्न करणार नाहीं. नकोत तीं पोरं. तींही शिव्या देतील. "

आईमाईवरून अचकट विचकट शिव्या देणाऱ्या पोरांचा, भरपूर जागेंत राहणारे, ' संस्कृतीची जोपासना केली ' म्हणून घमेंड मारणारे पांढरपेशे धिक्कार तिरस्कार करीत होते. पण कुणालाही कळलें नाही कीं दारिद्र्यानेंच माणसांच्या अब्रूचीं उरलीं सुरलीं लक्तरें हिरावून त्यांना कुत्र्या-मांजरांच्या पंक्तीला नेऊन बसविलें होतें. माणसांचीं कुत्रीं-मांजरें झालेलीं आबानें स्वतः पाहिलीं आणि त्याच्या आजवरच्या संस्कृतीच्या कल्पनांना धक्का बसला.

● ● ●

६

त्याच्या आईबापांच्या मायेचा दुसराच दिवस उगवला होता. पण आबाला तें सारें असह्य झालें. इथें मी राहणार ? कसा राहणार ? त्यापेक्षां उघड्या रस्त्यावर कुणी मना न केलेली शुद्ध हवा तरी पोटांत घेईन.

आबाचें तरुण मन बंड करून उठत होतें. त्यानें भावाकरितां आणलेलें औषध चांगुणेनें कुडामागें ओततांना पाहून तो थक्क झाला. कांहीं तरी भयंकर बोलावें हा विचार त्यानें मोठ्या कष्टानें दाबला. आणि तो घरा-बाहेर पडला.

त्याची सगळी मदार त्याच्या खिशांतील अर्जावर अवलंबून होती. तो रिपनसाहेबांच्या ऑफिसकडे गेला. ऑफिसबाहेर कित्येक माणसें तिष्ठत होतीं. आबाला तीं निराळीं आहेत, आपण त्यांतले एक नाहीं असें वाटलें; पण तो ऑफिसच्या पायऱ्या चढूं लागतांच पट्टेवाल्यानें त्याला हटकलें, पायरीखालीं ढकललें.

" काय रे ? आंत कुठें चालला ? "

आबाला वाटे एका ठोशानें पट्टेवाल्याला आडवें पाडावें. त्याला कितीक वर्षांत असें कोणीं वागवलें नव्हतें. पण पट्टेवाल्यानें त्याला एकदम जाणीव दिली आणि जणुं सांगितलें, " किती पांढरे कपडे घातलेस तरी तूं चोराचा मुलगा आहेस. " आबाच्या अंतःकरणांत अपमानाची आग पेटली.

तो म्हणाला, " राव ढकलतां कां पण ? नुसतं सांगा कीं ! "

" अरे जा—शानपन नग दावूं. " असें म्हणून पट्टेवाला दुसऱ्याशीं बोलूं लागला. आबाच्या खांद्यावर कोणीसा हात ठेवला. त्यानें दचकून मागें पाहिलें.

" कोण ? "

" मी काशिनाथ कैकाडी. "

आबाला ओळख पटली नाहीं. काशिनाथ ती पटेपर्यंत थांबलाहि नाहीं. त्यानें आबाचा हात धरून आबाला दहा वीस पावलें दूर नेलें.

" मीं स्वतः पाहिलं तुला ढकललं पट्टेवाल्यानं तें. " काशिनाथ आवेगानें म्हणाला.

आबा—" अरे ही काय तऱ्हा ? "

काशिनाथ—"असंच इथें आहे. आपण कांहीं तरी केलं पाहिजे. "

आबा—" काय करायचं ? "

काशिनाथ—" तेंच कळत नाहीं."

दोघेही तेढीनें ऑफिसकडे पहात उभे राहिले.

आबा—" तूं कुठवर शिकलास ? "

काशिनाथ—" मी मॅट्रिक झालों आहें."

आबा आश्चर्यानें पाहूं लागला. काशिनाथच्या फक्त चेहऱ्यावर शिक्षणाचें तेज दिसत होतें. त्याचे कपडे धुळकट झाले होते.

" मग तुला नोकरी नाहीं मिळत ? "

" नाहीं. "

" कां ? तूं तर पहिला माणूस इतकं शिकलेला ! "

" पण मी साहेबाच्या पुढें कुत्र्यासारखा शेपटी हालवीत नाहीं. शेपटी हलवून बाटणाराला नोकरी मिळते. हा पट्टेवाला आमच्याच जातीचा आहे. बाटला म्हणून नोकरी मिळाली. "

आबा पहातच राहिला. "पण हे लोक म्हणत होते तुम्ही शिका. प्रामाणिकपणाने वागा. तुमचं कल्याण होईल."

काशिनाथ—"पण त्यांना कोणी शिकायला नको आहे, आणि कुणाचं कल्याण करण्याची त्यांना इच्छा नाहीं. त्यांना फक्त धर्म वाढवायचा आहे आकाशांतल्या बापाचा. मी नोकरी करायला तयार आहे. शिकायला तयार आहे. पण दोन्ही गोष्टींना अधिकारी तयार नाहींत."

आबा हतबुद्ध होऊन पहात होता.

रिपनसाहेब हपीसांत हजर होते. हपीसाबाहेर शेंकडो लोक दबकून होते. रिपनसाहेबांची गांठ घ्यायचे त्यांच्या नशिबीं होतें की नाहीं कोण जाणे! चार पट्टेवाले त्यांना हांकलून देत; पण हांकलून देत तें तरी किती शांततेनें! पट्टेवाला जवळ येई. अगदीं अंगाशीं येऊन कांहीं दबकावणीचे शब्द हळू उच्चारी आणि नंतर नुसत्या गचांड्या आणि धक्के.

"साल्या, तक्रारी कसल्या करतोस? मुडदा पाडीन. तुला चाप लावून उलटा टांगीन."

काय हवे तें पट्टेवाला बोले. साहेबांच्या ऑफिसपाशीं शांतता टिकवणें, हें त्याचें काम होतें. ती शांतता टिकली नाहीं तर पट्टेवाल्याची तरी नोकरी टिकण्याची काय खात्री? तो नालायक ठरला तर उद्यां अन्नाला मोताद होऊन तोही हिंडेल! प्रभु येशूची कृपा त्यानें संपादन केली म्हणून त्याला ही नोकरी मिळाली होती. नाहीं तर तो एक चोर-वस्तींतला चोरच होता ना?

चोर-वस्तींतलीं माणसें हें ओळखून होतीं, आणि हेही ओळखून होतीं कीं पट्टेवाल्यानें ढकलल्यावर पुनः आपण चिकाटीनें पुढें आलों तरी उलटा टांगण्याची पट्टेवाल्याची धमकी ही कांहीं खरी होणार नाहीं. चापही लागण्याची भीति नव्हती, कारण पट्टेवाल्यालाही त्यांच्यांतच वावरायचें होतें. भीति काय ती साहेबाची. म्हणून पट्टेवाल्यानें साहेबाच्या कानाशीं भिडूं नये एवढ्यासाठीं त्याच्या दटावणीनें मागें मागें सरत ते लाचार लोक पुनः पहिल्या जागीं येऊन बसत. आपल्या तक्रारी पुनः पुनः लोचटपणा करून कानावर घालण्याखेरीज त्यांना तरी दुसरी काय गति होती?

साहेबानें इनू कैकाड्याची बायको गेलीं सहा वर्षें दुसऱ्या सेटलमेंटला पाठवून दिली होती. इनू कैकाडी रोज बायकोचा ध्यास घेऊन हपीसाशीं येई,

रडे, भेके, विनवण्या करी. पट्टेवाला त्याला गचांडी देई. इनूच्या शरीराची काहील पेटे. द्वेषाचा अंगार भडके. 'सा वर्सांत आपली बायकू दुसऱ्या-बरबरबी नांदाया लागली असल.' या कल्पनेनें त्याचे डोळे लालभडक होत. साहेबाला खाऊ कीं गिळूं असा गरगर नजरेनें तो पाही. आणि साहेब दृष्टीस पडल्यावर डोळ्यांत पाणी आणून सलाम करी. पण रिपनसाहेबांनीं इनू कैकाड्याच्या भांडकुदळ स्वभावामुळें ही फारकत केली होती. त्यांना अजून इनू वळणार आल्यासारखें वाटत नव्हतें.

खंड्याचीं पोरें सात आणि नऊ वर्षांचीं. शाळा चुकवून भीक मागायला गेलीं म्हणून साहेबानें त्याना हुबळीच्या बोर्डिंगांत पाठवून दिलें होतें. नसले खायला खंड्याजवळ म्हणून काय झालें ? आपल्या मांसरक्ताच्या पोरांची माया खंड्याला आणि बेरकीला हैराण करून सोडी. रोज हपीसाशीं बसून वेडी माया आक्रोश करीत बसे. त्यांना कुणीं सांगितलें तुमचीं पोरें बाटाया नेलीत. त्यांनीं ऊर बडवला. किती वर्षे ? एक-दोन-पांच-पण त्यांच्या आक्रोशा-कडे कुणी लक्ष दिलें नाही. आणि लक्ष देईपर्यंत खंड्या आणि बेरकी थकलेलीं मनें आणि देह घेऊन हपीसाशीं बसत—रात्रीं हपीस बंद होई तों. सुटीच्या दिवशी आणि जेव्हां केव्हां साहेब दिसे तेव्हां लवून चार चार वेळ सलाम करीत. पण शिक्षणाशिवाय चोरांच्या मनांत चांगल्या प्रवृत्ति रुजणार नाहींत ही रिपनसाहेबाची खात्री होती. म्हणूनच ते लक्ष देत नसत.

बरगड्यांच्या फांसळ्या मोजून घेतां येतील अशीं पंचवीसपासून पासष्ट वर्षांपर्यंतचीं कितीक माणसें सारा दिवस खडी फोडून रक्ताचा घाम करून येत. दुसऱ्या दिवसाची त्या कामाची दहशत त्यांना स्वस्थ पडूं देत नसे. मग हपीसाशीं धरणे धरून 'गिरनींत लावा' म्हणून विनवायला येत, अवर्षणांत पावसाला विनवावें तसें, दिवस नि दिवस, महिने नि महिने; आणि तापल्या अंतःकरणानें परत जात. कारण प्रामाणिक कष्ट करायची संवय लावल्याखेरीज माणसांचा हृदयपालट होणार नाहीं हें रिपनसाहेब ओळखून होते.

असे कितीक इनू कैकाडी, कितीक खंडू आणि कितीक बेरक्या, कितीक नागू नि कर्तारसिंग हपीसाशीं बसलेले असत. त्यांतच हजेरीवाल्यांची भर पडलेली असे. कित्येकांच्या बायका एका गांवांत तर पोरें दुसऱ्या गांवाला.

कांच फुटून तुकडे उडाल्यासारखे मायाबंध विखुरले होते. त्यांना भेटण्यासाठीं परवानगी मागायला दररोज हपीसाशीं बसण्यांत विश्रांतीचा सारा वेळ निघून जाई.

मान्या, रोड्या आणि त्यांच्यासारख्या कितीकांचीं मुलें शाळेंत आलीं नाहींत म्हणून त्यांची रवानगी बोर्डिंगांत झाली होती. आणि मान्या, रोड्या आणि इतर कित्येक जण पोरांना बोर्डिंगांतून सोडा म्हणून विनवीत होते.

चंदू पारधी रस्त्यानें भीक मागतांना दिसला. या अप्रामाणिक धंद्याबद्दल त्याला पोलिसांनीं पकडून रिपनसाहेबांपुढें उभा करायला आणला होता. तो मनांतल्या मनांत शिव्या देत मधूनच मोठ्याने ओरडे.

इतक्यांत रिपनसाहेब ऑफिसाबाहेर आले.

काशिनाथ–" जा साहेब आले. तूं त्याच्यापुढेंच जाऊन उभा राहा. "

आबा [illegible] जाऊन सलाम करून उभा राहिला. रिपनसाहेबांना मराठी भाषा येत होती.

" काय पाहिजे ? "

" मला काम पाहिजे, साहेब. " उगीचच केविलवाणें हंसत आबा म्हणाला.

" तूं कोण ? गेन्याचा मुलगा आहेस ? मला कालच कळलें तूं आलास. "

" होय साहेब. मी इंग्रजी सहावी झालों आहें. मला आणखी शिकायला पाठवा साहेब. आणि सुटींत काम द्या, साहेब. "

" तुला चोर-वस्तींत झाडूचे काम करायचें आहे ? "

" साहेब, झाडूचें काम ? " हंसत पण अंतर्यामीं चडफडत आबानें विचारलें.

साहेब–झाडूचें काम तुझा बाप करतो. तुमची जात करते. तूंही कर. काम करण्याला लाज वाटतां कामा नये.

आबा–पण साहेब मी शिकलों कशासाठीं ? हें काम करायला ?

साहेब–मला विरोध आवडत नाहीं. तूं गांधी बोर्डिंगांत होतास. मला न विचारतां तूं गेलास.

जरा रागानें म्हणून साहेब निघून गेले. आबाला भयंकर अपमान वाटला. आतां हेंच थपडांचें आयुष्य जगायचें का ? तो स्वतःला सांवरीत

दांत आंवळीत उभा राहिला. काशिनाथही तिरस्कारानें हें सारें पहात होता. ऐकत होता. आबानें एकदांच तीव्रतेनें काशिनाथकंडे पाहिलें.

आबा—तूं काय करणार आहेस ?

काशिनाथ—तें कळतं तर !

आबा—मला कळतं आहे काय करायचं तें.

काशिनाथ—काय करणार आहेस तूं ?

आबा—मी ? मी ही वस्ती सोडून जाणार ? झाडूच मारायचा तर तो चोर-वस्तींत कशाला ? राजरोस रयत वस्तींत जाऊन रस्ते झाडीन. इथल्या लोकांना शिकल्यावर हेंच करायचं आहे असं कळलं तर ते मुळींच शिकणार नाहींत.

आणि त्याच्या बोलण्यानें तिघांनाही हंसू आलें.

काशिनाथ—अरे बाबा, आपल्यावर चोर-जातीचा शिक्का आहे तंवर आपल्याला कुणी आसरा देणार नाहीं. तूं जाणार जाणार म्हणतोस. राहाणार कुठें? तुला घर कसं मिळणार ? कोण देणार ? तुझी मांग-गारुड्याची जात कळली कीं गांवच्या वेशीवर पडशील उकिरड्यासारखा.

आबा विचारांत पडला. ती कोंडी फुटण्यासारखी नव्हती तर ! मोठी थोरली अविश्वासाची भिंत त्या सर्वांच्याभोंवतीं पडली होती. वन्या कांहीं सांगत आला.

वन्या—अरे काल बंगडी मॅनेजर कॅंपांत दारू पीत बसला होता.

सगळे आश्चर्यानें म्हणाले, " खरं ? "

वन्या—गळयाच्यान्.

काशिनाथ—साले आमच्यासाठीं कायदे करतात अन् आपण आमच्या-सारखे गुन्हे करतात. आपल्याला चोर म्हणतात अन् हे काय कमी चोर आहेत ? चोरानीं दारू प्यायची नाहीं अन् हे साव म्हणून यांनीं प्यायची होय ? अन् तो सुतार-कारखान्यांतला नंबुद्री मास्तर ! तो जातो बाजाराला अन् कारखान्यांतल्या जिनसा विकतो तो !

हणम्या—अरे व्हय ना ! काल पहांटच मला बोलावून म्हंतो कसा, हणम्या, ह्ये ष्टूल घिऊन चल गांवामंदी. मी बी इचारांत पडलों. हा अंधाराचा भाईर कां पडतोयू ! मी ष्टूल घेऊनशानी चाललों तर आपुन माझ्यापून दूर दूर

पचीस कदमांवर चालत ऱ्हता. माझ्या पोटांत भय उठलं. कुनी अंमलदारानं पाह्यलं तर मलाच चोर म्हनल."

शिरप्या–हात लेकाचे ! अन् म्हनतात आकाशांतल्या बापाचा धर्म ! चहाड्या करत्यात, चुगल्या करत्यात, हेवेदावे करत्यात, चोऱ्या करत्यात, दारू पित्यात; मग आकाशांतल्या बापाचा धर्म निराळ्या कसा होतोय ?

आबा–आपण यांची कारस्थानं साहेबांच्या कानावर घालायला हवीं.

काशिनाथ–वेड तर नाहीं लागलं ? सही सही हात पकडून गुन्हेगार दाखवलास तरी तूं चोर म्हणून तुझ्यावर विश्वास नाहीं ठेवणार साहेब."

शिरप्या–मग आपुन समद्यांनीं किरिस्ताव तरी होऊं !

काशिनाथ–हं. ख्रिस्ती झालास तरी तूं चोर ख्रिस्ती म्हणून तुला दूरच ठेवणार हे.

शिरप्या–पन नोकरी तर मिळल !

काशिनाथ–कसली ? झाडूवाल्याची नाही तर पट्टेवाल्याची ?

आबा–पुढे शिकायला मिळत असेल तर मी खुशाल ख्रिस्ती होईन.

काशिनाथ–तूं ख्रिस्ती झालास म्हणजे शिकायला मिळेल असं नाहीं ! तूं ख्रिस्ती झालास तरी साहेब सांगेल तसंच आणि तेंच केलं पाहिजे तुला.

आबाची स्थिति कोंडलेल्या वाघासारखी झाली. तो झोपडींत गेला. त्वेषानें आईला म्हणाला, " आई चल. या वस्तींत एक मिनिट राहणं नको."

चांगुणेला आश्चर्य वाटलें. वेड तर नाही लागलें मुलाला !

" अरं जायाचं कुठं ? दाखला हाए ना तुझ्या बाला ! "

आबाला त्या वस्तीची, त्या झोपडीची, गुन्हा करून त्या ठिकाणीं डांबून पडणाऱ्या बापाची, सगळ्या सगळ्याची शिसारी आली. पण त्याला बोलतां येईना. तो हतबुद्ध होऊन उभा राहिला.

आज सकाळपर्यंत त्यानें कसाबसा दम धरला होता. अंगावरचा स्वच्छ शर्ट झोपडींत कुठें ठेवावा हें त्याला कळलें नव्हतें म्हणून काल रात्रीं निजतांना त्यानें शर्टची घडी करून उशाशीं ठेवली होती. निजतां निजतां त्याला वाटलें, हें घर आपलें नाहीं. आपण येथें नि अशा घरांत राहणार नाहीं. ही कळ एक नाहीं तर अर्ध्या दिवसाची. तो आपल्याशींच विचारांत गुरफटून अबोल होऊन पडला होता. आईच्या किंवा बापाच्या प्रश्नाला ' हो ' किंवा

' नाहीं ' यापेक्षां उत्तर देण्याइतकें त्याचें मन स्वस्थ नव्हतें. तें घोडदौडीनें त्यांच्यापासून पळत होतें आणि दुसरा निवारा शोधीत होतें. आतां त्याला कळेना. ञाइवाल्याची नोकरी हाच निवारा ? याखेरीज दुसरें नाहींच का कांहीं ?

चांगुणेनें त्याला विचारलें, " सायबाकडे जा कीं काम मागाया ! "

आईला निराशेचा धक्का देण्याचें त्याच्या जिवावर आले. तो शून्यपणें तिच्याकडे पाहूं लागला. पहातां पहातां त्याला वाटलें, हा साहेब मलाही माझ्या आईबापांच्या नि चोर-वस्तीच्या रांगेंत आणून ठेवील का ? त्याचें मन बावरलें. हे सगळे लोक निराशेनें म्हणून तर बथ्थड झाले नसतील ? आबानें आईकडे पाहिलें. त्याला किळस आली, कींव आली. तो थोड्या वेळानें म्हणाला, " आई केस विंचर की ग. "

चांगुणेलाही मुलाची आई शोभण्याची ईर्षा होती. तिनें केस विंचरले. येशीचे केस विंचरले; उवा मारल्या. अंग धुतलें. मुलांचीं अंगें धुतलीं. त्याच दारिद्र्याच्या पताका अंगावर चढवून ती कांहींशा अभिमानानें आबाकडे पाहूं लागली. एवढ्या खटपटीनंतरही त्या कुणांत कांहीं फरक पडला नव्हता. त्याला चरका बसला. पण आईच्या केविलवाण्या हंसण्यानें त्याचें मन कातर झालें.

" देवा, यांनाच मी आईबाप म्हणेन. मला कुणी नाहीं. हींच माझीं. या माझ्या आईला, बापाला, भावंडांना सुखी करण्याची ताकद दे. "

चांगुणा भरल्या मनानें वावरत होती. आबा विचारांत गुरफटला होता. बारा वर्षांच्या विदूरतेनें परक्या परक्या वाटत असलेल्या आईबापांच्या ठिकाणी माया, श्रद्धा, भक्ति वाटायला लावण्याचा मन प्रयत्न करीत होतें. आणि त्या प्रयत्नांत ते अधिकच दूर जात होते. पण मायाबंध कुठेंच नसलेला आबा पुनः पुनः समोरच्या बाईकडे पाहून आई धुंडीत होता आणि पुरुषाकडे पाहून बाप शोधीत होता.

चांगुणेनें मागून आणलेलें, सांचवल्याने आंबलेलें, वाळलेलें अन्न खाऊं घातलें. हें सारें करतांना तिला एकच ईर्षा होती. आणि एकच आनंद होता. सुखाचे दिवस पाहणाराला दुःखाच्या दिवसांचें दुःख. तिनें बिचारीनें तें सुख कुठें पाहिलें होतें ? चांगले कपडे, सुग्रास अन्न, सोईचा निवारा,

तिच्या देहानें कधीं अनुभवला होता ? चांगल्या वाड्यांत नि कपड्यांत वावरणारीं माणसें तिच्या दृष्टीपुढें वावरत. पण तें स्वप्नाचें जग. आपल्या वाडींत येतांच बिचारें विरायचें. तिच्या स्पर्शाचें जग तेंच तिचें नि तेथें दारिद्य छत्रचामरें मिरवीत होतें. स्वप्नमय जगाचें वारें तेथे आले कीं स्वच्छता, टापटीप, नीटनेटकेपणा त्या जगांत होई. पण बोलून चालून तें वारेंच. तें कांहीं क्षणच टिके.

आबाच्या चुलत्याला पलटणींत नोकरी होती. त्यानेच आबाला बोर्डिंगात ठेवलें होतें. आबा बोर्डिंगांतून आला होता. कृत्रिम वातावरणांतून आला होता. त्याच्या आयुष्याचीं सतत बारा वर्षे त्यानें तेथें काढलेलीं होतीं. घरीं जायला यायला पैसे नाहींत. पत्रानेच काय ती भेट. तीही एकतर्फी. त्याच्या घरून पत्र येणें कसें शक्य होतें ? कोण लिहिणार ? कोण लिहून देणार ? तरी कधीं काळीं बाप लिहिणावळीचा अर्धा आणा, कार्डाचा पाऊण आणा खर्च करी. त्या पत्रांतून " तूं एकदां भेट. आम्हांला कुनाला नोकरी धंदा न्हाई. पोटापान्याची लई अबदा चालली हाय. " अशा सांच्याचा मजकूर असे. पण तें घरचे पत्र आबा पुनः पुनः वाची आणि ' ठेवा ' म्हणून जतन करी.

त्या बोर्डिंगांत जातिभेदाला वाव नव्हता. चांभार, महार, मांग, धेड, मराठे सुद्धां त्यांत होते. बोर्डिंगच्या नियमाप्रमाणें एका छापाची सर्वांची राहणी, अन्न, स्वच्छता, शिक्षण. त्यांत जातिभेद विलयाला गेले होते. शिक्षक पुढारलेले. त्यांनीं मुलाना आचारही पुढारल्या पंथाचा शिकविला होता. तोच आबाच्या अंगवळणी पडलेला. त्यांत आणि या त्याच्या घरांत काय साम्य होतें ? मातीचेच देह तेथील माणसांचे आणि येथीलही. याखेरीज ?

सकाळीं उठल्यापासून रात्रीं झोप लागेपर्यंत क्षणाक्षणाला त्याच्या मनाला चीड भरे. स्वच्छ खोली. ऐसपैस जागा. त्यांत पातळसा कांबळ्याचा स्वच्छ बिछाना. स्वच्छ तांब्या-स्वच्छ पाणी. स्वच्छ कपडे–अन्न–भाषा आणि इथे ? इतके दिवस कुठल्या आभासाचें त्याचें जग होतें ?

घराकडे तो धांवत आला. तें घर म्हणजे एका माणसाला हातपाय पसरून निजतां येईलशी झोपडी. त्यांत रांगत जावें लागे असें कवाड. खिडकी नाहींच. कुडांतून जाळ्या-जळमटें, कीड-मुंगीची रहदारी. मडक्यांत न झाकलेलें अस्वच्छ पाणी. मालिन कपड्यावर पसरलेलें अमंगल अन्न-अमंगल

माणसें. तो पहिले कांहीं दिवस मायेमुळें बोलला नाहीं. पण अग्नीची धग जाळून तरी शमते. दारिद्र्याची धग जाळूनही शमत नाहीं. त्या आगीनें नव्यानें जळत तो एकेक दिवस काढीत होता. कुणाशीं बोलायचं ? काय ? तेथील शिक्षकांनीं अंतरंगांत सारखी पेटत ठेवलेली ज्योति. आणि इथें मुर्दाड बनलेलीं अंतःकरणें नि मनें. आणि मग एक दिवस आला. माया जळून खाक झाली कीं काय ! शीः काय ही आई, काय हीं भावंडं ! तीं तरी किती ? अकरा ! त्यापेक्षां घर सोडून कायमचें निघून जावें. असें पिचायचें नि तसेंही पिचायचें.

● ● ●

## ७

गेन्याला वाटे, मुलगा जरी सहा इयत्ता शिकला असला तरी तो लहान आहे. त्याला नोकरी कशी मागावी तें कळत नाहीं. आपण स्वतःच गेलेलें बरें. आबाला बापाचा वेडेपणा दिसत होता. तरी तो नाइलाजानें ओढला जात होता.

गेन्याला अजूनही एक आशा होती. आपला मुलगा वस्तीच्या शाळेत मास्तर होईल. कामाला सुटी असेल त्या दिवशीं तो बंगल्यावर जाणार. तो दिवस रविवारचा असणार. डगनबाईसाहेबांचा माळी आपल्याला सुटीचा दिवस म्हणून हांकून देणार. हें सगळे गेन्याला माहीत होतें. तरी गेन्या दर रविवारीं बंगल्यावर जाई आणि कुंपणाबाहेर उभा राही. त्याच्याकडे कुणी लक्ष देत नसे. बाईसाहेबांच्या बंगल्यावर जाण्याची बंदीच होती. बाईसाहेबांचा माळी गव्हाणींतील कुत्र्यासारखा वसकन् त्याच्या अंगावर येई. गेन्या आणि त्याच्या पाठीमागें व्ह. फा.चें सर्टिफिकेट घेतलेला आबा पुटपुटत, तडतडत माघारीं जात.

तीन चार रविवार गेले. आतां आबाच्या नोकरीसाठीं त्याने म्युनिसिपालिटीचा खाडा करायचा असें ठरविलें. अठरा वर्षांच्या आबाला काय,

कुणीही धुडकावून देईल. आपणच स्वतः त्याच्याबरोबर जाऊन नीट रीतीनें बोललों तर आबाला नोकरी मिळेल. कामाचा एक खाडा केला कीं बारा आणे जाणार. पण आबाला नोकरी लागली म्हणजे त्याला तीस रुपये मिळतील. गेन्याला आशा होती. बारा आणे नाहीं की एक दिवस सगळ्यांच्या पोटाला टांच. पण गेन्याला आशा होती कीं शाळेच्या हपीसांत बाईसाहेबांची गांठ पडली की आबाला नोकरी मिळणारच. आबाइतका शिकलेला त्या चोर-वस्तींत कोण होता ? होतीं ती पोरें खिस्ती झालेलीं. सारीं नोकरीला लागलीं.

त्यानें शेवटीं आडवारी कामाचा खाडा केला आणि तो बाईसाहेबांच्या हपीसावर गेला. त्याची आणि बाईसाहेबांची भेट जवळून कित्येक दिवसांत झाली नव्हती. होणार कुठून ? बेकार होता, तेव्हां काम शोधायला बाहेर पडे. संध्याकाळीं माघारा येई आणि काम लागल्यावरही तेच. हजेरीमुळें अॅ. मॅनेजर बंगडींच्या ऑफिसकडे मात्र रोज जावें लागे. दोन दोन तास मॅनेजरची डरकाळी त्याला ऐकावी लागे. बाईसाहेब दुरून कधीं दिसतील तेव्हा. पण आज बाईसाहेबांच्या पुढें तो उभा राहिला. त्याने गयावया केलें. आबानें गयावया केलें. आळीपाळीनें दोघे बोलत होते. पण बाईसाहेबांच्या कपाळाची आठी कमी झाली नाहीं.

"माझ्याकडे नोकरी नाहीं. मला न पुसतां तूं त्याला बोर्डिंगांत पाठवलास. आतां नोकरी माझ्याकडे मागण्याचें काम नाहीं. पुनः तूं येथें येऊं नको. मॅनेजरसायबांना सांगून बंदी करीन."

मिस् डगन् निश्चयपूर्वक आपल्या मराठी भाषेत म्हणाल्या आणि आंत निघून गेल्या. आतां तेथें उभे राहणे हें भिंतीवर डोकें फोडून घेण्यासारखेंच होतें. गेन्याला जणूं निराशेनें उन्माद आला होता. त्यानें खाडा करून आजची मिळकत बुडवली होती आणि आबालाही नोकरीची आशा नव्हती. मग आतां काय करणार ? आपण होऊन होय म्हणत नाहींत ? मग कंटाळा येईपर्यंत आळवीन. भिक्षेकऱ्याच्या केडग्या आळवणीनें त्रासूनसुद्धां पैसा मिळतो कधीं कधीं. बाईसाहेब आंत निघून गेल्या तरी गेन्या त्यांना आळवीत हांका मारीत राहिला. मिस् डगनला हें नित्याचें होतें. पण एकदां

त्यांनीं पाठ फिरवली म्हणजे पट्टेवाला पुढील काम बजावीत असे. पट्टेवाल्यानें गेन्याला आवाराबाहेर काढलें.

गेन्याला गचांडी, धक्के यांची नवलाई राहिलेली नव्हती. आणि निराशेनें असहाय बडबड करून मनाला शांति आणण्याचा प्रयत्नही नवा नव्हता. पण आज त्याला डगनबाईना बघून जखमेवरची खपली काढल्यासारखे झालें. आबाला नोकरी न मिळायला हेच कारण. त्याला संताप आला. तो पुटपुटत चालला.

" किरिस्तावांची दुनिया झालीया. आमची मरीआई बी बघूनशानी घील. मुलाला किरीस्ती काय म्हून करीन? तुझ्या पोटांतून तर न्हाई आला? माझा ल्योक हाए. "

गेन्यानें त्या दिवशीं चोर-वस्ती (सेटलमेंट) वसवणाऱ्या 'तार' साहेबापासून सगळ्या अंमलदारांचा मनमानेसा उद्धार केला!

● ● ●

## ८

आबाचा बाप रस्ते झाडायला जात असे. तेथेंही त्याने आपल्या बरोबरच्या माणसांत यथेच्छ बडबड केली. पण मोकाट कुत्रीं भुंकत राहिलीं आणि लोकांना ऐकवत नाहींसें झालें कीं ते 'हड्' म्हणतात नाहीं तर एक धोंडा मारतात. गेन्याच्या बडबडीचा काय फायदा होता? इतरांनीं त्याला हांकललेंच पण मांग लोक त्याच्याबरोबर मोऱ्या उपशीत होते, ते कंटाळून गेन्याच्या तोंडावर म्हणाले, " अर सात बुकं सात बुकं करून वराडतोस? तुझा पोरगा शिकवाया आला तर हामच्या पोरांना काय शिकवनार र गारुड्या? आपल्या आपल्या पायरीनं वागावं. " पण कुणा एकाला सहानुभूति वाटत होती.

तो म्हणाला, " अर, मडमेची चिठी न्ये कीं मुंशीपाल्टींत नोकरी लागल."

" अर ती रांड चिठी बी देती कीं नाय कुनास ठावं."

" चिठी द्याया काय व्हत रं. काम न्हाई दिलं तरी बी चिठी द्यायला 'न्हाई' न्हाई म्हनायाची."

गेन्याला केव्हा कामावरून घरी जातोसें झालें. डगन् मडमेची नाहीं तर रिपनसाहेबाची चिठी मिळवूं. त्याच्या मनाला केवढी आशा वाटायला लागली. तो घरीं आला. आबा कुठेंसा भटकत होता. त्याला शिव्या हांसडून त्यानें " डगनबाईकडे जाऊन उद्यां चिठी आन. मग मुंशीपाल्टींत नोकरी घेत्याल." म्हणून सांगितलें. पण आबा नुसता भटकत राहिला. डगन्कडे जावेसें त्याला वाटेचना.

● ● ●

## १

म्युनिसिपालिटींत अॅ. ऑफिसर बोंगाळे टेबलावरच्या कागदांतून नजर काढून वर पाहूं लागले. ते चकित झाले—हा माणूस कशाला ऑफिसमध्यें आला ? त्याच्या नेसूं काय होते तें ? मासे पकडायचें जाळें तर नाहीं ? धोतराला अनंत गांठी होत्या त्याच्या. काळ्या मांड्यांवरील मळकट केस दिसत होते. उंच सहा फुटांचा देह. त्या देहाची धोतरानें विटंबना चालवली होती. आळ्यावर कसाबसा आधार घेतलेला कपडा म्हणूनच त्याला शर्ट म्हणणे भाग होतें. त्यांतून उघडया छातीचा कोनाडा दिसत होता. बरगडयांचा पिंजरा मळकट केसांमुळें लपला होता. वाढलेल्या दाढीनें बसलेल्या गालफडांची अब्रू संभाळण्याचा प्रयत्न चालवला होता. डोळे खोल गेलेले—पाणी आटलेले. गेन्याकडे पाहून बोंगाळ्यांना कांहीं कल्पना करतां येईना. आबा त्याच्यामागें उभा होता. त्याच्याकडे पाहूनही बोंगाळ्यांच्या नजरेला आनंद झाला नाहीं. अर्थबोध झाला नाहीं.

"काय बाबा ?"

" सरकार, माझ्या मुलाला शाळंत लावून द्या सरकार."

" एवढया मुलाला शाळेंत घालणार ?"

" नव्ह मायबाप; माझा मुलगा सात बुकं पास झालाया. त्याला मास्तर म्हून घ्या. "

बोंगाळे कांहींसे चकित झाले. त्या दरिद्री माणसाचा मुलांवर वचक काय राहणार ? त्यांनीं गेन्याचें प्रकरण मनानें निकालांत काढलें.

" अरे मास्तरची जागा शिल्लक नाहीं. "

" असं करू नका मायबाप. कच्चीं बच्चीं अकरा पोरं खायचीं. "

" अकरा ! अकरा पोरं निर्माण रे कशाला केलींस ? जगावर उपकार करायला कीं पोरांवर ? " ते लिहितां लिहितां म्हणाले.

क्षणभरच त्यानें चोरट्या, ओशाळ्या नजरेनें मुलाकडे आणि बोंगाळ्यांकडे पाहिलें आणि हताशपणें मान खालीं घातली. बोंगाळ्यांनाही आपण नको तें बोललो असें वाटलें असावें. त्यांना स्वतःच्या सात पोरांची आठवण होऊन तेही ओशाळले. त्यांनीं कागद चाळायला सुरुवात केली.

गेन्याला गूढ पडलें कीं इतरांना पोरें का होत नाहींत ? मलाच का झालीं ? पण मुलें पदरीं असणें ही देवाची कृपा नाहीं का ? हे लोक असें कसें बोलतात ? माझीं अकरा पोरं मरीआईच्या दयेनें सगळीं जितीं आहेत. त्याला बोंगाळ्यांचा राग आला. पण त्याच्या चेहऱ्यावर लाचारीशिवाय कांहीं शिल्लक नव्हतें.

बोंगाळ्यांनीं थोड्या शरमेनें टेबलावरच्या कागदांत खुपसलेली नजर वर करून कांहीं तरी बोलायचें म्हणून म्हटलें, " बघूं तुझं सर्टिफिकीट. " आबाला आशा वाटूं लागली. तो एकदम पुढें झाला. त्यानें सर्टिफिकीट बोंगाळ्यांच्यापुढें ठेवलें.

त्यांच्याकडे पहात तो म्हणाला, " मी गांधी-सेवा मंडळाच्या बोर्डिंगांत होतों. "

बोंगाळे—तूं कोण जातीचा ?

आबा—मी मांग-गारुडी आहे.

आबा स्पष्टपणें धीर गंभीर आवाजांत ब्राह्मणासारखा उत्तरें देतांना पाहून गेन्याला धन्यता वाटली. आबाच्या आणि बोंगाळ्यांच्या प्रत्येक शब्दागणिक

त्याच्या चेहऱ्यावर केविलवाणे हंसूं खेळत होते आणि मान विनाकारणच केविलवाणी लाचार हालचाल करीत होती. बोंगाळेही आश्चर्यानें आबाकडे पहात होते.

" राहतोस कुठे ? "

" चोर-वस्तीवर. "

बोंगाळ्यांना एकदम कसेसेंच वाटले. " चोर वस्तीवर ? "

" होय महाराज. दुर्दैवानें मी त्या जातींत जन्माला आलो आहे. पण माझीं सगळीं वर्षे चोर-वस्तीबाहेर चांगल्या लोकांच्या मुलांतच गेलीं आहेत. "

त्याचें अस्खलित भाषण ऐकून बोंगाळे स्वतःशीं म्हणाले, " चोर जात बोलण्यांतही चलाख किती असते ! शें. चाळीस मार्क ! अरे वा ! " आबाचें सर्टिफिकीट पाहून बोंगाळ्यांचें मन द्विधा झालें होतें. हरिजनांना नोकऱ्या द्या म्हणून सरकारी हुकूम होते. पण शाळांतून हरिजन मास्तरांची रया राहात नव्हती. हरिजन वस्तींतील म्युनिसिपल शाळेंत एक मास्तर आधींच घेतलेले होते. स्पृश्य वस्तींतील मुलांवरही हरिजन नेमण्याबद्दल सूचना होती. पण तेथें हरिजन टिकणार नाहीं ही बोंगाळ्यांची खात्री होती. त्यांतूनही त्यांनीं आबाला घेतलें असतें. पण मांग-गारुडी ? चोर-जातींतला ? उद्यां पोराचीं बुकें नि वस्तू तर नाहीं लांबवणार ? त्यांना आबाला वाटेला लावण्याची इच्छा झाली.

" तुझ्या चोर-वस्तीवरच्या साहेबांची नाहीं तर मडमसाहेबांची चिठी आणशील का ? "

" हो. "

आबाला किती तरी आशा वाटूं लागली. गेन्या लाचारपणें हंसून म्हणाला, " मायबाप, गरिबावर मेहेरबानी करा. लई हाल हैती. पंधरा रुपय मिळल तरी पुरत्याल. " पुनः पुन्हा नमून गेन्या ऑफिसच्या बाहेर पडला. त्याची आशाही बोंगाळ्यांना लवून नमस्कार करून गेन्यापाठोपाठ निघाली.

आतां आबाच्या मनांतील आशानिराशेच्या लाटांनीं त्याला हैराण केलें. चिठी मिळेल का ? चिठी मिळाली तर नोकरी मिळेल का ? एक मन म्हणे, ' होय ' आणि नोकरी लागल्यावरचें पुनः पोटभर अन्न-स्वच्छ पाणी-हवा त्याला दिसूं लागलें. दुसरें मन त्याला तेवढेंच निराश करीत होतें. गेन्या

जेमतेम ऑफिसाबाहेर आला आणि त्यानें आपल्या जिवाच्या ठेव्याकडे कौतुकानें पाहिले.

" आबा, लई हुशारीनं बोललास की र. माझ्या मनानं तर तुला ही नोकरी मिळाया होवी. "

आबा कांहीच बोलला नाही. आशेनें हंसला. आणि वडिलांना वाटणाऱ्या कौतुकानें त्याचे पोट भरलें. ते रस्त्यावर आले. एका हॉटेलाच्या बाहेर उभे राहिले. गेन्याला मुलाचे कौतुक कसें करावें कळेना. त्यानें खिशांत हात घातला. खिशांतून एक अनेक पोचे आलेले डबडे काढलें. त्यांतून दोन पैसे काढले. गयावया करून चहावाल्याजवळ त्याने चहा मागितला. आबाचें हृदय बापाच्या प्रेमळपणानें भरून आलें. पण त्याला कींव आली. बापाचें प्रेम उदार होते. पण दारिद्यानें त्या प्रेमाचा गळा दाबून त्याला केविलवाणें करून टाकलें होतें. बापाच्या केविलवाण्या नजरेकडे, केविलवाण्या याचनेकडे पाहतां पाहतां आबा संकोचला. त्याला तें कांही कांहींही नको होतें. त्याला म्हणावेसें वाटलें,

" बाबा, नको चहा. "

पण तो बोलला नाहीं. तेवढ्यानें बापाचें मन मी दुखावीन. नकोच. त्याला बापाच्या मायेला तितक्याच मोकळेपणानें साद देतां येईना. एकाद्या त्रयस्था-सारखा तो ती केविलवाणी माया पहात होता. आणि म्हणूनही त्याला वाईट वाटत होतें. पाण्यांत राहून जळाशीं वैर करणाऱ्या त्याच्या मनाचे तुकडे होत होते. आणि तो असहाय होत होता.

त्याच्या बापानें पुनः गयावया करून चहा मागितला. आंत हॉटेलमध्यें बसून चहा पिणाराइतकेच पैसे तो देणार होता. तरीही त्याला आपल्याला हांकलून देतील ही भीति वाटत होती. त्यानें पोऱ्याला चार चार वेळां हांक मारली, तेव्हां पोऱ्यानें वस्कन् ओरडून भिकाऱ्यासारखा त्याला चहा वाढला. आबाच्या मनाला धार आली होती. पण तो गप्प बसला. गेन्याच्या मोरी उपसणाऱ्या हातांतील लक्ष्मी मात्र हॉटेलवाल्याच्या तिजोरींत बिनबोभाट जाऊन बसली. गेन्यानें आबाला किती प्रेमानें चहा पाजला. आबानें खूप आग्रह केला तेव्हां गेन्यानें एक घोटभर चहा घेऊन टिन्पाट आबापुढें धरलें. आबाही चहा प्याला. केवळ बापासाठीं. पण जागोजाग घाणीसारखा वागवला जात

असतां एकीकडे आबाचें मन करपून मोठमोठ्यानें रडत होतें. ' मीं काय पाप केलं म्हणून या जातींत जन्माला आलों ! यांतून सुटका नाहींच का ? '

● ● ●

## १०

आबाला डगन्‌बाईचें तोंड पाहण्याची इच्छा नव्हती. चोर-वस्तींतील गरिबांचा कोडगेपणा तो विसरला होता. बोर्डिंगांत राहून त्याच्या अंतःकरणांतील स्वाभिमानाला जाग आली होती. पण इकडे बापाची तडफडही त्याला दिसत होती. आईबापांच्या दुःखानें त्याला वेदना होत होत्या. त्याला घर सोडून पळून जावें असें क्षणाक्षणाला वाटे. पण त्रिभुवनांत एकुलती एक माया त्या दरिद्री आईबापांच्या रूपानेंच वसत होती. बोलली मायेचा शब्द तर तीं आईबापेंच. बाकी जगांत तो कुणाकुणालाही नकोच होता. नाइलाजानें तो शाळेच्या ऑफिसापाशीं तिष्ठत राहिला. कितीक लोक तेथें तिष्ठत होते. हांकलले जात होते. चिडीनें तो सारें पहात होता. पट्टेवाल्यानें त्याला हांसडून " काय रे ? " म्हणून विचारलें. " बाईसाहेबांना भेटायचं आहे. " आबा उत्तरला.

" नोकरी न्हाई म्हून सांगितलं तर पुनः पुनः कशाला मरतुयास ? "

" नोकरी मागायला नाहीं आलों. चिठी घ्यायला आलोंय. "

" चल मग." तितक्याच अरेरावीनें ओरडत पट्टेवाल्यानें आबाला हपीसांत ढकललें. त्याला पाहून डगन्‌बाईच्या कपाळाला आंठ्या पडल्या. त्या पाहून आबाला चीड आली. तो उदासवाण्या चेहेऱ्यानें म्हणाला, " बाईसाहेब, मला एक चिठी द्या. मी म्युनिसिपालिटींत नोकरीची खटपट करतों. "

पण मिस् डगन्नीं नकार दिला. " मी चिठी देणार नाहीं. तुझें वर्तन ठीक नाहीं. "

आबावर आकाशच कोसळलें. आबा बोर्डिंगांतून आला, तेव्हां त्याचें मन पतंगासारखें उंच उंच झोके घेत होते. वस्तीवर शिकलेले लोक नाहींत.

मांग-गारुड्यांत त्याच्याइतके शिकलेले कोणीच नाहीं. चोर-वस्तीवरील काम-गारांना माझें कौतुक वाटेल. त्यांना आश्चर्य वाटेल कीं लहानसा आबा जो गेला तो चोऱ्या करीत नव्हता. शिकत होता. सात इयत्ता शिकला. त्याला किती चांगली रीत लागली.

त्याला म. गांधींचें नांव माहीत होतें. डॉ. आंबेडकरांचें नांव माहीत होतें. राजभोजांची त्याला चांगली माहिती होती. काँग्रेसचें नाव त्याला कळले होते. मोठमोठ्या लोकांचीं व्याख्यानें त्यानें ऐकलीं होतीं. बोर्डिंगांत येणारे त्या सगळ्यांचे कौतुक करीत. " मी चोर-वस्तीत जाईन. माझें कौतुक होईल. मला नोकरी मिळेल. मग मी माझ्या वस्तींतील लोकांना सांगेन, ' शिका. शहाणे व्हा. रयतेसारखे वागा. आपली राहणी, बोलणीं, विचार-सरणी बदला.' " त्याच्या मनानें उंच मनोरे बांधले होते. आत्मविश्वास शिगेला पोहोंचला होता. आणि आतां हें काय ? हे अधिकारी लोक म्हणत, " तुम्ही शिका. प्रामाणिक व्हा. तुमचें कल्याण होईल. " " मी गुन्हेगार जातीचा कलंक धुऊन टाकला नाहीं का ? अधिकाऱ्यांनीं सांगितलें तें तें करून आलों नाहीं का ? " एकुलता एक पण भांगेत तुळस उगवावी तसा उगवूनही आबाकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं. उलट उदासीनता इतकी कीं अवमानसा वाटावा. आबाचें मन कातर झालें. हेच का शेवटीं ? यासाठींच का मी धडपडलों ? आणि आतां पुढें ? बिचाऱ्या आबाला तूं हें नाहीं तर तें कर म्हणून सांगणारेंही कोणी नव्हतें.



## ११

मिस् डगननें त्याला कां नोकरी द्यावी ? त्याला कां चिटी द्यावी ? त्यानें तिचें ऋण स्मरलें होतें का ?

गेन्याची मनाची गरिबी मिस् डगनच्या चटकन् नजरेंत आली होती. तेथें अन्न-वस्त्राची गरिबी सगळ्यांचीच होती, पण गेन्याच्या गरिबीला

आणखीही झिलई चढलेली होती. गेन्या चोर-वस्तींतला मांग-गारुडी. स्पृश्य हिंदु समाजानें चोर-वस्तींत नसणाऱ्या मांगांनासुद्धां गांवच्या शिवेवर टाकलें होते, तिथें मांग-गारुड्याला कसला आसरा ? गेन्याला दरवर्षी मुलें होत. ज्या चोर-वस्तींत माणसांच्या जिवांची पेठ लुटायला सारे रोग नित्यशः हजर असत, तेथेंही गेन्याचीं सगळीं मुलें जिवंत होतीं.

मिस् डगन् गेन्याला विशेष कनवाळूपणानें वागवीत होती. ती वस्तींत गेली कीं त्याच्या बायकोची—मुलाबाळांची विशेष आस्थेनें चौकशी करी. उघड्या-नागड्या अंगावर नाताळच्या दिवसांत तिनें कपड्यांचीं पांघरुणें घातलीं होतीं.

मिस् डगन्‌ला गेन्याची फार कींव येई. निवळ अस्पृश्य म्हणून त्याची किती दैना उडत होती. वस्तींतसुद्धां. गिरणींत धागा तोडतांना अस्पृश्याचे दांत लागलेले चालत नव्हते. आणि यासाठीं त्याला गिरणींत नोकरी मिळत नव्हती. चोर-वस्तींत ( सेटलमेंटमध्ये ) झाडझुडीचें काम रिपनसाहेबांनी दिलें. या दिवशीं गेन्याला धन्यता वाटली. ती दहा रुपयांची नोकरी मिळण्यापूर्वी तो भीतीभीतीनें मडम्‌साहेबांपुढें दहा वेळां लवतच होता, तो आणखी कृतज्ञतेनें वांकून सलाम करूं लागला.

मिस् डगन् म्हणे, " तुमी आपलीं मुलें शाळेला पाठवावीं. प्रभू तुमच्या मुलाबाळांचें कल्याण करील. "

म्हणून गेन्या सहा वर्षांच्या आबाला शाळेंत पाठवी. चांगुणाही सेटलमेंट-मध्यें झाडझुडीचें काम मागत होती. गेन्याचें वर्तन रिपन् आणि डगन् यांच्या दृष्टीनें चांगलें होतें; कारण तो कधीं विरोध करीतच नसे, उलटून बोलत नसे. गुरा सारखें काम पडलें तरी चुकारपणा करीत नसे. मांग-गारुड्याचा कठोरपणा त्याच्यांतून कुठें लुप्त झाला होता कोण जाणे ! त्या सर्वांचें फळ म्हणून चांगुणेलाही नोकरी लागली; तेव्हां तीं दोघेंही नवराबायको कृतज्ञतेनें भारावून गेलीं.

" प्रभूच्या कृपेचें हें फळ आहे. तो चांगल्याला चांगलें फळ देतो. " मिस् डगन्‌नें समजावून सांगितलें.

सारीं घडघडत होतीं. चांगुणा कामाला जाई. घरांत लहान पोरें. कधीं

कधीं बारक्या पोराला ती पाठीवर बांधून घेई. पण त्याच्या वरचें मूल संभाळायला कुणी नव्हतें.

डगनूबाई म्हणत, " दयाबाई तुझीं मुलें संभाळील. "

पण दयाबाईचा विश्वास धरण्यापेक्षां ती झोपडीत खेळली रडलीं तरी ठीक असें चांगुणेला वाटे. नाही तरी सगळ्या झोपड्यात सगळी लहान मुलें अशीच दिवसाची आईविना रडत, झोपत; रडत, जिवंत रहात. कुणा शेजारच्या म्हातारा-म्हातारीला आली कींव तर ती समजूत घाली; नाही तर देव पहातच होता.

पण हिंवाळा आला. मुलांना सर्दी, पडसें, खोकला, ताप. मुलें संभाळायला कुणी नव्हतें. तान्ह्या आजारी मुलाला नुसतें एकटें टाकून चांगुणेला जाववेना. तिनें मग आबाला शाळेचा खाडा करायला लावलें. तिनें खाडा केला तर पोटाची आबाळ होईल. शाळेच्या खाड्यानें काय होणार होतें? आबाचे खाडे वाढूं लागले. मडमसाहेब ताकीद देऊं लागल्या. चांगुणेच्या पोटांत धस्स झालें. गेन्याच्या पोटांत भय उठलें. पण आबाला घरीं ठेवल्याखेरीज उपाय नव्हता. एक दिवस मडमबाईंनीं आबाला बोर्डिंगांत ठेवण्याचा निश्चय केला. आबाला शिपायांनीं धरून बोर्डिंगांत ठेवलें.

गेन्या-चांगुणा घरीं आलीं. त्यांना कळलें. आबानें रडून आकांत केला. मडमबाईनीं त्याला एक छडीही मारली. तेव्हां तो गप्प बसला होता पण धांवत आलेल्या आईबापांना बघून त्याचें हृदय जणुं फुटलें. त्यांच्याही डोळ्यांत पाणी आलें. त्यांनीं मडमेजवळ शपथ घेतली. ' आतां उद्यांपासून मुलास शाळेला पाठवला नाहीं तर टाका बोर्डिंगांत ' मडमेनें आबाला सोडलें.

आबा घरीं गेला. आणि त्याच रात्रीं आबा जो गेला तो गेलाच. त्याच्या चुलत्यानें त्याला रातोरात नेला. आबाबरोबर मडमसाहेबांची मर्जीही गेली.

त्यांनीं मडमसाहेबांना विरोध कां केला? विरोध म्हणजे दुर्वर्तन. अशा दुर्वर्तनी माणसांना नोकरी दिली असती तर साऱ्या चोर-वस्तीची शिस्त बिघडली असती. थोड्याच दिवसांत दोघांची नोकरी गेली. " हवें तर खडी फोडायला जा, " म्हणून त्यांना सांगण्यांत आलें.

गेन्याला पश्चात्ताप झाला. पण त्याला रागही आला. पोटाची खळगी भरेना. पोरासोरांची मारझोड वाढली. गेन्या-चांगुणा अधिकच भांडत. कावत. त्यांची चांगलें वागण्याची धडपड जात चालली. याचना, विनवणी, माफी—कशानेंही नोकरी लागेना. आतां तीं कुणा कुणा मुलाला नीट शाळेंत पाठवीतना. शाळेंत जाऊन तरी काय होणार होतें? आतां तीं स्वच्छही रहातना; स्वच्छ राहून काय होणार? पोट तर नाही भरत.

निराशेनें नि भुकेनें मुर्दाड घाणेरडेपणा त्यांच्यांत बाणला. तीं आजारी पडत. दयाबाई, आशाबाई त्यांना बळजबरीने दवाखान्यांत नेत. दवाखान्यांतून आणलेलें औषध चांगुणा झोपडीच्या कुडामागें रोज ओतून टाकी. जाखाई—जोखाईच्या, म्हाळसेच्या अंगाऱ्यानेंच पोरें बरीं होत होतीं. पटकी, हींव, कांजण्या, गोंवर, देवी आणखी कितीक रोगांतून तिचीं सगळी पोरें अंगाऱ्यानेंच बरी झालीं होती. कुठला प्रभू नि काय! चांगुणा, गेन्या हट्टीपणा करतात असें दयाबाई, आशाबाई म्हणूं लागल्या.

मग मिस् डगनने तरी त्याला चिठी कां द्यावी? नोकरी कां द्यावी? गेन्याने तिचा जाणूनबुजून अपमान केला नव्हता का? तिनें गेन्यावर लोभ केला होता. त्याला नि त्याच्या बायकोला अन्नाला लावलें होतें. त्यानें थोडी तरी कृतज्ञता दाखवावयाची!

मिस् डगनची काय अपेक्षा होती? गेन्या सुधारला, त्याचीं बायकामुलें सुधारलीं तर ती त्यांनाच स्पृश्य जगांत आणून सोडणार होती. तिला स्वतः-साठी कांहींच अपेक्षा नव्हती. ती हजारों मैलांवरून येथें आली. ती कशा-करिता? स्वतःच्या फायद्यासाठी? सर्वस्व सोडून ती या दलितांचा उद्धार करायला आली होती. त्यांच्या मुक्तीसाठीं ती धडपडत होती. गेन्यानें विरोध केला नसता, तर तिनें त्याला सन्मान्य धर्मांत सन्मान्य स्थान मिळवून दिलें असतें. मग त्याला चोरजातीचा म्हणून कोणीही म्हटलें नसतें. पण गेन्यानें आयत्या वेळीं दगा दिला. ज्या क्षणीं डगन्—रिपनला वाटलें कीं गेन्या विरोध करीत नाहीं, आपण सांगूं तसा वागतो, त्याच्या कुटुंबाला जी रीत लावूं ती लागेल त्याच क्षणाला त्यांच्या त्या विश्वासाचा घडा गेन्यानें ठोकरीनें फोडला. आबाला रातोरात दुसरीकडे पाठवलें. चुलत्यानें त्याला परस्पर सेवाग्रामांत पाठवलें. आणि तेथें तर गांधीचा फोटो!

डगन्‌च्या अंतःकरणांत प्रभुकृपेशिवाय कांहीं नव्हतें. पण राजकारणी पुरुषाच्या नांवानें चाललेल्या बोर्डिंगांत आबाला पाठवून गेन्यानें तिच्या कोंवळ्या मनाला केवढा धक्का दिला होता! आतां आबा हा कारस्थानेंच करील. गांधींचें नांव घेईल. अराजक माजवील. तिला चीड आली. केलेलें सर्व फुकट गेलें. आतां गेन्याच्या कृतघ्नतेबद्दल त्यानें सोसलेंच पाहिजे. तिनें चोर-वस्तींत स्वच्छता–टापटिपीचें काम करणाऱ्या देखरेखीच्या बायकांनाही गेन्याबद्दल सांगून टाकलें. तो आणि त्याची बायको अवज्ञा करणारीं आहेत, कृतघ्न आहेत. मडम्‌साहेबांनीं हें सांगतांच दयाबाई, आशाबाईही गेन्याच्या कुटुंबावर रागावत. हरघडी त्यांना धारेवर धरीत.

गेन्यालाही कळून चुकलें की डगन्‌ची माया आईची नसून मायावी आहे. 'इतक्या दिवसांचा माझा प्रामाणिकपणा, माझी स्वच्छता, माझें चोख काम यांची किंमत मडमेला नाहीं. माझी मरीआई, वाघोरी आई तिला नको. माझीं पोरं लाल देवळांत न्यायचीं आहेत तिला.' मग एकादा खोंड अवखळ होऊन जागच्या जागीं चौखुरी हुंदडतो तसें गेन्या करूं लागला. त्याला मडम्‌साहेबांचे दावे सहन होईना. मी काय म्हणून आता खरें बोलूं? मुलाना कशापायीं शाळेंत घालूं? मरमरेपर्यंत काम करून रोजाला दोन आणे नि चार आणे घेऊन समाधान कां नि कसें मानायचें? त्याच्या अंतःकरणांतला पशू मेला असला तरी विवेक जागा झाला होता. गेन्या जळफळूं लागला. नाइलाजानें तोंडदेखले अजूनही तो हंसत होता. पण आंतून पिळलेलें मन म्हणे, "ही तार, ही हाजरी आन् सायब जाईल तवा बकरा कापीन मरीआईला."

● ● ●

## १२

डगन्‌बाईच्या ऑफिसांतून आबा मावळणीच्या घरीं गेला. मावळणीचें घर तारेच्या कुंपणाबाहेर होतें. मावळणीच्या घरीं त्याला बरें वाटलें. स्वतःच्या घरापेक्षां मावळणीचें घर बरें होतें. आबा मावळणीच्या घरासमोर पारावर

बसला. मंद वारा सुटला होता. तेथेंच सारा दिवस बसावेंसें त्याला वाटलें. घरापेक्षां तो चव्हाटा किती तरी सुखाचा होता. त्याची मावळण डोक्यावर पाण्याचा घडा घेऊन आली.

"अर कार आबा ?"

"कांहीं नाहीं. उगाच."

"अर आंत तरी ये. भाकर खाल्ली का न्हाई अजून ?"

"नाहीं खाल्ली." आंत जाता जातां तो म्हणाला.

"जाईबाई, तुझी झोपडी कशी स्वच्छ आहे ग !"

"मूलबाळ न्हाई घरांत. कोन हाए कोन, कचरा कराया !"

· आबाच्या तोंडावर शब्द आले, "नाहीं तेंच बरं आहे. असून तरी काय उपयोग ? खायला नाहीं, प्यायला नाही, कपडा नाहीं, हवा नाहीं, पाणी नाहीं."

"छीः ! तूं शिकुनशानी ह्ये बोलाया लागलास ?...एक तरी प्वार जगायच ! व्हायाचीं कीं जायाचीं ! सा पोरं गेलीं. आतां कुनाकडं पाहूं ?"

मावळणीच्या डोळ्याला पाणी आले. आबाला वाईट वाटलें; पण आश्चर्यही वाटले. इतक्या दुर्दैवी माणसांनाही मुलेंबाळे असावीं, असें वाटतें तरी कसें ? मी नाहीं लग्न करणार. गुलामांनीं गुलाम जन्माला आणायचे तरी कशाला ? पण तो मावळणीजवळ कांहींच बोलला नाहीं.

"खातुस तुकडा ?"

आबानें मान हलवली. मावळणीनें एका थाळींत त्याला भाकर दिली. तिखट दिलें. आबाला अजून बोर्डिंगचा विसर पडला नव्हता. त्याचें मन तुलना करीत होतें. पण निराशेनें सादरही होत होतें. "मायघरापेक्षां मावळणीचें घर बरें." तुकडे खातां खातां तो मनाशीं म्हणाला. पण इकडे दरिद्री आई बापांची अवहेलना करणाऱ्या स्वतःचा तोच धिक्कारही करीत होता.

"आबा, आता चांगीचं हाल जात्याल."

"कुणाला ठाऊक !"

"चल ! आतां गठुडं आणशील नवं पैशाचं ! त्ये आईला द्येशील नवं ?" ती कौतुकानें हंसत हातवारे करून म्हणाली, पण आबा खिन्न झाला. "का र ? असा सुकूनशानी ग्येलास ?"

" जाईबाई, मला कांहीं नोकरी लागत नाहीं. नोकरी लागली नाहीं तर मी घरांत राहणार नाहीं."

" अन् मग कुटं जानार ? "

" रस्त्यावर फिरणार." आबाला वाटलें, मावळण आपल्याला राहायला बोलावील. आणि मावळण म्हणाली,

" रस्त्यावर फिरनार ? येड लागलंय् काय ? आतां लगीन करूनशान टाक. "

" लग्न ? " आबाला धक्काच बसला. तो उपहासाने हंसला.

" लगीन न्हाई तर काय ! ती संतूची नामी करून घ्ये. "

" हं आणि पोरं झालीं कीं तुला देतो आणून."

" असा कसा बोलतुस र तू !" पण मावळणीला आबाचें कौतुकच वाटत होते.

" आबा ! "

" काय ? "

" तुला तार न्हाई, हाजरी न्हाई. तूं कशापायीं तारंत तडफडतो ? "

" मी कुठें जाऊं ? तुझ्याकडे राहूं ? "

" हां हां ऱ्हा. अन् डब्रोलं मिळव त्यें बी घे आनून." हंसत मावळण म्हणाली. " न्हाई मिळालं तर मावळण तरी कुटून भाकर दील र तुला ? "

" भाकर नाहीं पण बसूं तर देशील का नाहीं इथें ? "

" आतां तुला काय म्हनूं ? अर भाकर बी खा मिळाली तर. घ्ये; आणिक तुकडा घ्ये."

तिनें आबाला आणखी तुकडा दिला. ढेकर देता देतां आबाचें मन म्हणाले, " इथेंच रहा. नाही तुला आसरा मायेचा तर मावळणीचा मिळेल. " तिची माया कुठून कुठूनशी त्याच्या प्रत्ययाला येत होती. बारा वर्षांनंतर आई काय नि मावशी काय दोन्ही माया लावूनच घ्यायच्या होत्या. आईपेक्षां मावळणीकडे त्याचें मन ओढलें.

" आबा, तूं इक्तीं बुकं वाचाया शिकलास, तर शाळेंत मास्तर कां न्हाई व्हत ? "

" कोण देणार जागा ग ? साहेब देत नाहीं. अन् मडमसाहेब पण देत नाहीं. "

त्याच्या कष्टी चेहेऱ्याकडे पाहात ती म्हणाली,

" मर्दावानी न्हाई आबा तूं. अर, या वस्तींत ऱ्हायाचं, म्हंजी हाेंटावर हंसायाचं अन् हिथं खून पाडायच." ती अंतःकरणाकडे बोट दाखवीत म्हणाली, " अर चोर जात आपली. चोरी करायची न्हाई पण शानपन बी गमावतुस काय ? "

आबा तिच्याकडे पाहूं लागला.

● ● ●

# १३

त्या दिवशीं आबा घरीं गेलाच नाहीं. संध्याकाळपर्यंत आबा भटकत होता. शेवटीं बळेंच गेन्यानें त्याला घरीं नेलें. साहेबानें आबाचा अपमान केला म्हणून गेन्याही भडकला होता. पण त्याचें दुबळें मन म्हणालें, " अरे भाकर न्हाई तर झाडझूड बी कराया होवी ! " मग मात्र आबा चिडला. ही आयुष्यांतील शरणागत त्याला पसंत नव्हती. " एकदां झाडू मारण्यांत मन समाधान मानूं लागलं कीं मी खलास होईन." आतां त्याच्या बोलण्यांतील चीड वाढूं लागली.

दिवस वर वर चालला. दारिद्र्याची धगही वाढत चालली. मायेची वाफ होऊं लागली होती. आईबापांचेंही कौतुक ओसरूं लागले. मुलाचें असमाधान त्यांना खुपे. त्याची स्वच्छता आणि टापटिपीची धडपड त्यांना चीड आणी. आत्महीनतेची जाणीव तीव्र होई. " मोटा बामनाचा कार्टा आलास नव्हं ! " म्हणून तींहीं टाकून बोलत. मुलगा बोलतो म्हणजे काय ? दुसऱ्या वरच्या जातींतील कोणीं त्यांना नांवें ठेवलीं असतीं तर तें रास्त होतें. त्याचें कांहीं वाटलेंही नसतें. पण आबा ज्या बाळत्यांत वाढला त्यांच्याकडेच तिरस्कारानें पहातो ? ज्या आई–बापाच्या पोटीं जन्मला, त्यांनाच घाणेरडीं म्हणतो ? ज्या घरांत लहानाचा मोठा झाला त्या घराला ' लहान,' ' कांहीं

तरी घर ' म्हणून नांवें ठेवतो ? ज्या बापाच्या गळां पडून हट्ट धरी, त्याच्या वाढल्या दाढीकडे बघून लाजतो ? " आमाला काय, आमी राजाच्या वाड्यांत बी -हाऊं. पैस कुठं त्ये·आन. ही परटाची—आनलेल्या कपड्याची शानी तूं करनार अन् तूं आमाला म्हननार सवछ -हा, सवछ -हा."

त्याला हें कळत होतें. पण तरीही त्याचं मन आक्रोश करीत होते. नको, नको. नाहीच का आतां यांतून सुटका ?

दिवस चालले. किती ? एक, दोन, तीन, चारच, अंगावरचे पांढरे कपडे मळले. साबण मिळेना. बसला मळ पाण्याने वज्रलेप केला. आठ दिवस झाले. पांढऱ्या कपड्यांच्या चंद्रकळा झाल्या. महिना झाला. सैराट वाढलेल्या कुसळांच्या रानगवतासारखे केस वाढले. आणि नंतर पंधराच दिवसांत त्याला कुणीही निराळा म्हणून ओळखलें नाहीं. ऊठ सूट मावळणीच्या घराशीं तो बसे. त्याचाही गेन्याला आणि चांगुणेला राग येई. तीं तेथें जाऊन तडतडत.

" इक्तीं बुकं लिवाया शिकुनशानी, चार पैस तरी आन ! आतां कंवर बसून खानार—" घरांत एकच तगादा.

मनात धगधगलेला आबा जितक्या कौतुकाचा नि नवलाईचा झाला होता, तितकाच ' उनाड '·नि ' आयतोबा ' आईबापांना वाटायला लागला. इकडे आबाच्या मनांत तुफान उठलें. त्या तुफानानें तो विकल झाला.

• • •

## १४

त्या दिवशीं आबा सारा वेळ अस्वस्थ होता. पुढें शिकायचें तर कुठें नि कसें ? चोर-वस्तींत राहूनही शाळेत जायचें म्हटलें तरी पुस्तकांना लागणारा पैसा त्याच्याजवळ नव्हता. त्याला विनाश्रम भाकरी घालण्याची आईबापांना ऐपत नव्हती. काम म्हणावें तर कामही लागणार नाहीं. साहेबांच्या चिठी-शिवाय रयतवस्तींत त्याचा शिरकाव होण्यासारखा नव्हता. कांहीं धंदा

करायचा म्हटलें तरी पैसा नव्हता. मिळणें शक्य नव्हतें. तो माशासारखा तडफडत होता.

एकदां त्याला वाटे, वाटखर्च घ्यावा कुणाकडून आणि गांधी-सेवा मंडळांतील लोकांना जाऊन भेटावें. ते खात्रीनें व्यवस्था करतील. पण त्याला वाटखर्च तरी कोण देणार ? तो अस्वस्थपणें भटकत होता. कुठें जावें हें सुद्धां त्याला कळत नव्हते. आईबापांच्या खेरीज त्याला निवारा देईल असें कोण होतें ? त्यांची मायाच त्याला आयतोबासारखें जेवायला घालणार होती.

मावळणीचें सत्त्व पहाण्याची त्याला इच्छा होई. पण त्याचा तो धिक्कार करी. केवळ सुखाच्या मागें तर मी नाहीं ? जिथें चांगला निवारा सांपडेल तेथें चिकटायला माझें मन बघतें ! आईबापांचा धिक्कार करतें. स्वतःची पात्रता मला सिद्ध करतां येत नाही. अशा स्थितींत मी माझ्या मनाचे लाड कां करावेत ? हा स्वार्थीपणा नाहीं का ?

तो शून्यपणें रस्त्यावर उभा होता. चर्चची घंटा वाजली. निर्मळ कपड्यां-मुळें उठून दिसणारी मंडळी चर्चकडे जातांना दिसत होती. त्यांचीं विनम्र बोलणीं, हळू आवाज, वागण्यात शालीनता, साहेब अगर मडमसाहेबांसारखे कृत्रिम मराठी बोलण्याची त्यांची पद्धत. आबा सावधानतेनें ऐकूं पाहूं लागला. मडमसाहेबांच्या कृपेनें त्यांचीं अंगावरचीं लक्तरें जाऊन धड कपडे, स्वच्छ कपडे त्यांच्या अंगावर चढले होते. त्यांच्या कृपेनें ते पोटभर भाकरी खात होते आणि त्यांच्या कृपेसाठीं ते खालच्या मानेनें वावरत होते. या खातेऱ्यांत लोळण्यापेक्षां मीही ख्रिस्ती झालों तर ?

सगळी मंडळी चर्चमध्यें गेली. आबाच्या मनांतील कल्लोळांनीं हृदयांत धडधड चालली होती. त्याचीं पावलें चर्चकडे वळलीं. चल. बाट. ख्रिस्ती हो. आतां तुला शिक्षणाला पैसे मिळतील. तो भरभर चालला. देवळांत गेला. अगदीं मागें भिंतीला लगटून कांहींसा भिऊन तो उभा होता. सगळ्यांचें लक्ष त्याच्याकडे गेलें. त्याला कुणी हुसकून दिलें नाहीं. त्याचा अपमान केला नाहीं. तो उभा होता.

पाद्री आला. उच्चासनावर गेला. मराठी भाषेंत प्रार्थना सुरू होती.

साधी, सोपी. आबाला कळण्यासारखी. तन्मयता. शांति. सुसंगत आवाजाचा गोड निनाद. काळे गोरे एकत्र प्रार्थना करीत होते.

आबा भारावून गेला. त्याची चलबिचल झाली. तो ज्या हिंदुधर्माच्या वळचणीशीं उभा होता तेथें त्याच्या धर्माच्या देवाचें दर्शन दुर्लभ झालें होतें. त्या देवाला त्याची सांवली रुचली नव्हती. आणि येथें तो डगन्-रिपनबरोबर होता. त्यांनीं त्याला हांकलले नाही. त्या रामाच्या देवळांतील घंटांचे निनाद त्याला दूर लोटीत होते. इथें चर्चची घंटा त्याला आवडीनें बोलवीत होती. तेथें तो उकिरड्यासारखा फेंकला जात होता. इथें त्याला माणूस म्हणून वावरतां आलें होतें.

प्रार्थना म्हणणारे लोक उभे होते. तोही उभा होता. प्रार्थना संपली. वस्तींतील दोन बायका आपल्या मुलांना घेऊन पुढें आल्या. त्या मुलांना बाप्तिस्मा दिला. आबाला वाटलें आपण पुढें जावें आणि म्हणावें, ‘मी ख्रिस्ती होतों.’ पण कां कोण जाणें! त्याचीं पावलें उचलतना. पहातां पहातां त्याला सारें आठवलें आणि वाटले ‘मी यांच्यांतला नाहीं.’ त्याला डगन्–रिपनकडे पाहून चीड आली. त्याला पाद्र्याजवळ जायचें धैर्य झालें नाहीं.

तो चर्चच्या बाहेर आला. तेथें चर्चमध्यें जमलेले सर्व अधिकारी होते. लहान–मोठ्या मानाचीं स्थानें त्यांना होतीं ‘ मी ख्रिस्ती झालों तर ? तर मी यांच्यापैकींच एक होईन ? मग माझे आईबाप, भाऊ-बहिणी ? तीं चोरजातीचीं राहतील आणि मीं बाप्तिस्मा घेतला म्हणून चोर-जातींतून साव-जातींत जाऊन बसेन !’

त्याला कसेंसेंच वाटलें. आपण किती स्वार्थी आहोंत याची त्याला लाज वाटली. पण लगेच त्याला वाटलें कीं यांत स्वार्थ कसला ? मला संधि मिळाली तर मी मोठा होईन. मी मोठा झालों कीं धर्म कांहीं माझ्या आईबापांना पैसे द्यायला नको म्हणणार नाहीं. आणि असाच स्वतःशीं भांडत स्वतःची समजूत घालीत तो चालूं लागला. पुनः माघारा फिरला.

त्याला वाटे या अधिकाऱ्यांच्या पैकींच कोणी आपल्याला विचारील, “ तूं चर्चमध्यें नेहमीं येणार का ? ”

आणि मग आपण म्हणूं, “ हो.”

आपण होऊन बोलण्यापेक्षां त्यांनीं विचारल्यावर बोलणें बरें. तो आल्या रस्त्यानें पुनः चर्चच्या रस्त्यावर फिरूं लागला. शाळेचे हेडमास्तर एका मास्तराशीं बोलत होते.

" मास्तर, अहो कालच मीं तें स्टूल कारखान्यांत भिंतीपाशीं ठेवलं. नबीला कुलूप लावून किल्ल्या आण म्हणून सांगितलं. मुलं तर माझ्या देखत केव्हांच निघून गेलीं होतीं. मग नेलं कोणी स्टूल ? "

हेडमास्तर—अहो, त्या नबीनंच नेलं असेल !

मास्तर—कुणाला माहीत !

हेडमास्तर—दुसरं कोण नेणार ? हे चोर लोक ख्रिस्ती झाले तरी चोरच. त्यांच्यावर विश्वास ठेवतां कामा नये.

आबाचा उत्साह पार मावळला. स्वतः स्टूल बाजारांत विकून संभावित-पणाचा आव आणणाऱ्या त्या मास्तराचा त्याला वीट आला. नबीला चोर ठरवणें सोपें; कारण तो चोर-जातींतला. त्याच्या नांवावर यांनीं चोऱ्या करून कांटा काढायचा नबीचा ! त्याला आपण उतावीळपणा न केल्याचें केवढं समाधान झालें. आतां तो चर्चपासून झपाट्यानें दूर गेला. पुनः तीच निराशा. काय करूं ? पुनः मन भरकटूं लागलें.

आईबापांचें टुमणें सुरूच होते. दारिद्र्याच्या आगींत त्यांना वाटे, मुलगा खाणीवर दगड फोडायला गेला म्हणून काय होतें ? घटकेंत त्यांना वाटे, रस्त्यावर मातीचीं कामें केलीं म्हणून काय होतें ? त्यांनीं असें म्हटल्यावर आबाला उत्तर सुचत नसे.

तो चिडून म्हणे, " मला पाठवलंत कशाला शिकायला ? इथं राहिलों असतों तर म्हशी भादरायला शिकलों असतों. रस्ते झाडायची लाज वाटली नसती. रस्ते उकरायची, डांबर टाकायची लाज वाटली नसती. शिकायला पाठवलंत अन् आतां माझी अर्धी मुर्धी मान छाटून ठेवलीत. त्यापेक्षां मी तुमचा मुलगाच नाहीं म्हणा."

● ● ●

# १५

गोऱ्या सोजिरांची वस्ती झाडायचें काम चांगुणाला मिळालें होतें. झाडू घेऊन संध्याकाळच्या वेळेला ती झाडीत होती. चारचा सुमार होता. भाटाच्या पोरी बाजाराला आल्या होत्या. त्यांनीं आपलीं गोरीं गुबगुबीत शरीरें रंगीबेरंगी कपड्यांनीं सजवलीं होतीं. चार आणे आठ आणे मिळतील या आशेने त्या सुमेरसिंगाबरोबर सोजिरांच्या वस्तींत येऊन नाच करीत होत्या. सुमेरसिंग डफ वाजवीत होता. कांही शिपाई आरामखुर्च्यांवर बसून तर कांही उभे राहून मोठ्या कुतूहलाने त्या रानवट नाचाकडे पहात होते. बरेच लोक दुरून पहात होते. आबाही पहात होता.

गोरे सोजिर भाटांच्या पोरींकडे किती कौतुकानें पहात आहेत, इकडेच चांगुणेचें लक्ष वेधलें. भाटाच्या पोरींचा नाच हा कांहीं तिला नवलाचा राहिला नव्हता. ती काफी, ती गजऱ्या, मान्या, दंजी सगळ्यांना नाचतांना तिनें कितीक वेळां पाहिले होते. त्या फार वटवट करीत. हंसत. खिदळत. डगनबाईकडे कुणी आले कीं त्याच्यासमोर नाच करीत. रिपनसाहेबांच्या पाहुण्यांसमोर नाचत. डगनबाई भाटांच्या पोरींना कशिद्याचें काम देत. मडमसाहेबांच्या बंगल्यावर व्हरांड्यांत बसून कशिद्याचें काम करतांना त्या लाजत, हसत, खिदळत, मुरडत. हें सारें सारे चांगुणेने अधाशी नजरेनें पाहिलें होते.

त्या पोरींच्यावर डगनबाईची मर्जी आहे, याचा तिला हेवा वाटे. पण तिला कुठें कशिदा काढतां येत होता ? तिला कुठें नाचून करमणूक करतां येत होती ? तिला केवळ दोऱ्या वळायच्या माहीत. पण तिला कांहीं चऱ्हाटाचें काम देऊन डगनबाईनीं मदत केली नव्हती. या भाटांच्या पोरींना मात्र सोजिरांच्या बराकींत नाचायला पाठवलें होतें. नाहीं तर नाहीं. आतां तरी तिला झाडूचें काम मिळालें होतें.

ती झाडतांना थांबली. एकदां ती गोऱ्या सोजिरांकडे आणि एकदां पोरीं-कडे पाही. सोजीर हंसत. त्याच्या हंसण्याकडे पाहून ती कौतुकानें, वेंधळेपणानें

हंसत होती. सहजगत्या तिच्याकडे एका सोजिरानें पाहिलें. ती हंसत होती. त्याच्याच चेहेऱ्याकडे पाहून. आतां तो पुनः पुनः तिच्याकडे पाहूं लागला. तिचेंही लक्ष त्याच्याकडे पुनः पुनः जाऊं लागलें. नाच संपला. सोजिरांनीं फेकलेले पैसे घेऊन वटवट करीत भाटाच्या पोरी गेल्या. ती पहात राहिली. सोजीर आपापल्या मार्गाला लागले. तो सोजिरंही गेला. ती झाडूं लागली.

"ए" तिला आवाज ऐकूं आला. तिने वर पाहिलें. तो सोजिर तिलाच बोलावीत होता. आबाचें तिकडे लक्ष गेलें. ती जवळ गेली. सोजिरानें तिला जवळ बोलाविलें. ती झाडू रस्त्यावर टाकून पायऱ्या चढून वर गेली. सोजिरानें तिला दोन रुपये दाखवले. तिला नीटसें कळलें नाही. पण कांहींसें कळलें. तिला खरें वाटेना. भीति वाटली. पैशाचा मोह अनिवार होता. त्या पैशाकडे पाहून ती हंसली. सोजिरानें तिचा हात धरून तिला आंत नेलें. दार बंद झालें.

आबा तरुण होता. त्याला याचा अर्थ कळत होता. त्याचें अंतःकरण धडधडत होतें. तो तेथेंच उभा राहिला. थोड्या वेळात ती पुनः बाहेर आली. तिचा ऊर धडधडत होता. शरीर कांपत होते. तिनें वरही पुनः बघितलें नाहीं. झाडू फिरवून ती घरीं गेली.

घरीं गेली आणि दुसऱ्या दिवशीं पुनः आली. आज झाडू फिरवतांना तिची नजर भिरभिरत होती. आज तोच सोजिर आला. त्यानें "ए" म्हणून हाक मारली. चांगुणा गेली. दार बंद झालें. आज ती बाहेर आली ती मोठें इरकली लुगडें नेसून. आणि तेंही आबानें पाहिलें.

तें टोपपदरी लुगडें पाहून कुणालाही आश्चर्य वाटलें नाहीं ! ती झाडायला गोऱ्या सोजिरांच्या वस्तींत जाते हें सगळ्यांना माहीत होतें. गेन्या चार पोरांचा बाप होता. चांगुणेच्या टोपपदरी लुगड्याचा अर्थ त्याला कळला. नवरा-बायकोचें भांडण झालें.

" न्हाई तर घरला बसूनशानी न्हाते. आज कुठली भाकर देतोस घे. " चांगुणा म्हणाली.

गेन्यानें थोडा वेळ वटवट केली. आणि तोही शरण गेला. गेन्याच्या घरांत चार आठ दिवस पोटभर भाकर मिळत होती. आबान तीं आई-

बापांचीं भांडणेंही ऐकलीं आणि ती भाकरीही खाल्ली. पण ती पोटांत जळत होती.

रिपन्-डगन् यांनाही टोपपदरी लुगडें दिसलें होतें. त्याचा अर्थ कळला होता. पण नीतीची नि संस्कृतीची ओरड करण्याचें त्यांनीही मनावर घेतलें नाहीं.

आबाला केवढा धक्का त्या दिवशीं बसला. त्यानें दारिद्य, घाण, अडाणीपण या सर्वांसर्वांतून त्याच्या आईबापांच्या मूर्ति मानल्या होत्या. आई-बद्दल त्याला कींव आली होती. त्यानें काल पाहिलें, आजही पाहिलें. उद्यांही तो तेंच पाहील का? आईबद्दलच्या आदराला एकदम ठोकर बसली. त्यानें येशीकडे पाहिलें. तिचें गोरेपण, तिचे पिंगे डोळे, केस, मी असाच तर नाहीं? तो आपल्या काळ्या हाताकडे पाहूं लागला. पहातां पहातां येशी परक्यासारखी त्याला वाटूं लागली. त्यानें आपल्या भावंडांकडे पाहिलें. त्यांत कोणी येशीसारखें नव्हते.

"पण मग आईला कोणा काळ्या माणसानें तर बोलावलें नसेल? ही सारी पलटण माझ्या बापाच्या पदरीं कां आणून घातली या ×× नं?"

आबाच्या मनाला बसलेला मुका मार. मन ठणकत होतें. त्याला कुणाशीं बोलतां येत नव्हतें. त्याला आईबद्दल घृणा आली. त्याला वाटे आतां उपाशीं मरावें पण ही आई बघणें नको.

● ● ●

# १६

जातीला जात न डसतां दिवस-रात्री जाऊं शकतात हें आबानें बोर्डिंगांत पाहिलें होतें. जातीचा विसर पडलेल्या त्या बोर्डिंगांतही जातीचा उल्लेख कधींच होत नव्हता असें नाहीं. एकदां एक मेलेलें वासरूं रस्त्यांत दिसलें. मुलें मुलें जात होतीं.

" अरे आबा ! लेका, फीस्ट आहे ! उडाव ! " कांहीं मुलें म्हणालीं.

बाकीचीं खो खो हंसलीं. आबालाही थोडें शरमल्यासारखें झालें. पण त्यानेंही दुसऱ्या मुलांना असें शरमवलें होतें. मुलें मुलें चटकन् सारें विसरत. अगदीं एकशीं खेळत, जेवत, निजत. बोर्डिंगांत तो समता शिकला. बोर्डिंगाबाहेर जात त्याच्या गळ्याशीं झोंबत होती.

चोर-वस्तींत येऊन खट्टू झालेल्या आबानें मनाशीं निश्चय केला. आतां तो गिरणीच्या रस्त्यानें चालला. मोऱ्या उपसण्याचें काम करण्याचें त्याच्या मनांतही कधीं आलें नाहीं. गिरणीपुढें माणसें घोंघावत होतीं. काम मिळ-वायला धडपडत होती. जॉबरची मूठ दाबून कित्येक आंत शिरतांना आबानें पाहिलें. सेटल्मेंटचा इन्स्पेक्टर मधून मधून हिंडत होता. बाकीचे नुसतीच विनवणी—याचना करतांना ढकलले जात होते. आबाजवळ द्यायला एक रुपयाही नव्हता. तो तीन-चार आठ दिवस गिरणीच्या फाटकाशीं गेला.

शेवटीं एक दिवस त्याने आईजवळ हट्ट धरला. बापाजवळ हट्ट धरला. आरडाओरडा झाला. भांडण झालें. आबानें सांगितलें रुपया भरला तर नोकरी मिळणार आहे. बापाला खरे वाटलें. त्यानें रुपया दिला. त्या दिवशीं जॉबरची मूठ दाबून इन्स्पेक्टरची नजर चुकवून आबा गिरणीत शिरला.

दोन तास झाले, चार तास झाले. भाकरी खायला सुटी झाली. आबा बाहेर आला आणि भाकरी खायला बसणार इतक्यांत चार सहा माणसें त्याच्यावर तुटून पडलीं. " × × × मांग-गारुड्या ! जात चोरतुस ? " आबा अर्धमेला झाला. शिपाई धांवले. आबाला त्यांनीं सोडवलें. पण जात चोरून आंत शिरलेला आबा सगळ्यांच्याच रोषाला कारण झाला. सेटल-मेंटच्या पोलिस सब्-इन्स्पेक्टरनें त्याला एका बाजूला काढून पुनः थोबाडांत दिल्या. आबाची लपवलेली जात उघडीनागडी रस्त्यावर आली. एखाद्या भयंकर पाप्यासारखा तो माघारा गेला.

एका नालीच्या पुलावर काशिनाथ, हणम्या, शिरप्या बसले होते. आबाला पाहून त्यांनीं त्याला हांक मारली. पण आज त्याला अन्नाला मोताद करणारे त्यांचेच भाईबंद होते. आबाला त्यांचाही वीट आला.

" नाहीं बाबा, मला नाहीं यायचं." तुटकपणें म्हणून चालता झाला. काशिनाथ व हणम्या त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले.

● ● ●

## १७

आबाला त्या दिवशीं गांधी-सेवा-मंडळांतील एकेका शिक्षकाची चिडून आठवण येत होती. त्याची चीड वाढतच होती. ही बऱ्या वाईटाची जाणीव या लोकांनीं मला कशाला शिकवली ? आयुष्यभर मला भट्टींत उभें करण्यासाठीं ? त्याला त्या सर्वांचा विसर पडण्याची इच्छा होती.

" मी मांगगारुड्याचा. उकिरड्यांत लोळण्यासाठींच जन्माला आलेला. मी किडा आहें हीच जाणीव मला पाहिजे आहे म्हणजे माझें आयुष्य सुखी होईल."

रात्रंदिवस तडफड करणारें मन त्या सांचलेल्या डबक्यांतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करीत होतें, पण त्याला मार्ग दिसेना. सगळे मार्ग पैशांनीं अडवले होते. " माझंच असं आहे का ? का सोमदत्ताचीही अशीच अवस्था आहे ? "

आज त्याला सोमदत्ताची कित्येक दिवसांनीं गांठ घेण्याची अनिवार इच्छा झाली. तो पानवडच्या खोऱ्यांतून बाहेर पडला.

गगनवाडीच्या डांबरी सडकेनें इकडे तिकडे अधाशी नजर टाकीत तो चालला होता. त्या रस्त्यानें चाललेल्या लोकगंगेंत क्षुद्रं नि गरिबेंच ! क्वचित् नीटनेटक्या कपड्यालत्त्यांचा माणूस त्याला दिसत होता. पानवडचें नसलें तरी तें गगनवाडीचें दारिद्र्यच दुथडी रस्त्यानें वहात होतें. त्याच्या ठसठसणाऱ्या मनाला कांहींसें बरें वाटलें. चालणारांच्या बोलण्याकडे त्याचें लक्ष जाई. बहुधा सगळ्यांना तीच पोटापाण्याची विवंचना. पैशांची विवंचना. मोठमोठ्या आरास मांडलेल्या दुकानांत दुकानदार बसले होते. लक्ष्मीची क्षणाक्षणाला आराधना करीत, ते त्याच रस्त्यानें जाणाऱ्या गरीबगुरिबांकडे

आशेची नजर टाकीत होते आणि गरीबगुरिबें दुकानांकडे आंसावून पहाणारी नजर वळवून पुढें पाऊल टाकीत होतीं.

तो लोकगंगेचा पूर ओसरत चालला. क्वचित् हिंडणारीं माणसें नि टाळलेली—टाकलेली वस्ती आली. तीच सोमदत्ताची झोपडी.

" सगळ्यांनीं मला हाकललें. सोमदत्तही मला हाकून देईल का ?" त्याचें मन गांगरून विचारूं लागलें.

तो सोमदत्ताच्या झोपडीजवळ गेला. बाहेरच एका डब्यावर कागद ठेवून एक पोरगी लिहीत बसली होती. आबा बघतच राहिला. तिचें लक्षही नव्हतें. डोईवरचा पदर पाठीवर पडला होता. नीटनेटका केसांचा बुचडा. ' ही राई ! ' तिच्या नेसूं फाटकेसेंच लुगडें होतें !

" सोमदत्त आहे का ? " आबानें विचारलें.

त्या मुलीचें लक्ष नव्हतें. त्यानें पुनः विचारलें. तिनें चमकून मागें पाहिलें. हंसत उठत ती म्हणाली, " बया ! कोन ? गायकवाड ? "

आबाही हंसला.

" सोमा बाहेर गेलाय्. येईल आतां. बसा ना."

ती कांहींशा आदरानें आबाकडे पहात होती. मधूनच थोडी लाजून नजर वळवीत होती. काय बोलायचें ?

आबा—कसलं पुस्तक ?

राई—पहिल्या बर्षांचं.

आबा—ट्रेनिंगचं ?

राईनें अभिमानानें मान हलवली. " तुमी या वर्साला म्याट्रिकला बसनार ना ? " तिनें विचारलें. आबाला कसेसेंच वाटलें. सोमदत्ताची बहीण ट्रेनिंगचा अभ्यास करीत होती. त्याला कांहींच करतां येत नव्हतें. ना धड मॅट्रिक ना ट्रेनिंग. तो अधांतरीं लोंबकळत होता.

तो निराशेनें म्हणाला, " माझी सोय होत नाहीं पैशाची."

" मला पन मिळलसं वाटलं नवतं कालर्शिप."

" मग ? "

" माहीतच नव्हतं. मग बाबा लाकुड फोडाया गेले होते, तिथं सांगितलं

त्या मानसानं कीं तूं सरकारांत अर्ज कर, महारमांगांना कालर्शिपा देतं सरकार."

आबालाही स्कॉलर्शिप मिळाली असती. पण त्याचा अर्ज सरकारांत पोंचायचा कसा? साहेब आणि मडम ह्या केवळ्या धोंडी त्याच्या मार्गांत होत्या. त्यांच्या शिफारसींनीं त्याचा अर्ज जायचा! पुनः याची चोर-जात! तिच्यामुळें पडलेलीं बंधनें! त्याला वाटलें राई विचारील, 'तुम्ही अर्ज कां करीत नाहीं?' म्हणून. त्याला लाज वाटली. आणि तिनें विचारलेंच.

"तुम्हीं कां नाहीं केला अर्ज?"

"मी महार नाहीं. मांग नाहीं. मांग—गारुडी आहे." तो रुक्षपणें म्हणाला.

पण राईनें त्याच्याकडे तुच्छतेनें पाहिलें नाहीं.

"सोमदत्त माझ्याबद्दल राईजवळ बोलला असेल का?" तो तिच्या नजरेचा शोध घेत होता.

"गारुडी झालं म्हनून काय झालं? सगळे थोडेच वाईट असतात?" ती म्हणाली.

आबाला समाधान वाटलें.

"पुढल्या वर्साला करा अर्ज?" तिनें सुचवलें.

तो कांहींच बोलला नाहीं.

"आपल्या लोकांना शिकायला नकोच असतं." राई म्हणाली.

"हं. शिकून कांहीं फायदा नसतो." मुद्दाम आबा म्हणाला. राई आश्चर्यानें बघूं लागली.

"फायदा नसतो? आंबेडकर शिकले ते फुकटच?"

"असे एकादे आंबेडकर व्हायचे."

"तुमीं हातपाय गाळलेले दिसतात."

"हं. बायकांचं सोपं आहे. आम्हांला तशीच वेळ आहे."

"असं काय करताय? धीर सोडून कसं होनार? आपुन गरीब लोक. सगळ्यांनाच कठिन असतं पुडं सरकनं. पन त्यांतून धडपडाया हवं."

तिच्या त्या कळकळीच्या आवाजानें आबा चकित होऊन पहात होता. त्याला कां हें कळत नव्हतें? त्याच्या अंतःकरणांतील धगीचा तिला प्रत्यय

आला असता तर—पण तो कसा येणार ? आबा सगळें कळत असूनही तिच्या कळकळीच्या आवाजाला भुकेला होता, मुद्दाम अडाणीपण दाखवीत होता.

" मी तुमच्याबद्दल लई ऐकलंय. सोमा बोर्डिगांतून आला तवां किती बोलत होता तुमच्याबद्दल. तो म्हनत होता–"

" काय म्हणत होता ?"

राई लाजली. " मला नाई बया आठवत."

आबाच्या मनांत आलें, " किती गोड पोरगी आहे ! नाहीं तर ती नामी !"

इतक्यांत सोमदत्त आला. " अरे आबा ! लई दिवसांनीं सई काढलीस गड्या. मी राईजवळ रोज तुझं नांव काढत होतों."

दोघा मित्रांच्या सुखदुःखाच्या गोष्टी मनमोकळेपणानें झाल्या. राई ऐकत होती. आबा सोमदत्ताशीं बोलत होता. पण राईलाही जणुं तो आपलें अंतरंग उकलून दाखवीत होता.

" सोमा, तूं नाहीं नोकरी करत ?"

" कुठं करतोय नोकरी ? इथून खेड्यावर जायचं म्हंजे बाबाला नको वाटतंय."

" मग तूं काय असाच राहणार ?"

" मी रद्दीचा धंदा करतोय गड्या. अन् लाकडं कापायचं कंत्राट घेतलंय्."

आबाला मोह उत्पन्न झाला. " मी येऊं का तुझ्याबरोबर काम करायला ?" असें विचारावेसें त्याला वाटलें. पण त्यानें मन आवरलें. चतकोर भाकरीसाठीं सोमा धडपडतो आहे. त्याला भाकरी मिळते असें वाटल्यावर मींही वांटेकरी व्हायला बघायचें ? त्यानें मोह आवरला. आपलें नशिब आपल्याबरोबर. त्याला तें लाकूड कापायचेंही काम कुणी दिलें नसतें.

" आमची राई पुढल्या वर्साला लागेल ना नोकरीला !" अभिमानानें राईकडे पहात सोमा म्हणाला आणि थोड्या वेळानें म्हणाला,

" आमच्यामधीं शिकलेले पोरगेच नाहींत. हिचं लगिन तरी कुनाबरोबर करावं ? कुनी ५-६ यत्ता इंग्रजी शिकलेला पोरगा सांग कीं माहीत असला तर ! नाहीं तर व्ह. फा. झालेला पन चालल."

राईचें हृदय धडधडत होतं आणि आबाचेंहि! दोघांनीं ओझरत्या नजरेनें एकमेकांकडे पाहिलें. दोघांच्याहि नजरा खालीं वळल्या. सोमदत्ताच्या मनांत काय येईल या कल्पनेने एकदम जणुं आबानें विचार झटकून टाकले.

तो म्हणाला, "मी चोर-वस्तींत राहणार. माझ्या ओळखीचं कुणी नाहीं."

थोडा वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. राई उगीचच आंत गेली आणि बाहेर आली.

"गड्या, तूं महाराच्या जातींत कां नाहीं आलास?" सोम्या त्याच्या पाठीवर थाप देत मनापासून म्हणाला.

आबा जमिनीवर काडीनें रेघोट्या ओढीत म्हणाला, "जातच बदलायची तर महार तरी कशाला? गोरा साहेब म्हणून जन्माला आलों असतों तर!"

दोघेही हंसले. आबानें राईकडे पाहिलें. तिच्या नजरेंतील कौतुकानें आणि आपुलकीनें आबाच्या मनावर मुद्रा उठल्या.

• • •

## १८

आबा वस्तीवर आला तों ती वस्ती जणुं रोमारोमांचें मुख उघडून ओरडत होती. गिरण्यांतून बाहेर पडलेले पोटार्थी जीव घर म्हटल्या जाणाऱ्या मोकाट जमिनीकडे धांवत सुटले होते. ताडी पिऊन, झिंगून बायका आणि पुरुष मोठमोठ्यानें ओरडत होते. अंतःकरणांतला सारा द्वेष, तिटकारा मनमानेशी अमंगल वाणी पेहरून ओकला जात होता. सारा दिवस एकटेपणानें कुत्र्याच्या पोरांसारखीं केकाटत राहणारीं पोरं आईबाप आल्याच्या आनंदांत अधिकच असहायपणें केकाटूं लागलीं आणि श्रमांनीं जेर झालेल्या आयांच्या मायेचे झरे आटून त्या पोरांच्या पाठींत रट्टे घालूं लागल्या. नवऱ्यांवर चिडूं लागल्या. लहानमोठ्या पोरांवर शिव्यांचा वर्षाव करूं लागल्या. जणुं

दारिद्र्याच्या कठोर यंत्रांत सांपडून आईच्या मायेच्या चिंधड्या उडून रक्ताच्या चिळकांड्या उडत होत्या.

आबाने पाहिलें. पण त्याला त्याचें कांहीं वाटलें नाहीं. आतां तेंच त्याचें रोजचें जगणे होतें. तो घरीं यायला उत्सुक नसे. पण कुठें ठिकाण नाहीं म्हणून तो घरी येत असे. त्याला मायेचे बंध नव्हते. तो एका स्त्रीला आणि पुरुषाला सक्तीनें आई आणि बाप म्हणत होता. कारण त्याला दुसरे आईबाप नव्हते. त्याच्या पाठच्या भावंडांबद्दल त्याला आस्था नव्हती. कारण तो त्यांच्या सान्निध्यांत नव्हता. त्याच्यासाठीं घरीं कोणत्या शिव्या वाढून ठेवल्या आहेत हें त्याला माहीत असे.

तो आला आणि वस्तींतील पिंपळाच्या पारावर बसला. त्याला भाकरी मिळणार होती कीं नाहीं हेही त्याला माहीत नव्हते. पण यदाकदाचित् घरांत भाकरी असली तर ती सर्वांनीं ओरबाडून, रडून, भांडून एकमेकांना शिव्या देऊन घ्यावी लागते हें त्याला माहीत झालें होते. भाकरी खातांना प्रेमाचा ओलावा, मायेचे शब्द, प्रेमळ नजर, कोमल स्पर्श, शांत उल्हसित वातावरण ? छेः ! छेः ! हें आतां त्याला मिळालें असतें तर त्या क्षणाला त्याला आपलें आयुष्य निःशब्द म्हणून सुनें सुनें वाटलें असतें.

त्यांतून आज तर रुपयाही गेला; नोकरीही मिळाली नव्हती. जागच्या जागीं तो जळत होता. आईबापांना त्यानें मिळवावेसे वाटे म्हणून तो त्यांच्यावर जळत होता. स्वतःला मिळवतां येत नाहीं तरी भाकरीसाठीं तो कुणाला तरी आईबाप म्हणून चिकटून राहतो यासाठीं स्वतःवर जळत होता.

तीन तीन दगडांत पेटलेला अग्नि जागोजाग धूर ओकीत होता. सूर्य मावळायच्या आंत भाकरी करण्याची कोण धडपड चालली होती. गिरणींतून आलेल्या एका कैकाड्यानें झोंपडींत आपल्या बायकोला आणि जाराला एकमेकांना कवटाळतांना पाहिलें आणि रागानें वेडा होऊन त्यानें त्या जाराच्या डोक्यांत कुऱ्हाड घातली. तो जार बेशुद्ध होऊन पडला होता कीं मेला होता कोण जाणे ? तिकडेही कुणाचें फारसें लक्ष नव्हतें. तेथें फारशी गर्दी नव्हती. चार दोन पोलिस–फौजदार तेंथें उभे राहून डाफरत होते–तेंही

मुर्दाडपणें. त्यांनाही गुन्ह्याची अपूर्वाई नव्हती. पिंपळाच्या पारावर बसलेल्या आबाकडे एकाची नजर गेली.

" काय रे भडव्या, त्या गिरणींत मरायला गेलास, तो मेलास नाहीं का? पुनः हिथं बसलाहेस रेड्यासारखा ! "

आबा जागचा उठला नाही. त्यानें फौजदाराकडे नजर टाकली आणि डोकें चोळीत तो पुनः खालीं पहात बसला.

" ए साल्या, मी काय म्हणतोंय ? ऐकतोस का कान फुटले ? " आबाच्या डोक्यावर टप्पू देत फौजदार म्हणाले. आबा उभा राहिला, पण बोलला नाहीं. " ए बोकडा, रोज सांगतोंय खाणीवर जा दगड फोडायला तर मोकाट ढोरासारखा हिडत असतोस का ? "

फौजदारसाहेबाना दऊत टांक हवा होता. तो येईपर्यंत ते आणि त्यांचे शिपाई जणुं करमणूक करून घेत होते.

" त्याला हपिसरची जागा हवीय ! " एकजण हंसत म्हणाला.

" लेका, देऊ का तुला हपिसरची जागा ? " एकजण त्याच्या कुशींत ढोसकून म्हणाला.

आबाला शिपायाच्या नरडीला झोंबावेसे वाटत होतें. पण तो गुन्हेगारासारखा चेहरा करून उभाच राहिला.

" काय रे, भाकर कशी मिळती रोज ? "

" रात्री साले चोऱ्या करायला जातात ! त्या नानू शेटकडे चोरी केलीस नाहीं का ? "

आबाच्या अंगावर कांटा उभा राहिला. आतां हें पाप मला चिकटणार काय ?

" मीं चोरी केली नाहीं. " कांपऱ्या आवाजांत तो म्हणाला.

" साल्या हजेरी लावली पाहिजे तुला. "

" कशाबद्दल ? मी काम करीत नाहीं म्हणून ? माझ्यापेक्षां कमी शिकलेले हपिसर होऊन बसले आहेत. शिपाई झाले आहेत. मी खाणीवर काय म्हणून जाऊं ? "

" उर्मट साला. चल चालता हो. एक दिवस उलटा टांगूं—माहीत नाहीं.' शिपायानें दम भरला.

" उद्यां त्या गेन्याला म्हणावं, सारीं सतरा अठरा वर्षाची पोरं हांकलून ने खडी फोडायला. मी वरल्या साहेबाकडे रिपोर्ट करतों. साल्यांना काम नको; मग चोऱ्या करीत हिंडतात. सारा गांव बोंबलतो तुमच्या अन् आमच्या नांवानं. "

आबानें हे शब्द ऐकले. त्याच्या अंतःकरणांत चर्रर झालें. चोरी केली नाहीं तरी चोरी चिकटायला आतां वेळ लागणार नाही. त्याचें मन तिटकाऱ्यानें, तिरस्कारानें ओरडूं पहात होतें. तो दूर गेला. आपले कढ बोलून दाखवण्याची त्याला गरज भासत होती. कुणाशीं बोलणार ? तो गर्दीगर्दीनें घराकडे आईबापाकडे धांवला. वाटेंत गेन्या दारू पिऊन झिंगत होता. आबाची ओढ एकदम कातरली गेली. काय हा बाप ! तो किळसून दूर गेला——मावळणीकडे.

" जाईबाई, चोरी केली नाहीं तरी हजेरी लावतील काय ? "

" का र बाबा ? "

आबानें सगळ्या दमदाटीची हकीगत सांगितली. मावळण हंसली.

" येड्या, तांदुळाचा दाना कांडल्या बिगर खानार हाए का कुनी ? चोर-वस्तींतला एक तरी मानूस हाए हपिसरानं शिया दिल्या बिगर ? तूं असा बाईबापड्यावानी काय करतोस ? हिथं बाया बी मर्दावानी हैती. अन् तूं कुटून पांच बुकं शिकलास त्यो ससावानी कांपांयाच लागतोस ! " आबा नुसता ऐकत होता.

" तुला सांगितलं नको मराया जाऊं घराकडं तर जातो कशाला ? हपिसर दिसला कीं दुसरीकडं त्वांड फिरवूनशानी जावा." मावळणीच्या त्या शब्दांतून झरणाऱ्या मायेनें आबाचें दुःखी मन कांहींसें शांत झालें.

● ● ●

## १९

मावळणीच्या घराजवळच्या पिंपळाच्या पाराभोंवतीं सांवलीला दुपारच्या वेळीं लहान थोर पोरें बसत. पत्र्याच्या तुकड्याला चिंधी-दोरी बांधून कांहीं

मुलें गाडी गाडी करीत ओढीत होतीं. कांहीं माती खणून डोंगर करीत होतीं. कांहीं कागदांचे तुकडे गोळा करून त्यांच्याशीं खेळत होतीं. कांहीं दगड-गोट्यांचे ढीग करीत होतीं. लहान लहान दगड-गोट्या म्हणून कित्येक खळींत टाकीत होतीं. कुणी मोडक्या काटक्यांचे विटी-दांडू करीत होतीं. बिनमोल खेळणीं करून खेळण्यांत लहान पोरें दंग होतीं. कांहीं पोरांचे विचकट खेळ चालले होते. कोणी गाढवाच्या शेपटीला फुटका डबा बांधून त्याला पिटायला इतर मुलांना सांगत आणि गाढव पळालें कीं खिदळत. कोणी पक्षी मारण्याचे खेळ खेळत. पारध्यांच्या तावडींतून एकही मांजर सुटत नसे. ते केव्हांच मांजरें खाऊन टाकीत. त्यामुळें मांजर चोर वस्तींत दिसतच नसे. आज कोठून एक पिल्लूं आले कोण जाणे; एका पारधी पोरानें त्याचा गळा दाबून त्याला घरीं नेलें.

तो पिंपळाचा पार ही सगळ्या बेकार तरुणांनाही एकच सुखाची जागा होती. भर उन्हांत मंद शीतल वारा. दाट सांवली. स्वच्छ जांगा. बेकार तरुण तेथें जमत. कुणी पत्ते खेळत. कुणी गप्पा छाटीत. कुणी जाणाऱ्या-येणाऱ्याची मस्करीकुस्करी करीत. मोकाट गाढवें, कुत्रीं तशीं बेकार तरुण पोरें—अंगावर किळस आल्यासारखीं बसत नि जगत. आबा तेथें त्यांच्यांतच बसला होता. त्या सगळ्या तरुणांच्या बेकार शक्तींना वाणींतून मोकाट वाव मिळत होता. तरुण पोरींच्याकडे त्यांचे डोळे रोखून बघत. मन वाटेल ते विलास करूं लागे. मग ते अश्लील बोलत. पण अजूनही नवतारुण्याची भीड त्यांच्यांत होती. नवतरुणांचा कातरपणा त्यांच्यांत होता. स्त्रीजातीबद्दल कुतूहल आणि संकोच. नवीन ज्ञानाचा कानोसा. अंतरंगांत हुरहुर. बीभत्स-पणा——सगळें कांहीं तेथें होतें. त्याच हिडिस, बीभत्स कौतुकानें जुगणारीं कुत्रीं पहात कित्येक बीभत्सपणें बोलत होते.

संतूची नामी पाराजवळून गेली. तिनें चोरट्या नजरेनें सगळ्या तरुणांचे चेहरे पाहिले. तिला हवा तो चेहरा तिला दिसला. तिची नजर खालीं वळली पण मन अधीन राहिलें नाहीं. ती पुढें गेली. तिनें वळून मागें बघितलें. ती कुणाच्याही नजरेतून सुटली नव्हती. मुलांनीं मिस्किलपणें हंसून आबाच्या पाठीवर थाप मारली. तोही लाजला. चोरटें हंसूं हंसून चोरट्या नजरेनें त्यानें नामीकडे पाहिलें. मुलें त्याला चिडवूं लागलीं.

आबाच्या चेहऱ्यावर एकदम खिन्नता पसरली. त्याला एकदम आठवण झाली. आईला गोऱ्या सोजिराने बोलावले. आई त्याच्या खोलींत शिरली. टोपपदरी लुगडें नेसून आली. रात्रीं आईचें नि बापाचें भांडण झालें. बापानें माघार घेतली. त्याला सगळ्यांच्या तोंडांत भाकरी कोंबतां येत नव्हती पोटभर. ती आईने आणली. बापही त्यामुळें चार आठ दिवस पोटभर जेवत होता. त्यानें वेदना गिळल्या होत्या.

"नामीशीं लग्न झालें तर ती असेंच करील. मला पैसा मिळाला नाहीं कीं ती कुणाचीही शेज चार पैशांकरितां गांठील. आणि मला ते मुकाट्यानें सहन करावें लागेल. ती भाकरी खावी लागेल."

आबाच्या डोळ्यांपुढें स्वतःची पांच सहा पोरें—टोपपदरी लुगडें नेसलेली नामी हिंडूं लागली. सभोवतालच्या पोरांचा एक शब्दही त्याच्या कानांत शिरत नव्हता. मनांतील तें हिडीस चित्र आवेगाने पुसून टाकण्यासाठी त्यानें झडझडून मान हलवली. शहारे दिले. त्याचे मन किळसले. शीः नामी ! घाणेरडी. उवा, लिखा, अंगावरची लक्तरे, अंगाची घाण. त्याच्या मनानं मांडलेले विलास उधळून गेले.

त्याचें मन गगनवाडीच्या वेशीवरच्या एका घरांत विसांवले. स्वच्छ कपड्यांची, केस विचरलेली राई तेथें कायसे वाचत होती. आबा अस्वस्थ झाला.

● ●

## २०

दुसऱ्या दिवशीं आबा हपिसराच्या नजरा टाळून हिंडत होता. गगनवाडीच्या स्टेशनांतून बाहेर येणाऱ्या लोकांपुढें तो गयावया करून विचारी, "मी घेऊं तुमचें सामान ?"

"बिल्ला कुठंय् ?"

"बिल्ला नाहीं साहेब. पण गरीब आहे. द्या पोटाला."

कुणी एकदोघांनीं आबाला सामान दिलें. आबा तें डोक्यावर घेऊन निघाला. अर्धा मैल पाऊण मैल अंतरावर सामान पोंचवल्यावर एक एक आण्यासाठीं गिऱ्हाइक त्याच्यावर डाफरलें. " अरे बिल्ला नाहीं तर देणार कोण सामान रे तुझ्याजवळ ? फार पायां पडलास म्हणून दिलं, तर आतां दोन आणे द्या म्हणतोस ? "

" पण साहेब, टांगा केला असतात तर रुपया दिला असता. बिल्लेवाल्या हमालानं हिथं आणलं नसतं सामान."

" चल जा. बडबड नको करूं."

" नाहीं साहेब— "

" नाहीं तर फेकून दे तो आणा. आणखी मिळणार नाहीं. "

वयाच्या एकोणिसाव्या वर्षी आबाच्या हृदयांत जगाबद्दल विचार भरत होता. त्याच्या खिशांत आज त्यानें कमावलेले चार आणे होते. त्या चार आण्यांचें भवितव्य टरवतांना त्याचें मन निरनिराळ्या ठिकाणीं पांखरासारखें उडून बसत होतें. एकदां वाटे हे पैसे आईबापाला द्यावे. मग त्याला वाटे, एकदां आज दिले की उद्यां न दिल्याबद्दल तीं अधिक चडफडतील. त्यापेक्षां कांहींच दिले नाही तर रोज चालते तेवढीच तडतड चालेल.

दुकानांकडे बघतां बघतां सगळे पदार्थ जणुं त्याची सत्त्वपरीक्षा घेत होते. पण दुकानाशीं थांबलेलीं पावलें तो स्वतःवर चिडून दुसरीकडे वळवी. आज चार महिने तुला आईबाप भाकरी घालताहेत आणि आज चार आणे मिळाल्यावर तुझी जीभ एकट्याचे चोचले पुरवायला तयार ! त्यानें खिशांतले ते चार आणे काढून पाहिले. त्याच्या हाताला कसलें सुख होत होतें कोण जाणे त्या स्पर्शानें ! आणि एकदम त्याला भीति वाटली. कुणी इपिसरानें पाहिलें तर ? मीं चोरी केली म्हणून म्हणेल तो ! त्यानें ते झटकन खिशांत टाकले.

तो झरझर चालला. अजून वणवण हिंडून त्याला दिवस काढायचा होता. तो रस्त्याच्या कडेकडेनें चालला होता. रस्ता निर्मनुष्य होता. वस्ती विरळ, जवळ जवळ नव्हतीच. दोन्ही बाजूंला झाडांच्या रांगा लागल्या. आबा सांवलींतून चालला. दूर एक दहा वर्षांची मुलगी—गळ्यांत गांठलें, पायांत सांखळ्या अशी रस्त्याने चालली होती. तिच्या मागें एक वीस वर्षांचा मुलगा चालला होता.

आबाच्या डोळ्यापुढें नामी उभी राहिली. नामी ! नामी किती मुरडून मुरडून पहात जाते ! दिवसांतून तो कुठे असेल तेथें त्याला दिसते. मग मुद्दाम त्याला शोधीत हिंडते का ती ? नामीशीं लग्न ? शी: ! त्याचें तरुण मन सोमदत्ताच्या बहिणीचा विचार करीत समोरच्या दोघांकडे पाहूं लागलें.

पण तो कोण ! तो मागें पुढें पहात होता. आबा झाडाआड उभा राहिला. तो साद्या. त्याचा चुलतभाऊ. घाबऱ्या घाबऱ्या इकडे तिकडे पहात त्यानें मुलीच्या तोंडांत बोळा कोंबला. गळ्यांतले कायसें काढलें. तें घेऊन धूम ठोकली. आबाची छाती धडधडूं लागली. 'मीही चोर-जातीचा आहें. त्या मुलीनें माझ्याकडेच बोट दाखवलें तर ?' तो पळत सुटला आड वाटेला. साद्याच्याच मागें. साद्या पुढें, आबा मागें. पळतां पळतां त्याच्या मनांत विचार आला: 'मला साद्यासारखें करतां येईल का ? येईल, मलाही साद्यासारखें करतां येईल.'

आतां ते हमरस्त्यापासून दूर आले. साद्या थांबला. त्याच्या चेहऱ्यावर सूड होता. त्याला वाटलें हा शिकलेला आबा आपली चुगली करील इपिसराकडे. तो बेडरपणें उभा राहिला.

"काय र, फांस लावाया बघतुस माझ्या—?"

त्यानें आबाला गुद्दा दिला.

"बुकं वाचाया शिकलास म्हून लइ शानपन कराया लागलास र ! गुमान बोल तर कुनाम्होर ! न्हाई तुझा मुडदा पाडला तर–" म्हणत पुन: दोन ठोसे साद्यानें लगावले.

आबा उभा राहिला—-बथ्थडपणें. साद्याला आश्चर्य वाटलें.

"अर असा बोकडासारखा उभा काय ऱ्हायलास. तुला बी चायपानी दीन. चलतुस ?"

आणि आबाच्या मनांतला झगडा थांबला. इतके दिवस उसनी आणलेली भल्याबुऱ्याची चाड वाऱ्यावर उडाल्यासारखी झाली. त्याला वाटलें, शेवटीं कांहीं जमलें नाहीं तर मला हेंच करायचें आहे. आज हमालीचे चार आणे मिळाले. उद्यां नाहीं मिळाले तर ? तर मला हेंच करावें लागणार. मी करीन. उपाशी मरणार नाहीं. पण तो बोलला नाहीं. नुसता चालूं लागला. साद्याही त्याच्याबरोबर जात होता. त्यानें तें गांठलें आबाला दाखवलें.

" घा पांच मिळत्याल याचं ! "

आबा नुसता बघत होता. सकाळपासून हमाली करून त्याला नुसतीं हिडिसफिडिस बोलणीं आणि चार आणे मिळाले होते. साद्यानें तीन मिनिटांत दहा रुपयांची कमाई केली होती. पण त्याच्यानें साद्याचें कौतुक होईना. त्याला बोलवेना. शेवटीं साद्यानेंच विषय बदलला.

साद्या—त्या संतूची नामी करनार हाएस का नाइ ?

" संतूची नामी ? मला कोणी माहीत नाहीं." आबा मुद्दामच म्हणाला.

" अर त्यो संतू तर म्हनतो आबाला माझी प्वार देनार म्हून. लई पदर काढुनशानी जाती ना तुझ्या म्होरं. मी सवतां पायलं नाय का ? " आबाच्या पाठीवर थाप मारून साद्या म्हणाला. आबा कांहींच बोलला नाहीं.

साद्या—ती लहानी हाए ना भिव्याची ती घेतोय ना मला त्यो. तीस रुपयं द्यायचं हैती.

आबा—तुला नाहीं भाकरी खायला आणि तूं तीस रुपये देणार !

साद्या—म्हंजी ? ही रीतच हाए. भिव्याची कारभारीन लई हुश्यार हाए. भिव्यानीं धा दरोडं घातलं पन येक बी गवसला न्हाई. अरं लई हुश्यार. भिवा जायाच्या कामाच्या वाटवर गवत कापूनशानी खून करून ठिवायची. तिच्या आजीपून समद्या बाया हुश्यार. अन् ही लहानीबी हुशार हाए.

आबा—मग लहानीच्या शहाणपणानं तूं दरोडे घालणार ?

साद्या—हां तर ! माझ्या बापानं धा चोऱ्या केल्या. धादा जेलांत ग्येला. पन भाईर आला त्यो कंदी बी खचला न्हाई. माझा बाप म्हनत्यो, " म्यां पोलिसाचं चंदन उडीवलंय अन् तूं तर एक शेळी का बोकड बी चोरीत न्हाईस का शेत कापूनशान आनलं न्हाईस. तुला प्वारगी तरी कशी मिळायची." मला बी लई वंगाळ लागलंय. अन् लक्ष्मीच्यान् आतां जवां पाचदां चोरी क्येली तवां लहानीला द्याया तयार झाला भिवा.

आबा चकित होऊन पाहूं लागला.

आबा—अरे मग मला संतू नामी कशी देणार ?

साद्या—अरे ह्ये बघ. कुनी असं कुनी तसं. संतूला वाटतंय तुला रोजगार मिळनार. पन अस रोजगारवाल किती हैती र. अन् द्येतों कोन रोजगार ? आपला बापजाद्याचा धंदा त्यो खरा. व्हय कीं नाय ?

आबा दचकला. जणुं त्याच्या दुर्बल झालेल्या मनाला साद्यानें वाट दाखवली. काम मिळेना तेव्हां त्याचें निराश मन त्याला म्हणालें, ‘ मलाही साद्यासारखी चोरी करतां येईल तर ! ’

पण आबाला या विचारानें वेदना होऊं लागत. त्याचें रक्त जणुं आपली जात विसरलें होतें. धंदा विसरलें होतें. गुण विसरलें होतें. बारा वर्षांत त्याचें मन पांढरपेशाचें झालें होतें. नीतिअनीतीच्या कल्पनांशीं अर्धपोटीं झगडणाऱ्या मास्तर-कारकुनासारखें त्याचें मन झालें होतें. पण मास्तर-कारकुनासारखें अर्धपोटींही जगतां येण्याची शक्यता मला नाहीं. मग मीं करायचें काय ? तो अंतर्यामीं झगडत अक्षरही न बोलतां साद्याच्याबरोबर चालला होता.

त्याचें मन कुठें कुठें भरकटलें...चोर-वस्तींतील सगळीं पोरें त्याच्यासारखींच पळालीं. गांधी-सेवा–मंडळाच्या शाळेंत गेली. बारा बारा वर्षे राहिलीं. त्याच्या मनानें निराळेंच जग उभें केलें. उत्साहानें त्यानें कुणाकुणाला कितीक शिकवलें आणि ते सगळे शेवटीं चोर-वस्तींत आपल्या आई-बापांकडे आले. निराश झाले आणि वणवण हिंडूं लागले. त्याच्या मनोराज्याला ठोकर बसली. तो कावराबावरा झाला. तो एकदम म्हणाला,

“ साद्या, तुपण आपण बरोबर चोरी करूं.”

साद्यानें त्याच्या पाठीवर थाप मारली. “ अंग आस्सं ! चल चाय पाजतों तुला.”

• • •

## २१

साद्या आबाला घेऊन एका हॉटेलपाशीं गेला. साद्या बाहेर उभा राहून चहा मागणार होता. तोंच आबानें त्याला मागें खेंचलें.

“ सरळ आंत चल. तूं पैसे देणार आहेस. फुकट चहा नाहीं पीत. सगळे पैसे देतात तिवकेच तूं देणार आहेस.”

साद्या स्तंभित झाला. त्याला असा विचार करायची संवयच नव्हती. तो आबानें धरलेला हात मागें खेचूं लागला. त्याच्या खिशांत चोरीचा माल होता. आबानें त्याला आंत ओढलें. दोघे आंत शिरले. एका टेबलाजवळ बसले. दोघांच्याही अंतःकरणांत कमीअधिक धडकी भरली होती. पण आबाच्या अंतरंगांतील चीडही कमी नव्हती. त्यांनीं चहा मागवला. इतक्यांत गिरणीचे जॉबर कर्नाळे आंत आले. आजच नेमकी ही गांठ पडेल, अशी आबाला कल्पनाही नव्हती. साद्यानें आणि आबानें—दोघांनीं माना खालीं घातल्या. कर्नाळ्यांचें लक्ष नव्हते. ते शेजारच्या टेबलावर बसले. इकडे तिकडे पाहूं लागले.

साद्या आणि आबा दृष्टीस पडतांच ते मोठ्यानें म्हणाले, " काय रे गारुड्या, इथं आंत आलास ? "

" काय हो हाटेलवाले ! गारुड्यांना, मांगामहारांना चहा पाजला तर हाटेलांत कोण कशाला येणार तुमच्या ? "

हॉटेलवाल्याचें लक्ष गेलें. इतरांचेंही लक्ष गेलें.

" काढा साल्यांना बाहेर ! " हॉटेलवाल्यानें म्हटलें.

एकानें त्यांना गचांडी दिली. आबा बाहेर गेला नाहीं. त्यानें गचांडी मारणारावर हात उगारला.

" साद्या, पळतोस काय भित्र्यासारखा ? लोळव त्याला. "

पण साद्या बाहेर पळाला. त्याच्या खिशांत चोरीचा माल होता. गर्दी जमली. बाहेरच्या मांगा-महारांना ऐकूं यावें म्हणून आबा ओरडत होता. महार-मांग धांवले. मारामारी सुरू झाली. कुणी ' जय भीम ' म्हणून ओरडत होते. ' जय राजभोज ' म्हणून कोणी म्हणत होते.

माणसें जखमी झालीं. आबाच्या डोक्यांतून भळभळ रक्त वहात होतें. पोलिस ठाण्यावर वर्दी गेली. पोलिस धांवले. कोण गुन्हेगार म्हणून पोलिसांनीं शोध केला. पुष्कळ लोक पकडले गेले. आबा मुख्य गुन्हेगार म्हणून धरला गेला. साद्या केव्हांच निसटला. सगळे लोक आबाकडे बोट दाखवीत होते.

" हीं महारं मांगं फार शेफारलीं आहेत अलिकडे." कित्येक जण बडबडत होते.

पंच आले. साक्षी लिहून घेतल्या. आबाला गुन्हेगार म्हणून सरकारी दवाखान्यांत जखमा बांधायला घेऊन गेले. आबाबरोबर सोमदत्ताचा बापही जखमी स्थितींत दवाखान्यांत नेला गेला. दवाखान्यांतही मारामारी करणारे हरिजन म्हणून कितीक जण डोकावून जात होते.

आबाला मार लागल्याची बातमी चोर-वस्तींत पोहोंचली. त्याचे आई-बाप रडत ओरडत दवाखान्यांत आले. आबा कण्हत दवाखान्यांत पडला होता. आईबाप आल्यावर त्याला कसा दोष देतील याचीहि त्याला कल्पना होती. पण त्याच्या मनांतील द्वेष आणि बेपर्वाई कमी झाली नव्हती. त्यानें सोमदत्ताला पाहिलें तेव्हां त्याला केवढें समाधान वाटलें. त्याच्या मागेंच राई उभी होती. त्या तरुण मुलीच्या जाणिवेनें आबाला थोडें चोरट्यासारखें झाले. तिच्या नजरेंतील सहानुभूति, आपुलकी पाहून तो चकित झाला. 'राईला माझ्याबद्दल काय वाटतं ?' पण हा ओझरता विचार त्यानें झटकन् डावलून टाकला. तो क्षीणपणें हंसला.

"मला मुळींच पश्चात्ताप होत नाहीं, सोमदत्त."

"पण ही एकट्या दुकट्यानं करावयाची गोष्ट नाहीं."

"आपण इतके भेकड आहों, कीं सगळे मिळून कोणती गोष्ट करायचं आपल्या केव्हां मनांत येईल कीं नाहीं कोण जाणे ?"

"या सगळ्या गोष्टींत धीर पाहिजे. योग्य वेळीं आपल्याला हवं तें होणार आहे."

"योग्य वेळ ? कोणती योग्य वेळ ? सारा दिवस अपमान, अपमान, अपमान ! मला नाहीं सहन होत."

गेन्या—ध्या ! असं खुळ्यावानी कराया लागलास कीं तारंत येऊन पडशील.

आबाला धक्का बसला. तो गप्प झाला. त्याची बाजू न्यायाची असतांही त्याला तारेंत डांबतील का ? कुठल्याशा भयंकर भविष्यानें तो सुन्न झाला. त्यानें खिशांतील चार आणे चांचपले. ते केव्हांच पडून गेले होते. त्याला बरें वाटलें.

गेन्याला मात्र मुलाबद्दल कांहीं आशा राहिली नाहीं.

" शिकुनशानी पैका बी मिळवत न्हाई. नुसता बैलासारखा ढुसण्या माराया लागलास. कुनी ह्यो कहार कराया सांगितलं व्हतं? आपली जात सोडुनशानी दुसऱ्या जातीसंगं भांडाया लागलास! ह्येच शहानपन कमावलंस?"

गेन्या बडबडत होता. त्याला मुलगा फुकट गेला असें एकीकडे वाटे. एकीकडे त्याच्याभोंवती जमणाऱ्या माणसांशी तो ज्या तऱ्हेनें बोले आणि तीं माणसें ज्या आदरानें त्याच्याकडे पहात होतीं, त्याचेंही त्याला कौतुक वाटत होतें. आश्चर्य वाटत होतें. त्याला आपला मुलगा कसा आहे याचा अंदाजच येत नव्हता.

'जय भीम' वर्तमानपत्राच्या बातमीदारानें आबाची गांठ घेतली, तेव्हां गेन्याला आतां हे काय करणार आहेत याचा अंदाज येईना. तो दिङ्मूढ होऊन सारें पहात होता. चांगुणानें नुसतेच रडून डोळे सुजवले. वटवट केली. सर्व तऱ्हांनीं गांजलेल्या आबाच्या आईबापांवर संकटें येत पण तींही बोथट होऊन टोंचत.



## २२

त्याचा खटला कोर्टापुढें आला, तेव्हां जातीजातींच्या भांडणाचा परिणाम म्हणून कीं काय कोण जाणे, बरींच माणसें कोर्टांत आलीं होतीं. आबाला जाब द्यावयास सांगितलें. तो उभा राहिला. गांगरला. त्याची नजर सभोंवतीं फिरली. सर्वांगांतून जणुं चेतना निपटून निघाल्यासारखी झाली. त्याचे हातपाय बधिर झाल्यासारखे झाले. कानशिलें भडकलीं होतीं. एवढ्या माणसांत तो कधीं बोलला नव्हता. वाचा पांगुळली होती. त्यानें हताशपणें गांगरून पुनः सगळीकडे पाहिलें. हो ती राईच. डोळ्यांत अधीरता—सहानुभूति. त्यानें तिच्याकडे पुनः पाहिलें. जणुं त्याच्या पुरुषार्थाला त्या नजरेनें आव्हान दिलें. आणि तो बोलूं लागला,

" महाराज, मी मारामारी केली. पण मारामारी करायची म्हणून मारामारी केली नाहीं. मी स्वच्छ आहें. रोज आंघोळ करतों. मी इतर माणसांसारखा माणूस आहें. हॉटेलांत इतर पैसे देऊन चहा घेतात. तसाच मी घेणार होतों. तरी मला कुत्र्यासारखें हांकललें हें मला सहन झालें नाहीं; बेकारीनें मी कावून गेलों होतों. म्हणून मीं हात उचलला. केवळ एका जातींत जन्माला आलों, एवढ्यासाठीं मला माणूस म्हणून जगणें कठिण कां असावें, हें मला कळत नाहीं. मला याहून कांहीं सांगावयाचें नाहीं."

तो खालीं बसला. त्याची नजर न कळत पुनः राईकडे गेली. तिच्या चेहऱ्यावर समाधानाचें अस्पष्ट हंसू दिसलें.

न्यायाधिशाला १९-२० वर्षांच्या आबाचे अंतःकरणापासून निघालेले शब्द मनोमन पटले. पण आबा अस्पृश्य होता. त्यानें स्पृश्यांच्या हॉटेलांत जाण्याचा गुन्हा केला होता. तो न कळतां केला होता असेंही नव्हतें. यासाठींच आबाला आठ दिवसांची शिक्षा झाली. आणि जातां जातां न्यायाधिशानें शिफारस केली कीं आबाला नोकरी देण्याचा मोठेपणा कोणीं दाखविला तर त्यानें समाजाची जबाबदारी ओळखली असा अर्थ होईल.



# २३

तुरुंग बरा कीं आईबापांचें घर बरें हा प्रश्न आबाला पडला. तेथें नेमक्या वेळीं भाकरी मिळत होती. तिनें त्याचें पोट भरत होतें. चार भिंतींत कोंडल्यानें त्याला त्रास होत होता. पण बाहेर ना शिक्षण ना नोकरी, या अनिश्चितपणानेंही त्याला कमी त्रास होत नव्हता.

त्या आठ दिवसांत तो एकटा एकटा होता. त्याचें मन हजारों मैलांच्या वेगानें धांवे. त्याला आईबद्दल किळस वाटे. बापाबद्दल कींव येई. भावंडांबद्दल परकेपणा वाटे. तो घरापासून तुटलाच. पण त्या आठ दिवसांनीं त्याच्या वृत्तींत पालट झाला आणि कोणत्या तरी दुःखानें, वेदनेनें तो चोर-वस्तीच्या

अंतःकरणाशीं समरस झाला. तो स्वतःच्या मनस्थितीत सगळ्या तरुणांचीं मनें पाहूं लागे.

चोर-वस्ती आणि तेथील अधिकारी हे जणुं दोन शत्रूंचे तळ होते. त्यांना एकमेकांबद्दल आस्था नव्हती, प्रेम नव्हतें. हिताची बुद्धि नव्हती. चोर-वस्तीनें आपल्या भोंवतीं जणुं कोट रचले होते. अविश्वास, अडाणीपण, दारिद्र्य, हेकटपणा, निरक्षरता, निराशावाद, नावडीचे उद्योग, अर्धपोटी राहणी, या सगळ्या सगळ्या गोष्टींनीं अजूनही त्याला चोरी हाच मुक्तीचा मार्ग वाटत होता.

त्याचें मन विचार करी. मी इतका निराळा कसा ? आणि मग त्याला वाटे—माझ्यासारखेच १२–१२ वर्षे निराळ्या ठिकाणीं चांगल्या विचारांच्या छायेंत वाढले, तर यांचींही मनें माझ्यासारखीं पालटणार नाहींत का ? पोट भरले नाहीं तर मलाही चोरी करावीशी वाटतेच. त्याला त्या वस्तीच्या हेकटपणाचा अर्थ कळूं लागला. शिक्षणापासून ते दूर कां पळतात हेंही कळूं लागलें. घाणीची घृणा कशी जाते हेंही त्याला स्वतःवरून कळलें. आणि तो तुरुंगांतून बाहेर आला तो अधिकाऱ्यांना हितशत्रू समजून.

मी इथेंच राहीन पण पिचणार नाहीं. दुसऱ्यांना पिचूं देणार नाहीं. माझ्या अंतःकरणांतील वेदना दुसऱ्याच्या अंतःकरणांत उठणार नाहींत का ? सगळ्यांच्या वेदनांनीं कांहींच साधणार नाहीं का ? पण मग जें साधेल त्यांतही मी मांग-गारुडी म्हणून मला सगळे दूर दूर ठेवतील. मग ? त्याचें मन गोंधळून गेलें. पांगळून गेलें. त्याच्या वेदना त्या सर्वांच्या नसणार ! मग ? आम्ही सारे मांग-गारुडी तळमळत तडफडत बसणार ? बेकार म्हणून चोऱ्या करणार ?

गांधींच्या सेवा–मंडळांत म्हणत, " महात्माजी अस्पृश्यता कलंक समजतात. " आणि मी हॉटेलांत गेलों, गिरणींत गेलों तर मार-पीट झाली. मग गांधी सेवा-मंडळांत भलतें जग कशाला उभें केलें आमच्यासमोर ? पोहायला शिकवलें नाहीं खोल-पाण्यांत. मग दुसऱ्या तीराला पोहोंचेपर्यंत तर हातभार लावायचा ? हा मध्येंच गटांगळ्या खात मी बसलों आहे. कोणत्या वाटेनें मी जाऊं ?

• • •

## २४

आबा तुरुंगाच्या बाहेर आला तेव्हां त्याला वाटलें होतें, आपल्या जातीचे लोक जमतील. आपली पाठ थोपटतील. पण तो तुरुंगाबाहेर आला तेव्हां त्याचें स्वागत करायला कुणी नव्हते. त्याच्या मनांत पुनः धुमाकूळ सुरू झाला.

तो घरीं आला. तों त्याचे जातभाई त्याला निराळीच शिकवण देत होते. " अर कायर ग्येलास जेलांत तर येकादा डाका तरी घालायचा व्हतास ! ह्ये र कसलं भांडान अन् मारामारी ? बुकं लिवाया वाचाया शिकलास तर असं बी पोट जळंना अन् तसं बी जाळतां येईना तुला. "

सगळ्या मांग-गारुड्यांनीं त्याला वेडाच ठरवला. संतू गारुडी तर म्हणाला, " माझी पोरगी द्येनार व्हतों, न्हाइ दिली तरी ब्येस असल्या पोराला."

आबा चिडून म्हणाला, " मी तुझ्यामागें लागलों नाहीं मला मुलगी दे म्हणून. संभाळ तिला. माझ्या पुढून मुरकत जाते ती. "

आबा घरीं भाकरी खायला बसला. गेन्या कामावर गेला होता. चांगुणा घरीं होती. भाकरी पुरेशी नव्हती. आबा आणखी मागत होता. तीही म्हणाली, " आतां असा सैराटावानी हिंडूं नग. मारामारी करूनशानी काय मिळतंय ? त्यापरीस झाडूचं काम क्येलंस तर धा पांच मिळत्याल तरी ! "

" मी करणार नाहीं झाडूचं काम." आबा म्हणाला.

" हा ! तूं झाडूचं काम करनार न्हाई, करनार न्हाई ह्येच म्हनत बस. हिथं धा पोरांना खायाला न्हाई तरी तूं उगाच बोकडावानी हिंडत ऱ्हा आन् फुकाची भाकर खा. लई अंमलदार व्हनार हाएस हाए ठावं. "

आबाला आईच्याबद्दल फारा दिवसांचा राग होता. तो एकदम म्हणाला, " दहा पोरं ! दहा पोरं ! कशाला माझ्या बापाच्या घरीं आणलींस ? "

चांगुणा—काय म्हनलास ?

पण आबाला पुनः बोलण्याचें धैर्य झालें नाहीं. चांगुणेलाही त्याचें बोलणें कळलें नाहीं आणि तें तेथल्या तेथेंच राहिलें. पण चांगुणा म्हणाली,

" आता सांजची भाकर मिळवूनशानी आण तर ये घरला. तुझ्या येवढार्लीं प्वारं आनीत न्हाईत का ? "

• • •

## २५

आबाला आईची तडतड नित्याची झाली होती. पण त्यालाही लाज वाटत होती. तो भाकरी खाऊन बाहेर गेला. पिंपळाच्या पारावर बसला. संध्याकाळची भाकरी मिळवण्याखेरीज त्याच्या डोक्यांत विचार नव्हता. आणि पुनः त्याला साद्या दिसला. तो जवळ आला. त्याला आबाबद्दल बराच जिव्हाळा वाटत होता. त्याच्या पाठीवर थाप मारून तो त्याच्या जवळच पारावर बसला. आबाला साद्याचा तिटकारा आला. पण साद्याला झटकूनही टाकवेना. साद्या अडाणी होता, घाणेरडा होता, चोर होता, त्याच्या मनाला भल्याबुऱ्याची चाड राहिलेली नव्हती. गरजवंताच्या मनांत प्रेतावर उधळलेला पैसा घ्यावा कीं नाहीं हा विचार पक्का होत नाहीं; तसें आबाचें साद्याच्या बाबतींत झालें. आपण त्याच्याचसारखे आहोंत असें साद्याला वाटावें हेंही आबाला रुचत नव्हतें. त्याची लगटही त्याला आवडत नव्हती. पण त्याला तेथलें काय आवडत होतें म्हणून साद्याचाच त्यानें विशेष तिटकारा करावा ! आबा बोलला नाहीं. तेव्हां हळूच साद्या म्हणाला,

" अर, येवढ्या आठ दिवसांत तुझं काळीज थरकलं तर मोठा डाका कसा घालणार तूं ? "

आबा—मी डाका घालणार म्हणून कुणीं सांगितलं तुला ?

साद्या हंसून म्हणाला, " अरे साल्या, तुझी तर पार मकडी वळूनशान् ग्येली. त्या दिवसाला म्हनला व्हतास ना आपुन तुपन जायचं म्हून ! "

आबाला तेंही आठवत होतें. त्याला चोरी करायची इच्छा होती पण साद्याबरोबर चोरी करून त्याची मैत्री वाढवावी कीं नाहीं याबद्दल त्याचें मन साशंक होतें. तो कांहींच बोलला नाहीं.

साद्या—तूं असा मुडद्यावानी बसूं नग. चल मी सांगतोंय तुला.

एकदम जाग यावी त्याप्रमाणें आबा खडबडून म्हणाला, " चल; आज नको गड्या; पुनः कधीं तरी."

साद्या थोडा वेळ त्याची चेष्टा करीत बसला आणि निघून गेला. पण आबा उठला. तो तडक रस्त्यानें चालला. त्याचे शब्द ऐकायला कोणी नव्हतें. मनाची चलबिचल, ओढाताण पाह्यला कुणी नव्हतें. धडधडत्या हृदयानें तो चालला होता. पहातां पहातां त्याला वाटलें आपल्या नजरेंतही चोर-जातीची भिरभिर आहे. पायांत चोर-जातीची चलाखी आहे. आपण चोर-जातीचे आहोंत. चोर आहोंत. तो गडबडला. त्याला घाम फुटला होता.

दुतर्फा शेतें लागली. कणसें वांकवांकून त्याच्याकडे पहात मागें सरत होतीं. आबाची संध्याकाळची भाकरी देवानें रस्त्यावर पसरून ठेवली होती. ती आपल्या पोत्यांत घेतली कीं त्याची झाली. त्यानें सभोवार पाहिलें. दूर दूर दिसणाऱ्या रस्त्यावर कोणी नव्हते. तो एकदम शेतांत घुसला. दहा वीस पावलें तो गेला. अत्यंत सावधपणें कानोसा घेत. आणि त्याच्या मनांत एकदम विचार आला, " पोत्यातली ज्वारी कुणीं पाहिली अन् पकडलं तर ! " तो क्षणभर उभा राहिला. त्याच्या पोटांत चर्र झाले. त्याचा सोगा ओढला जात होता. " एऽऽ ! " " एऽऽ ! " हळूच आवाज ऐकूं आला. त्यानें वळून ताटें बाजूला करून पाहिलें. बन्या ! तो हतबुद्ध झाला. कांहीं क्षणांनीं तो हंसला.

" अरे इथें काय करतोस ? "

" तू करतोस तेंच. रस्त्याला कुणी आहे ? "

" नाहीं. "

" अरे ही इतकी ज्वारी जमा केली. न्यायची कशी ? "

" मला देतोस निंमी ? "

त्या दोघांनीं वांटे करून ज्वारीचीं कणसें दोन ठिकाणीं पोत्यांत घेतलीं.

बन्या—पलीकडच्या पाय वाटेनें जाऊं या.

आबा—ए नको. राजरोस रस्त्यानें जाऊं म्हणजे शंका नाहीं यायची.

तीन-चार शेरांचें तें पाप घेऊन दोघेही निधडेपणानें चालले. ते हंसून बोलत होते. पण त्यांच्या नजरा शोधकपणें पहात होत्या. दूरच्या आकृति माणसांच्या रूपानें जवळ आल्या कीं भीतीचें कांपरें भरत होतें. अंगें घामानें

थबथबत होतीं. तीं डोक्याच्या टोपीनें ते टिपीत होते. माणसें जवळ आलीं कीं ते संभावितीनें बोलत होते.

बन्या—अरे भाकर मिळेना, मग काय करायचं ?

आबा हंसून म्हणाला, " हं."

पण याहून न बोलतांही त्यांना एकमेकांचीं मनें कळत होतीं. बन्याला आपण चोरी केल्याचें आबाला कळलें याचें वाईट वाटलें नाहीं. आबालाही वाटलें नाहीं. पोरापोरांनीं जांभळें-चिंचा पाडायला जावें इतकें सहज स्वरूप त्यांच्या मनांनीं त्याला दिलें. ते चोर-वस्तीच्या जवळ आले. दोघे दोन दिशांना निघाले. आता पाठीवरचीं पोतीं एकादा शिपाई बघेल ही दोघांना भीति. आबा जवळच्या रस्त्यानें झोंपड्या झोंपड्याच्या आडून मावळणीच्या घरीं गेला. मावळण भाकर करीत बसली होती.

" काय र ? "

" माझी भाकरी मिळवून आणली मीं."

मावळणीला कळलें. ती हंसली; उठली. तिने तें पोतें पांघरुणाखालीं लपवलें. " येड्या, कुनी आलं तर ! मावळणीला जेलांत घालायचं हाए जनूं ! "

" अन् मावळण जेलांत गेली तर मला भाकर कोण देईल ? "

" तुझी माय हाए ना बाबा ! मावळणीचं काय हाए ? "

" आतां मी तुझ्याच घरांत राहणार आहें. चोरी करणार आहें. मिळवली भाकरी तर भाकरी खाईन. नाहीं तर उपाशीं पडून राहीन. घरीं नाहीं जाणार."

" का र बाबा ! "

तो क्षणभर कांहींच बोलला नाहीं.

" ऑं ? येवढं ओझं कुठून आनलं ? "

तो परका आवाज कानीं पडला. आबाच्या अंगांतून चमक निघून गेली. हृदयाशीं जणूं मुडपल्यासारखें झालें. हातांतील ओझें गळून पडलें.

" झालं ! सांपडलों ! " तो मनाशी म्हणाला. हृदयाचे ठोके वाढत होते. तो अंधेऱ्या झोंपडींतून निरखून पहात होता. तो थक्क झाला. राई ! इथें ! ती कां ? त्याचा पहिला अपराध म्हणून पोलिसाऐवजीं राईच्या रूपानें सद्विवेक

त्याला ' हें काय केलंस ? ' म्हणून जाब तर विचारायला आली नाहीं ? तो ओशाळला. मेल्या नजरेनें पाहूं लागला.

' कुठं गेलां होतां ? '

" सांगून टाकूं चोरी करायला म्हणून ? " त्याच्या मनानें विचारलें.

पण तो बोलला नाहीं. त्याच्या त्या विचित्र घुमेपणानें राईही गोंधळली.

" अर असं र काय आबा ! जाब तरी देतां येतोय् का नाय तुला ? " मावळण त्याच्या हतबुद्ध चेहऱ्याकडे पहात म्हणाली.

आबा भानावर आला. क्षीणपणें हंसला.

आबा—पोटांत भरायला कांटे आणले आहेत. तुम्ही कुठें इकडे ?

राई—एकदां घरला आला त्यावर आला पन नाहीं ?

आबा—दवाखाने नि तुरुग पहात होतों ना ?

राई—आतां या कीं पुन्हा. सई होती का नाहीं सोम्याची ? "

आबा हंसला. " हो ! होते ना ! येईन."

पण त्याला बोलतां येत नव्हतें. राईला त्याच्या लाजऱ्या स्वभावाचें आश्चर्य वाटलें. तिचें मन अधिकच गुंतून पडलें. पण तिलाही बोलतां येईना. विचित्र अबोलपणाचे कांहीं क्षण गेले. मावळणीच्या भाकरीची थाप फक्त ऐकूं येत होती.

" बरं जात्यें. या बरं पुन्हा " राईनें हंसून म्हटलें आणि ती निघाली. तोही बाहेर आला. तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे तो पहात राहिला. तिनें एकदोनदां मागें वळून पाहिलें. त्याचीही त्याला जाणीव झाली. राईच्या रूपानें वरची जात जणुं त्याला पुनः पुन्हा बजावीत होती, " चोरी करूं नको बरं. मग तुझीही ओढ मला आहे."

आबा एकदम आंत आला. कणसांचें पोतें त्यानें पुनः पाठुंगळीस घेतलें.

मावळण—काय र ?

आबा—टाकून देतों हीं.

मावळण—येड लागलंय काय तुला ?

आबा—वेड ? तीं मीं चोरून आणलीं आहेत.

मावळण—मग ? टाकूनशानी काय व्हनार हाए ?

आबा—पाप धुऊन जाईल.

मावळण—अर तूं बैरागी झालास म्हून रिकाम्या पोटानं जगनार हाएस काय ? तुझं पाप तूं धुऊन टाकनार अन् तिकडं तुमां पोरांचीं प्वाटं जाळाया तुमची माय नरकांत त्वांड बुडवील. त्येचं पाप न्हाई तुझ्या डोंबलावर बसत व्हय ?

आबा—काय ? काय म्हणतेस जाईबाई ! माझी आई—

मावळण— हां, तुझी आय—तुझी आय काई पापांत बुडून जल्माला न्हाई आली, अन् तुझा बापूस मुकाट्यानं पापाची भाकर खातो. त्येला बी येड नाहीं लागलं.

आबा आ करून बघत राहिला. त्याच्या चोरीचें नि आईच्या शिंदळकीचें मूळ एकच ?

मावळण—असा आ वासून काय बघतुस ! तुमी प्वारं जल्माला आला म्हून शेज धराया लागली दुसऱ्याची चांगीला. काई इचार तरी करशील का समदं आपल्याच मनच लाड करशील ? धा प्वारं झालींत तिला. हाडं उरलींत तिचीं. त्या हाडांना वासना तरी उरलीय काय ? मरायाची वासना हाए बाकी. तरी बी तुमा पोरांना पोसाया हाडं टाकिती कुत्र्याम्होर.

तिच्या डोळ्यांना पाणी आलें. आणि आबाच्या डोळ्यांतून घळघळ पाणी वाहूं लागलें. तो निघाला. मावळणीनें त्याचा हात धरून त्याला दाटून आलेल्या गळ्यानें म्हटलें, “ भाकर खाऊनशनी जा. ”

“ नको जाईबाई, भाकर जायची नाहीं घशाखालीं.” त्यानें हात सोड-वून घेतला. तो धांवतच आईकडे गेला. चांगुणा उवा मारीत बसली होती. आबानें तिच्या गलिच्छ कपड्यांत तोंड खुपसलें. “ आई ! ” म्हणून हुंदका दिला. चांगुणेला कांहीं कळलें नाहीं. ती घाबरली.

“ अर तुकडा न्हाई खाल्लास दोन रोजांत. भोवंड आली काय ? ”

“ नको, नको आइ तुकडा मला. मला तूं हवी आहेस.” डबडबल्या डोळ्यांनीं त्यानें आईकडे पाहिलें आणि पुनः हुंदके देत तिच्या पदरांत तोंड खुपसलें. चांगुणा हतबुद्ध झाली. तिचे डोळे भरून आले. तिनें त्याला हृदयाशीं धरलें. आज आबाला आई सांपडली. त्या आईसाठीं त्याच्या अंतःकरणाचे तुकडे तुकडे होत होते.

● ● ●

## २६

चांदणें बहरलें होतें. साऱ्या मालिन्यालाही शोभा आली होती. लहान पोरें केव्हांच पेंगून निजलीं होतीं. कैकाडी-भामटे, तरुण आणि म्हातारे जमून भजन करीत होते. आवाजाला ना बांक ना सूर. पण ताठर आवाजांत ओतलेला भाक्तिभाव त्याने ऐकणाराचें अंतःकरण गदगदलें असतें. आबा उशाला एक हात घेऊन एकटा गवतावर पडला होता. चांदण्याच्या अमृतानें त्याचें मन विव्हल होत होतें. भजनाच्या भक्तिभावानें अंतःकरण उचंबळून येत होतें आणि कुठला कुठलासा कींवेचा––सहानुभूतीचा पाझर आबाच्या अंतःकरणांत फुटत होता. दिवसाची सारी कचकच, वटवट, सूडबुद्धि, भुकेची बहकली वृत्ति, ताडीचा माज, काळज्या––वित्रंचना––सगळें सगळें विरून गेलें होतें. देवाच्या चरणाशी कळवळून तल्लीनतेनें गरिबांनी असहाय फोडलेली हांक ऐकून आबाच्या डोळ्यांना पाणी आलें. तोही सारें विसरला. आणि गाऊं लागला मोठ्यानें. मनाचा सारा विव्हलपणा रसरसून जणुं बाहेर पडूं लागला.

झालों मी परदेशी तुजवीण<br>
देवा पांडुरंगा केव्हां भेट देशी<br>
झालों मी परदेशी तुजवीण.

आणि कितीक कैकाडी–भामटे त्याच्याभोंवतीं केव्हां जमले हें त्याला कळलें नाहीं. तो गात होता. ऐकणारे चिपळ्या वाजवीत होते.

• • •

## २७

इकडे रिपन्साहेबांचा चेहरा लालबुंद झाला होता. त्यांनीं काशिनाथ, हणम्या, बन्या, शिरप्या यांना समोर बोलावलें. तीं अठरा अठरा वर्षांचीं

पोरें बेकार हिंडत होतीं. तारेच्या कुंपणांत तीं रहात नव्हतीं. त्यांना हजेरी नव्हती. त्यांनीं चोरी केल्याचा कुठें पुरावा नव्हता. तरी रिपन्साहेब त्यांच्यावर संतापले होते. पोलिसांनीं त्या चारही पोरांना आंत ढकललें. तीं पोरेंही कांहींशीं भ्यालेलीं पण तुच्छतेची नजर टाकीत उभी राहिलीं.

रिपन्साहेब--गांधी टोपी ? गांधी टोपी !

पोलिसांनीं चौघांच्या डोक्यावरील गांधी टोप्या खसकन् काढून घेतल्या. कां कोण जाणे, तीं चारी मुलें आंत जातांच हपिसाबाहेरच्या लोकांच्या नजरांत विलक्षण कुतूहल खेळूं लागलें. पण तें किती ओझरतें. मनांतल्या कोणत्याच खऱ्या भावनांना दृश्य स्वरूप न देण्याचें बाळकडू त्यांना मिळालेलें होतें. तीं मुलें उनाड म्हणून शिपायांनीं सर्वांदेखत दबकावीत ऑफिसांत आणलीं होतीं.

रिपन्साहेब रागानें म्हणाले, "तुमी काई उद्योग करीत नाहीं. नुसते भटकत आहां. हें बरें नव्हे. तुमच्यामुळें सेट्लमेंटांतील लोक बिघडत आहेत. तुमी वाईट लोकांच्या संगतींत आहां."

काशिनाथ--नाहीं साहेब.

रिपन--तूं बोलूं नको. माझी खात्री आहे. तुमांला संगत वाईट आहे. तुमाला एकवार ताकीद दिली असतांही तुमी आवारांत भटकत असतां. आजपासून तुमांला या वस्तींत हिंडण्याची मनाई आहे. आबा--आबा कोठें आहे ?

पोलिसांची धांवपळ झाली. आबा साहेबांपुढें ढकलला गेला. त्याच्या डोक्यावरील खादीची टोपी पुनः पोलिसांनीं साहेबांच्या देखत ओढून साहेबांची मर्जी संपादण्याचा प्रयत्न केला. आबाला कांहींच कळलें नाहीं.

रिपन--तूं गांवांत दंगल माजवतोस. आमी नोकरी देत नाहीं असें म्हणून आमचीं नांवें खराब करतोस. तूं वाईट आहेस म्हणून तुला नोकरी देत नाहीं.

आबाला आंत ओढून नेतांच गेन्या पंचप्राण डोळ्यांत आणून दरवाज्यांतून डोकावत होता. तो एकदम गयावया करून म्हणाला,

"सायब, माझा आबा वंगाळ न्हाई. त्यो लई शाना हाए--शीयी देत न्हाई. चोरी करीत न्हाई. तोंडाम्होरं बोलत न्हाई. तुमी त्याला रोजगाराला लावा."

रिपन—शट् अप् ! तुला बोलतां येणार नाहीं. तूं बाहेर जा.

पोलिसांनीं त्याला हांकून दिलें.

रिपन—तुमी लालबावट्यासंगें हिंडत असतां. गांधी टोपी घालून अधिकाऱ्यांचा अपमान करतां.

आबा—नाहीं साहेब. लालबावटा मला माहीत पण नाही. ही टोपी एक आण्याला मिळते म्हणून मीं घातली.

मुलें—हो साहेब. आम्ही पण म्हणूनच घातली.

रिपन—तुमी खोटें बोलतां. कॉंग्रेस–गांधी–लालबावटा !

मुलें—नाही साहेब.

रिपन—मला विरोध आवडत नाहीं.

आबा—पण साहेब आमच्यावर उगीच आरोप केलेला आम्हीं तरी सहन कसा करायचा ?

रिपनसाहेबांना भयंकर चीड आली. त्यांनीं टेबलावरील वेताची छडी हातांत घेऊन दहा दहा छड्या त्वेषानें मुलांच्या पाठीवर ओढल्या. मुलें विवळत होतीं. अंतरंगांत द्वेष, तिरस्कार उबत होता. सोललेल्या पाठींनीं साहेबांचा निर्दयपणा जणुं रक्तानें सदऱ्यावर लिहिला.

रिपन— तुम्हांला सेट्लमेंटच्या आवारांत हिंडण्याची बंदी केली आहे. तुम्ही चालते व्हा.

मुलें बाहेर आलीं. त्यांच्या डोळ्यांतील पाणी त्यांनीं झटकन पुसून वेदना गिळल्या. बाहेरच्या सदैव वटवट करणाऱ्या लोकांत कधीं न पाहिली–ऐकलेली शांतता पसरली. गेन्याच्या आर्त बडबडीनें ती शांतता भंगली. तो हेंगाड्या भाषेंत तावातावानें बडबडत निघून गेला. कुणालाही त्या पोरांचा गुन्हा कळला नाहीं. त्यांना पांढऱ्या टोप्या गेलेल्या तेवढ्या दिसल्या. बाहेरच्या लोकांनीं रिपनसाहेबाला आपल्या भाषेंत लाखोल्या वाहिल्या.

रिपनसाहेबांनीं त्या तरुणांच्या सुकल्या अंतःकरणावर आज ठिणगी पाडली. तीं अंतःकरणें चेतलीं. तरुण पोरांना साहेबांचें मर्म कळून पाठीवरच्या वेदनाही सहन करण्याची ताकद आली. आजवर आपलें गाऱ्हाणें ऐकणारा कोणी नाहींसें त्यांना वाटे. आज त्यांना कळून चुकलें कीं रिपनसाहेबांविरुद्ध गाऱ्हाणें करायला जागा आहे.

समदुःखी आबा अस्पृश्यतेचें दुःख विसरला. काशिनाथ, हणम्या, शिरप्या, बन्या, आबा——सर्वांचीं निराश झालेलीं मनें धगधगून उठलीं.

" चोरी केली तर शिक्षा कर. पण सावासारखें वागतों तरी पण शिक्षा करणारा तूं कोण? तुझा काटा नाहीं काढला तर याद राख."

चोर-वस्तीच्या बाहेर नालीवर बसून तिघांनीं मनमानेशीं बडबड केली. आज आबाला कळून चुकलें. रिपनसाहेबांचें शत्रुत्व त्यानें कालआज पत्करलें नव्हतें. तो गांधी-सेवा-मंडळांत गेला तेव्हांपासून साहेबाची त्याच्यावर इतराजी झाली, पण आज त्याला कृतकृत्य वाटलें.

● ● ●

## २८

गिरणीचा भोंगा वाजला. कोंडवाड्यांतून मेंढरें बाहेर पडावीं तशीं मजूर माणसें बाहेर पडलीं. एक दोन करतां करतां संभाजी मैदानावर प्रचंड जमाव जमला. चोर-वस्तींतील कांहीं मजूर ताडीच्या दुकानाकडे वळले. कांहीं चोर-वस्तीकडे निघाले. पण कांहीं प्रचंड जमावांत जाऊन उभे राहिले. एका मोठ्या उंच जागेवर दोन चार माणसें बसलीं होतीं. एक मनुष्य उभा राहून खड्या आवाजांत बोलत होता.

" कोन ? कोन हाए रे त्यो बाबा ? "

" त्यो ? येड्या ! म्हाईत न्हाई का? आजवर आलाच न्हाईस कंदीं? "

" न्हाई बाबा."

" अर, त्यो बारनेसायब नव्हं का ! "

त्या दोघांच्याच मागें चोर-वस्तींतून हांकून दिलेलें टोळकें उभें होतें. त्यांनाही आज प्रथमच बारण्यांचें नांव कळलें. बारणे बोलत होते.

" तुमच्या कष्टावर गबर होणाऱ्या गिरणीच्या मालकांना तुम्ही विचारा कीं आमच्या कष्टाचें मोल भरपूर देणार कीं नाहीं? हें विचारण्याचा तुमचा हक्क आहे. तुम्ही माणसें आहांत. तुम्हांला माणसासारखे जगूं न देतां, तुम्हांला जनावरांप्रमाणें राबवून श्रीमंत होणारांना तुम्ही हडसून खडसून विचारा कीं,

आमच्या श्रमांचें मोल बऱ्या बोलानें देतोस कीं नाहीं ? देत नसशील तर आम्ही सारे एक होऊं. आमच्या सगळ्यांच्या एकीचें सामर्थ्य इतकें दांडगें आहे, आमच्या सगळ्यांच्या एकीचें सामर्थ्य इतकें प्रचंड आहे, कीं त्यापुढें जगांतील कोणतीही दुष्ट सत्ता पांगळी होईल; त्यापुढें जगांतील कोणतीहि दुष्ट सत्ता कोलमडून पडेल." आबानें काशिनाथला चिमटा घेतला. त्यानेंही आबाच्या खांद्यावरील हात दाबला. हणम्या, शिरप्या एकमेकाकडे पाहूं लागले. बारणे बोलत होते. या तरुणांच्या अंगावर रोमांच उठत होते. शेवटीं बारणे म्हणाले, "मग बोला, गिरणीचा संप यशस्वी करणार कीं नाहीं ?"

जमावानें "होय. संप यशस्वी करणार." एकदम घोष केला.

बारण्यांनीं विचारलें, "निढळाच्या घामानें पैसा मिळवणारा एकही मजूर एकजूट मोडणें शक्य आहे काय ?"

जमावानें एकसुरांत म्हटलें, "नाहीं. नाहीं."

"आमच्यावर जुलूम झाला. आमच्यावर लाठीमार झाला, आम्हांला दुष्ट सत्तेनें तुडवलें, तरी आम्ही संप यशस्वी करणार."

जमाव ओरडून म्हणाला, "संप यशस्वी करणार."

सर्वांच्या त्या एकसुरानें अंगें मोहरून जात होतीं. सभा संपली. त्या सर्व जमावाचा घोंऽऽ असा महासागरासारखा आवाज उठला आणि हळू हळू वाऱ्यावर विरून चालला. चोर-वस्तींतील तरुणांचा पाय निघेना. आज त्यांना नवी श्रद्धा, नवा देव दिसत होता. त्यांच्या तप्त अंतःकरणावर थंडथंडशी वाणी शिंपली गेली होती. पाठीवरच्या फटक्यांच्या जखमांना मलमपट्टी बांधली जात होती. ते भीत भीत बारण्यांजवळ आले. रयतेंतील एवढ्या मोठ्या माणसाशीं बोलायचें कसें ? धो धो वाहाणाऱ्या अस्खलित वाणीनें हजारों लोकांच्या अंतःकरणाची पकड घेणाऱ्या बारणेसाहेबांच्या जवळ जाऊन बोलायचें म्हटलें तरी केवळ आदरानेंच. त्या तरुणांची वाचा पांगुळली. शब्दाला शब्द जुळत ना. शेवटीं आबाला त्यांनीं पुढें घातलें.

आबा—महाराज, आम्हांला आपल्या पायापाशीं गाऱ्हाणं आणायचं आहे.

बारणे—तुम्ही कुठले ?

आबा—आम्ही चोर-वस्तींतले आहोंत महाराज.

बारणे—गिरणींत आहात ?

काशिनाथ—नाहीं साहेब. गिरणींत नाहीं. आम्ही बेकार आहोंत.

बारणे—मग ? काय हवंय् तुम्हांला ? नोकरी ? ती मी देऊं शकणार नाहीं.

आबा—नाहीं; महाराज, नोकरी नको. पण आम्हांला आपण काय करावं तें सांगा. आम्ही फार घोळांत पडलों आहों.

बारणे—काय झालें ?

आबा—चोर-वस्तीला फार जाच होतोय. आपण आतांच म्हणाला, सगळे एक झाले तर दुष्टांचा कांटा काढतां येईल. पण आमची चोर-जात अडाणी आहे. त्याना एक कसं करायचं महाराज ?

हणम्या—अन् हिकडं तर हामची चामडी सोलतोय सायब.

आबा—बघा, महाराज, आमच्या पाठीवरचे वळच बोलतील.

त्या चौघांनीं आपल्या पाठीवरचे वळ दाखवले. बारण्यांनाही ते पाहून आश्चर्य वाटलें.

बारणे—कोणीं मारलं तुम्हांला ?

काशिनाथ—रिपनसाहेबानं.

बारणे—कां ?

आबा—गांधी टोपी घातली म्हणून! लालबावट्याचे समजून मारलं. मला गांधीजी माहीत होते. लालबावटा तर माहीत पण नव्हता. आतां कळला. आम्ही गांधीजींच्या बाजूनें आहोंत. कॉंग्रेसनें आमचीं गाऱ्हाणीं दूर करावीं.

त्यांपैकीं कुणालाही लालबावटा आणि कॉंग्रेस निराळी वाटत नव्हती. रिपनसाहेबांनाही वाटत नव्हती. कारण दोन्ही त्यांना अनिष्टच वाटत.

बारणे—आतां हा परवांचा संप होऊन जाऊं द्या. मग भेटायला या.

तरुणांनीं बारण्यांना लवून सलाम केला. ते माघारे फिरले; इतक्यांत बारण्यांनीं त्यांना पुनः बोलावलें. त्यांचीं नांवें विचारलीं आणि त्यांना विचारलें, " तुम्ही गिरणींत नाहीं; पण काम कराल कीं नाहीं ? "

"करणार साहेब. आम्ही गिरणीचा संप करा हेंच' सांगणार साहेब. आपण सांगायला पण नको."

बारणे—हें पहा, शक्य तर प्रत्येक कामगाराला स्वतः सांगा. अजून ४८ तास आहेत.

● ● ●

## २९

चोर-वस्तीच्या आवाराबाहेर एका नाल्याच्या भिंतीवर बसून आबा, काशिनाथ, हणम्या खलबतें करीत होते. आज त्यांच्या बेकार तरुण शक्तींना काम मिळालें होतें. ते येणाराजाणाराला सांगूं लागले, "गिरणीच्या संपांत गेला तर पगार वांटून मिळेल. संपाच्या दिवशीं गिरणींत जाऊं नका."

एक पोक्त कैकाडी त्यांच्याजवळ येऊन म्हणाला, "आर पोरांनु, परवांला पाठी सडकून काढल्या तुम्हां पोरांच्या. कशाला कारस्थानं करताय? फुकटांत मराल."

काशिनाथ—का? हिथं सांगायला बंदी आहे काय? आम्ही हद्दींत तर नाहीं आलों?

कैकाडी—अर बाबांनो! हद्दीबाहेर आलां. पन हितं कायद्याची भाषा आपुन न्हाई बोलायची. अंमलदारांनीं कायदा सांगायाचा, आपुन पाळायाचा. ज्याला जायाचं गिरनीला त्यो जाईल. न्हायाचं त्यो न्हाईल.

कैकाडी निघून गेला, पण मुलांच्या उत्साहांत कमतरता आली नाहीं. एक तरुण भामटा कामगार त्यांच्याजवळ आला.

काशिनाथ—अरे ए, संपावर जायचं बरं! याद राख संप मोडलास तर!

तरुण—अरे जा. तूं कशापायीं होवास सांगाया! हामाला काय शानपन न्हायी काय? अन् काय र, हिथं बोंबलत बसलाय त्या परीस चार जन चार ठिकानाला तरी व्हा. जर अंमलदारांनीं पायलं तर टाळकं फोडत्याल.

तरुणांना त्या भामट्याचें म्हणणें पटलें. भामटा चालायला लागला. आबानें त्याला माघारीं बोलावलें, " ए, तूं तारेंतल्या लोकांना सांगणार का नाहीं ? "

" अरे पोरा, तुमच्यासारखा चार गांवाला बोंबलनार न्हाई. पघशील तूं. हा नाऱ्या भामटा म्हाईत न्हाई तुला अजुनी. बारनेसायबाला पूस जाऊन-शानी."

तरुण पोरें चारही गिरणीच्या रस्त्यावर चार ठिकाणीं पांगलीं. त्यामुळें चोर-वस्तींतल्या हरएक कामगाराला चौघांकडून शिकवण मिळत होती. कुणी पट्टेवाला नाहीं तर अंमलदार दिसला कीं ते गप्प बसत.

जातां जातां एक तरुण त्यांना म्हणाला, " काय र, संप क्येला अन् रोजगार ग्येला तर तुमी जेवाया घालनार काय र ? "

त्यानें या तरुणांकडे फारसें लक्षही दिलें नाहीं. त्याच्या प्रश्नावर आबा, काशिनाथ हा तरुण कंपू निरुत्तर झाला, तरी त्यांना आशा होती कीं बारणे-साहेबांचें म्हणणें खोटें होणार नाहीं. आज हजारों लोकांनीं केलेल्या घोषणे-मध्यें दम नाहीं असें कसें होईल ? संकटाचे पर्वत आज त्यांच्यापुढें भुईसरपटे झाले होते.

चोर-वस्तींतील कामगारांच्या मनाची या तरुणांना कल्पना आली होती. अत्यंत कष्टांनीं हातांत पडणारा पैसा एका दिवसाच्या विचारानें वा अविचारानें जाण्याची भीति ही त्या गरिबांच्या बाबतींत नुसती भीति नसून भीषणता होती. त्यामुळें कधीं नव्हता तो विचार कित्येकांच्या मनांत आला. " हीं उनाड पोरं, स्वतः काम करीत नाहींत. दुसऱ्यांना चिथावतात."

कुणी म्हणाले, " अरे रयतेंतले मजूर निराळे, इथले निराळे. त्यांना गिरणींतलं काम सुटलं, तर दुसरीकडे मिळेल. तुम्हां आम्हांला माती खायची वेळ येईल."

आपण करूं न करूं; पण संप व्हावा, पगारवाढ व्हावी असें मात्र सग-ळ्यांना वाटत होतें, आणि बारण्यांच्या कितीक सभांना कित्येक जण गेले होते.

● ● ●

## ३०

संध्याकाळ टळली. रात्र झाली. आबाचा कंपू अंधाराच्या बुरख्याखालीं चोर-वस्तीच्या आवारांत हिंडून कानोसा घेत होता. पट्टेवाला नाऱ्या भामटा, परशा कैकाडी, गंग्या पारधी यांना घेऊन चालला होता. पट्टेवाल्याच्या नजरेस पडायला नको म्हणून आबा आणि काशिनाथ झोपडीमागें दडले. पट्टेवाला पुढें गेला. हपिसाबाहेर दिव्यांचा झगझगाट होता. रात्रीं रिपनसाहेबांच्या हपिसाबाहेर नेहमीप्रमाणें अनेक गाऱ्हाणीं घेऊन तेथील क्षुद्र जीव तिष्ठत होते. पण त्यांच्या गाऱ्हाण्यापेक्षां स्वतः रिपन्साहेबांचेंच गाऱ्हाणें फार मोठें होतें. चोर-वस्तीतील कित्येक लोक लालबावट्याच्या सभेला गेले होते. त्याची यादी पोलिसांनीं केली होती. रिपन्साहेबांच्या पुढेंच ती यादी पडली होती. त्यांचा राग अनावर झाला होता.

" तुमी काय करीत असतां ? गांवांत कामाला गेलेल्या लोकांवर लक्ष ठेवण्याचें काम तुमी बरोबर करीत नाहीं. यापुढें असें खपणार नाहीं. " रिपन्साहेबांनीं शिपायांना खडसावलें.

एकादें जनावर लाल चिंधीला बुजावें, त्याप्रमाणें लालबावट्याचें नांव ऐकतांच रिपन्साहेबांची स्थिति होई. पांढऱ्या टोपीलाही ते बुझत आणि त्या टोप्या तर चोर-वस्तींत फार दिसूं लागल्या होत्या. हीं सगळीं कारस्थानें चाललीं आहेत, असा रिपन्साहेबांना संशय आला होता. रिपन्साहेबांच्या भीतीनें आणि आपल्या रोजगाराची शाश्वति म्हणून चहाडबुचके लोकही बरेच झाले होते. रिपन्साहेबांनीं दहा बारा जणांना बोलावलें. त्यांत कैकाडी होते, भामटे होते, भाट होते. साहेब म्हणाले,

" तुमी तारेच्या वस्तींत नाहीं. स्वतंत्र आहा. फ्री कॉलनींत आहां. तुमाला वस्तींत येण्याची परवानगी नाहीं. तुमी गडबड करतां, तुमच्यामुळें दंगल होते. तुमी आमच्या परवानगीवांचून येथें याल तर तुमांला कडक शिक्षा करावी लागेल. आमी तुमांला बजावीत आहोंत. तुमी कामधंदा नीट न कराल आणि दंगल कराल तर तुमांला गिरणींतून काढून टाकण्याविषयीं आमी सांगूं. "

रिपन्‌साहेबांनीं मनांत आणलें असतें तर त्या सर्वांना तारेंत कोंबणें त्यांना अशक्य नव्हतें. त्यांच्यावर चोरी—दरवडेखोरीचा आरोप त्यांना सहज घालतां आला असता.

त्यांनीं नाऱ्या भामटा, चंदू पारधी, शाम्या कांबळे यांचीं नांवें वाचलीं. पोलिसांनीं त्यांना ढकलीत पुढें आणलें. ते तिघेही तारेंत राहणारे होते. त्यांचीं बायकामुलें तारेंत होतीं. त्यांच्या कमाईवरच तीं घांसभर अन्न खाऊं शकत होतीं. पण नाऱ्या भामटा, चंदू पारधी, शाम्या लालबावट्याच्या सभेला गेले होते. त्यांनीं जयघोष केला होता. पोलिसांनीं त्यांना रोखलें होतें. नांवें टिपून घेतलीं होतीं. त्यांच्या गुन्ह्याबद्दल रिपन्‌साहेबांची खात्री होती.

" तुमी वस्तींतील लोकांना संप करण्याबद्दल चिथवीत आहां. तुमची वागणूक अतिशय वाईट आहे. आमी तुमाला आजच्या आज दुसऱ्या गांवीं बदलीत आहों."

नाऱ्या भामटा ओरडला, "साहेब, आमी जानार न्हाई. आमी काईबी गुन्हा क्येला न्हाई. हामच्या पोटाची अबदा होती. आमाला मिळतोय तो दाम पुरत न्हाई. रयतेंतले समदे कामगार संपावर गेल्यावर हामी ग्येलों न्हाई, तर समद्यांची येकी न्हाई म्हून संप व्हायाचा नाहीं अन् मग पगार बी वाढायचा न्हाई. सायेब, हामी इथल्ला गुना काय बी क्येला न्हाई."

चंदू पारधीही त्याच वेळीं ओरडत होता, "साब, समदे उभे व्हत्ये म्हून मीबी उभा -हाइलों. मी काय चोरी क्येली न्हाई, दंगल क्येली न्हाई. मला कशापायीं दुसरीकडे पाठवनार ? मी न्हाई जायाचा."

आणि ते तिघे ओरडत होते, " आम्ही जानार न्हाई. "

त्यांच्या बायका माणूस मेल्यासारख्या रडूं लागल्या आणि त्या रडल्या म्हणून पोरेंही रडलीं. बायकांनीं ऊर पिटले. धूळ तोंडांत भरली. पण कुणाला कींव आली नाहीं. आणि पहातां पहातां बायकापोरांचा निरोप घेण्याची सवडही न मिळतां रिपन्‌साहेबांच्या रागानें त्यांची ताटातूट झाली. रातोरात पोलिस त्यांना घेऊन गेले. चोर-वस्तींतले लोक चिडले. त्यांना नको तें माहीत झालें. आतां त्यांना रिपन्‌साहेबांचें नाक ठेचण्याची अनिवार इच्छा झाली. आबा, काशिनाथ अंधारांत दडून सारें पहात होते.

रातोरात बारण्यांच्या घरीं आबा—काशिनाथ धांवत गेले. त्यांच्या तरुण मनांचे फुटून तुकडे झाले होते.

• • •

## ३१

त्या दिवशी पहिल्या प्रथम चोर-वस्तींतील लोकांना साहेबाची भयंकर चीड आली, आणि त्यांना आसुरी आनंदही झाला. ज्या साहेबापुढें अपराध असो नसो, शरणागतीखेरीज गति नव्हती तो साहेब देखील कुणाला तरी भितो तर ! लालबावट्याकडे एरवीं लक्षही न देणारे चोर-वस्तीचे लोक थबकून आपल्या हेंगाडी भाषेंत एकमेकाशी लालबावट्याबद्दल बोलूं लागले.

आजपर्यंत गिरणींत संप झाले पण ती आग रिपन्‌साहेबांनीं चोर-वस्तींत कधींच भडकूं दिली नाहीं. गिरण्यांतून गेलेले कामकरी चोर-वस्तींत वेळेवर हजर झाले पाहिजेत. त्यांनीं कोणत्याही सभांना जायचें नाहीं, हा निर्बंध होता. ताडीच्या गुत्त्यांत लोक जात; पण रिपन्‌साहेबांनीं त्यांना मना केलें नाहीं. कारण ताडी पिणें ही चोर-लोकांच्या धर्मांतील एक बाब होती ! त्यांत ढवळाढवळ करण्याची साहेबाची इच्छा नव्हती. धर्मांत हात घातला तर लोक बंड करतील. त्यापेक्षां ताडी पिण्याकडे दुर्लक्ष केलें तरी बरें, असें साहेबांना वाटे. गिरणी सुटे. लोक ताडीच्या गुत्त्यांत जात आणि पशू होऊन येत.

फत्तरासारखीं झालेलीं तीं पानवडच्या खोऱ्यांतील माणसें खोऱ्याबाहेरील जगांत काय चाललें आहे, याची विवंचना करीत नसत. कारण तें त्यांचें जग आहे, त्याच्याशीं त्यांना केव्हां तरी समरस व्हायचें आहे हें त्यांना कुणींच सांगितलें नव्हतें. पण कामधंद्यावांचून बेकार हिंडणाऱ्या कांहीं तरुणांनीं पहिल्यांदा बातमी आणली कीं आपल्याला बेकार करणाऱ्या गिरणीमालकाचा लालबावटा कांटा काढणार आहे. मग सगळ्यांची पगारवाढ करून देणार आहे. मग कांहीं अर्धपोटी जगूनही रगेल राहणारे तरुण लालबावटा दिसला कीं थबकं लागले. सभेंतील बोलणीं ऐकूं लागले. ते चोरून इकडे तिकडे पहात.

शिपायांची नजर चुकवीत. पण त्या पशूंना हें ज्ञान कधीं काळीं येईल, ही कल्पनाही रिपन्साहेबांच्या अनंत डोळ्यांना आली नाहीं, पण आज तर लालबावटा सगळ्यांना माहीत झाला. साहेबाबद्दल चीड म्हणून लालबावटा माहीत झाला आणि लालबावट्याच्या संपाची माहिती साहेबावरच्या चिडीमुळें सर्व लोकांना झाली.

गिरणींत जावें न जावें याची दबत्या आवाजांत साऱ्या वस्तीभर चर्चा होत होती. शिपाई कानोसा घेत होते. त्यांच्या कानांना बोळे घालून सारी वस्ती चर्चा करून निर्णय घेत होती. उघड बोलण्याची सोय नव्हती. कुठें, कुणाची आणि केव्हां उचलबांगडी होईल याची सर्वांना दहशत होती. उद्यां नोकरी गेली, तर परवां खडीफोड कपाळीं येणार याचीही दहशत. कित्येक या भीतीभीतीनें दबून गेले, तर कांहीं मूठभर लोक तोंडानें संपाविरुद्ध बोलत मनाशीं निराळाच निश्चय मांडून बसले होते, कीं कामावर जायचें नाहीं, मग काय व्हायचें तें होईल. आणि इकडे रिपन्साहेबांचीही धांवपळ सुरू होती. आबा, काशिनाथ, हणम्या, वन्या ‘प्रजा’ वर्तमानपत्र चोर-वस्तीभर वांटीत होते. आणि सक्तीनें साक्षर झालेली आणि पुनः सारें विसरलेली ती वस्ती चोरून लहान मुलांकडून वर्तमानपत्रें वाचून घेत होती. वर्तमानपत्रें दडवीत होती.

जे ऐकमेकांना पुरतेपणीं ओळखीत होते तेच संपाबद्दल एकमेकांशीं मनमोकळे बोलत. पण चुगलीच्या भीतीनें जणूं कांहींच झालें नाहीं आणि होणारही नाहीं अशाच आविर्भावानें माणसांचे व्यवहार चालले होते. त्यांची ती रांगडी भाषा त्यांना किती उपयोगी पडत होती. कांहीं चुगलखोर साहेबांची मर्जी संपादन करायला ही संधि फार चांगली आहे असें समजून कानोसा घेत होते. त्या चुगलखोरांत अधिकारी किंवा नोकरच होते असें नव्हे; चोर-वस्तींतलेही कांहीं त्यांत सामील होते.

• • •

# ३२

शेवटीं ती सकाळ झाली. चोर-वस्तींतील कामगार नेहमींप्रमाणें न्याहारी करून भाकर बरोबर घेऊन निघाले. ज्याच्या त्याच्या मनांत कुतूहल. दुसरा जातो कीं नाहीं. आणि आसपास अधिकारी शिपाई नाहींतसे पाहून एक-मेकांना विचारीत,

" आज गिरन चालणार काय ! "

पण चालणार कीं नाहीं हें कुणालाच माहीत नव्हतें. गिरणीजवळ जाणा-रांना लाठ्या घेतलेले पोलिस हिंडतांना दिसत होते. त्यांच्याकडे पाहूनच गरीब अंतःकरणें खचलीं. रयत वस्तींतले कामगारही गिरण्यांकडे गेले होते. त्यांनाही कळेना संप होणार कीं नाहीं.

गिरण्याबाहेर रोजच्या वेळेआधींच थवे लोटले होते. वातावरण पोलि-सांच्या अस्तित्वानें आणि शंकेनें तंग वाटत होतें. भयाकुल शांतता पसरली होती. संपवाले निर्भयपणें ' गिरणींत जाऊं नका ' म्हणत होते.

भोंगे वाजले. लोक थांबले. पुढें गेले. थबकले. भोंगे वाजले, वाद्याच्या दीर्घ आरोळीसारखे. तरी लोक थबकलेले. त्यांनीं सर्वांनीं पाहिलें. एक निर्धारानें आंत शिरला. दुसऱ्याला वाटलें तो गेला आणि आपण बाहेर राहिलों तर ? नोकरी जाईल. पहिल्यामागून दुसरा गेला. त्याच्या मागून तिसरा. लोटचे लोट आंत गेले. सगळे साशंक. हें काय झालें ? पुढें काय होणार ? संप झालाच नाहीं तर ! सगळे आंत गेले. आलों म्हणून बरें नाहीं तर फुकटांत नोकरी गेली असती.

गिरणी सुरू झाली. बहुतेक चोरट्या नजरांनीं इकडे तिकडे पहात होते. असं कसं झालं ? संप कां नाहीं झाला? अर्धा तास झाला. एकानें कांड्या फेकल्या. तो धांवला. त्याच्याबरोबर दुसरा-तिसरा. भराभर लोक बाहेर येऊं लागले. कणसांतून दाणे निखळावे तसे. गिरणी ओस पडली.

बाहेर नुसता वचवचाट. इतक्यांत कुणी कोणाला धोंडा मारला. एक दोन तीन. आरडाओरडा. पोलिस लाठी घेऊन धांवले. लाठी सुरू झाली. लोक पळत सुटले. चोर-वस्तींतले चोर-वस्तीकडे धांवले.

आबा—काशिनाथ—हणम्या निरनिराळ्या कोपऱ्यांवर उभे राहून म्हणत होते, " अरे ! काय ! गिरणीचा संप झाला ! शाब्बास ! " इतरांबरोबर तेही आनंदानें हंसत आले.

चोर-वस्तींत लॉऱ्या उभ्या होत्या. पोलिस किती तरी ! ते फर्मावीत होते, " चला, गाडींत बसा." आणि जे बसत नव्हते, त्यांना ते ढुसण्या देऊन ढकलीत होते. रिपन्साहेब जातीनें हिंडत होते. सारे अधिकारी जणुं मेंढ्या वळायला सज्ज होते. हातांतील काठ्यांचे, चाबकांचे तडाखे आणि ते दुबळे जीव प्रतिकारशून्य होऊन लॉऱ्यांत बसले.

गिरण्यांपुढें लॉऱ्या रिकाम्या झाल्या. पोलिसांनी त्यांना आत जाण्याचे हुकूम दिले. शेंकडों लोक आंत गेले आणि चोर-वस्तीच्या लोकांनीं गिरण्या चालू केल्या. शें-पन्नासपेक्षां अधिक चोर-वस्तीच्या कामगारानी दोन गिरण्यांतील संप मोडला. रयत कामगार त्यांना शिव्या देऊं लागले. चोर-वस्तीचे कामगार जणुं जात्याच्या दोन तळ्यांत चेंगरले जात होते. आधींच अवमानित चोर-वस्ती. ती कामावर गेल्यानें अधिक अवमानित झाली.

आबा—काशिनाथ-हणम्या—वन्या या चौघांच्या मागें मनानें चाळीस जमले. अंतःकरणांत फुललेल्या ठिणगीला आणखी तेज चढलें. रिपन्साहेबांबद्दल आधींच वाटत असलेल्या तिटकाऱ्यानें चिडीचें रूप घेतलें. आणि ती चीड ओरडून म्हणाली,

" रिपन् मुर्दाबाद ! "

पण इकडे तिकडे पाहून. हपिसर जवळ नसतांना ! हपिसर अधिकच कांगेपिंगे होऊन पहात होते.

पाठीवरच्या वेताच्या छड्यांचे वळ अजून बुझले नव्हते. आणि आबा—काशिनाथ कंपू संप मोडल्यानें शरमिंधा झाला होता. आपण बारणेसाहेबाकरितां कांहीं केलें नाहीं ! त्यांचीं मनें उद्विग्न झालीं. आपल्यामुळें संप मोडला. आणि खाजिल अंतःकरणांचीं दुःखें सांगण्यासाठीं तें निघाले.

● ● ●

# ३३

आबा आणि त्याचे मित्र स्वतःशीं मोठें थोरलें गूढ बाळगल्यानें फुलले होते. रात्र केव्हां पडते नि आपण केव्हां जातों असें त्यांना झालें होतें. ते कोणाशी अवाक्षर बोलले नाहींत. आज त्यांना बारण्यांनीं घरीं बोलावलें होतें. ते गांवांतून झपझप जात होते. त्यांची दृष्टि दूरवर सभोंवार फिरत होती. हपिसरांना बारण्यांचें घर माहीत होतें. आणि त्यांची नजर चोर-वस्तींतील लोकांवरही होती.

सब्-इन्स्पेक्टर शिंदे सिगरेटचा धूर सोडीत मंदपणे सायकल फिरवीत एका गल्लींतून आले.

" बाप रे ! बरं झालं आपण त्या गल्लींत शिरलों नव्हतों ! " प्रत्येकाच्या मनांत विचार आला.

आणि क्षणार्धांत एकमेकांना सूचनाही न देतां चौघे चार दिशांना गेले. एक रस्त्याच्या बाजूला असलेल्या अंधाऱ्या जागेंत पाठमोरा गेला. एक रस्त्याच्या कडेला असलेल्या नालींत. एक उलट्या दिशेला फिरून दुसऱ्या गल्लींत शिरला. आबा जरासा गोंधळला. शिंद्यानीं त्याला गांठलेंच. आबा अंतर्यामीं घाबरला. पण आपण सहजासहजीं चालल्याचा आविर्भाव करून तो तसाच पुढें चालला.

" काय रे गारुड्या, कुठें चाललास ? "

" सरकारी दवाखान्यांत मावळणीचा नवरा आहे, त्याला भेटायला चाललों." रक्तांत मुरलेल्या चातुर्यानें आणि हजरजबाबीपणानें आबा म्हणाला. त्याला स्वतःलाच मावशीचा नवरा दवाखान्यांतून परत घरीं तर नसेल आला अशी शंका आली. छातींत धडधड सुरू होती. पण त्याच्या बोलण्याचें त्यालाही आश्चर्य वाटलें. कौतुक वाटलें.

" काय रे साल्या, काल चाबकानं फोडला तरी मावळणीच्या नवऱ्याचं कारण सांगून चाललास का रे ! "

" तुम्ही माझ्याबरोबर चला. मी सांगतों तें खरं कीं खोटं पहा."

" चल. चल लेका. तुम्ही फार हिकमती करायला लागलात."

आतां मात्र आबाला भीति वाटली. नसला मावळणीचा नवरा दवाखान्यांत तर? शिंदे त्याला पुढें घालून चालले होते. मधून मधून शिव्या हांसडीत होते.

आबा विचार करीत होता. भिरभिर पहाणें, वस्तू हातोहात लांबवणें, वाऱ्यासारखें पळून अदृश्य होणें, थापा अगदीं खऱ्यासारख्या कळकळीनें सांगणें, वेळीं सुचेल तसें नाटक करणें—सगळी चोर-जात यांत पटाईत. आज माझ्या रक्तांतील जात मला उपयोगी पडणार कीं मी फशीं पडणार!

ते दोघे दवाखान्यांत गेले. आबाला वाटलें, मागच्या मार्गेंच पळून जावें. पण तें शक्य नव्हतें.

शिंद्यांनीं चौकशी केली. कल्या गायकवाड दवाखान्यांत होता. आबाला हायसें वाटलें. शिंदे कल्यासमोर उभे राहिले. तो चमकला.

" काय रे, मरायला गेला कशाला बैलगाडीखालीं?" शिंद्यांनीं प्रेमळ चौकशी केली!

" आपूनहून कोन जातंय साहेब? मी रस्त्याच्या कडकडंला चाललों, तर बैलानं ढुसणी दिली दंडाला. तर हिथं फाटूनच गेला दंड."

" आतां बरं आहे ना?"

" बरं कसलं साहेब. ताप हाए अजून."

" तूच याला बोलावलंस का झोंपायला हिथं?"

क्षणार्धांत कल्याच्या लक्षांत आलें. " जी. रातभर पानी पानी करतोय् तर पानी द्यायला कुनी न्हाई. तवां बोलूनशानी घेतलाय. काय र आबा लई उशीर क्येलास! अर भाकर खातुस माझ्या घरीं. भाकरीला तरी जाग. असा उनाडावानी भटकत फिरतोस तर पानी द्याया आलास तर मरशील?"

नाटकाचा एक प्रवेश उभारल्यावर पुढील प्रवेश उभारणें, अगदीं सांगीवांचून उभारणें, ही कला सर्वांना माहीत होती. कल्यानें प्रवेश रंगवला. आबा म्हणाला,

" मला माहीत नव्हतं म्हणून काल आलों नाहीं. आतां रोज येईन."

शिंद्यांचें समाधान झालें, तरी शिव्या हांसडीत आबाच्या उनाडपणाबद्दल दटावीत ते निघून गेले. आबा हंसला. कल्या हंसला. कल्यानें त्याच्या पाठीवरून हात फिरवला. " जा जा बोलूं नग. मला संमद सांगती ही येती तवां. पोरा, गवसूं नग अं ! "

आबा अधीरतेनें निघून गेला.

• • •

# ३४

रयतेतील माणसांशीं आबा काय किंवा त्याचे सोबती काय, त्यांचा संबंध आला होता तो शिकत असतांना. पण कुणाच्या घरीं जाऊन बोलण्याबसण्याचा तो प्रसंग अगदींच नवा होता. त्या प्रसंगांतून आपण कसे पार पडूं याची कुणालाच कल्पना नव्हती.

एका मोठ्या थोरल्या खोलींत टेबलावर कांही पुस्तकांचा रच्चा पडला होता. कागदांच्या चळती पडल्या होत्या. चार पांच ठोकळेबाज पलंग पडले होते. एक दोन चहाचे कप खिडकींत. एक दोन पलंगाच्या खालीं. चोरवस्तींतील तरुण भीत भीत खोलीशीं गेले.

आजपर्यंत ते अनेक वेळा भ्याले होते. शिक्षेचेंच काय तें भय. पण त्या भयाचे पोटीं अंतःकरणांत चीड–तिटकारा असे. आजचें भय निराळें होतें. आज भल्या मोठ्या माणसाच्या पायरीला पाय लावतों ही भीति होती ती; तींत आदर होता. भक्ति होती. स्वतःबद्दलच्या हीनपणाची टोंचणी होती. ते किती वेळ बाहेर उभे होते. एकमेकांना ' चल चल ' म्हणत होते. शेवटीं चौघे आंत आले. बारणे त्यांची वाटच पहात होते.

ते हंसत म्हणाले, " काय, संप मोडला तुम्हीं मंडळींनीं आमचा. "

त्यांच्या बोलण्यांत राग नव्हता. मुलांनीं माना खालीं घातल्या. पुनः कातरपणें वर पाहून आबा म्हणाला,

" आम्हांला शरम वाटते संप मोडल्याबद्दल. पण आमचे आम्ही धनी नाहीं साहेब. "

" मला माहीत आहे."

त्यांच्या सहानुभूतीच्या आवाजानें इतरांनाही धीर आला.

" साहेब, बळजबरीनें गाडींत कोंबून, दंडुक्यांनीं मारून, हाणून, लोकांना आणलं आमच्या." काशिनाथ म्हणाला.

" वाः ! तुमच्यासाठीं खास कलेक्टरांकडून मदत मागवली होती ना तुमच्या साहेबांनीं ! "

चौघेही एकमेकांकडे पाहूं लागले.

" हें असं व्हायचंच. गिरणीचे मालक सरकारच्या मदतीनेंच जगतात. आणि रिपन्साहेबांचीही त्यांना मदत होते. रिपन्साहेबांना कलेक्टरसाहेबांची मदत आणि रिपन्साहेबांची कलेक्टरला मदत. दोघांच्या मदतीनें हवे तितके पोलिस दंडुके चालवायला अन् हवे तितके कामगार सक्तीनें काम करायला मिळूं शकतात गिरणी-मालकांना."

" साहेब, आमच्या लोकांचं कांही चालतच नाहीं. "

" हं." बारणे हंसून म्हणाले, " अरे तुम्ही उभे का पण ? बसा ना ! " त्यांनीं खाटेकडे हात दाखवीत म्हटलें. चौघांच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं. एवढा मोठा माणूस आपल्याला पलंगावर बसा म्हणतो ! आमची चूक झाली तरीहि हंसत समजुतीने बोलतो. त्यांना आनंद झाला. कसेंसेंच वाटलें. बसायला मन घेईना. बारणे पुनः म्हणाले,

" बसा ना ! तिथें जागा नसली, तर इथें या एकजण."

चौघे विस्मित झाले. " नाहीं, बसतों इथें." म्हणून चौघेही बसले. त्यांना इतकी सन्मानाची वागणूक कधींच लाभली नव्हती.

बारणे—बरं, तें संपाचं जाऊं द्या. तुमच्या हातांत नाहीं तें. पण तुम्हीं सर्वांनीं मनांत आणलं तर असा जुलूम तुमच्यावर कोणतीही सत्ता करूं शकणार नाहीं !

काशिनाथ—नाहीं साहेब. कुणी बळजबरीनं घरीं बसेल तर त्याला दुसरीकडे बदलून टाकतील. त्याचीं बायकापोरें त्याच्यापासून तोडतील. त्याला खडी फोडायला लावतील.

बारणे—काय सांगतां ? म्हणजे तो सगळा तुरुंग आहे कीं काय ?

आबा—होय साहेब. आमचा वनवास काय आहे तो आमचा आम्हांला माहीत.

बारणे मिस्किलपणें म्हणाले, " तुमची चोर-जात नाहीं का ? "

आबा—जी. पण चोरी करायची नाहीं म्हणून कुणीं आणभाक घेतली तरी चोरी केल्याखेरीज चालणारच नाहीं त्याचं.

बारणे—म्हणजे ?

आबा—साहेब, मी इंग्रजी ६ यत्ता शिकलों. हा मॅट्रिक झालाय्. हे इंग्रजी ४ यत्ता शिकले आहेत. आम्हांला पुढें शिकायला पैसा नाहीं. कुणी मदत करीत नाहीं. रयत आम्हांला चोर समजते. अधिकारी आम्हांला काम-धंदा देत नाहींत. उनाड म्हणतात. जायचं तर खडी फोडा नाहीं तर रस्ते झाडा म्हणतात. गिरणींत मॅनेजरला चिठी द्या म्हटलं, तरी देत नाहींत.

बारणे—कां ?

काशिनाथ—आम्ही तारेंत नाहीं म्हणून ते म्हणतात तुमचं तुम्ही पहा.

बारणे—तारेंत म्हणजे ?

काशिनाथ—साहेब, आमच्यापैकीं वहिमी लोक कांटेरी तारेच्या कुंपणांत आहेत.

बारणे—काय सांगतां ?

बारण्यांचें आश्चर्य पाहून मुलांना हुरूप आला.

काशिनाथ—साहेब, रयतेला माहीत पण नाहीं. पण आम्हांला राह्यला नीट घरं नाहींत. एवढीशी जागा देतात. त्याचं भुईभाडं घेतात. झोपडी बांधायला सांगतात. त्याचं कर्ज डोक्यावर बसतं. १० अन् १५ रुपयांत कुणाला पोटभर खायला नाहीं का कपडा नाहीं. जेलासारखंच आहे. अधिकाऱ्याला कामधंदा मागितला तर आमच्या लोकांना घेत न्हाईत. वाटला तर त्याला काम मिळतंय.

वन्या पण धीरानें बोलला, " समदे किरिस्तांवच तर हाएत. अन् लहान लहान पोरांना आईबापांपासून तोडून बोर्डिंगांत टाकत्यात अन् बाटून टाकत्यात. "

बारणे अक्षरहि न बोलतां ऐकत होते.

" आतां परवां नाऱ्या भामटा अन् तो पारधी अन् त्यो आणखी कोन र ? "

" शाम्या."

" शाम्या–शाम्या. त्याला बायकापोरापासून तोडूनशानी दिलं दुसऱ्या गांवाला धाडून. आतां बायका अन् पोरांनीं खावं तरी काय ? "

" कां ? त्यांना कां पाठवलं ? "

" लालबावट्याच्या सभेला जातात म्हून. आतां समद्येच संपावर जानार व्हत्ये; तर त्यांत समद्येच सभेला ग्येले. पन याचाच कांटा निघला. चोरी क्येली तर गुन्हा. पन ह्यो बी गुन्हा कसा होतोय ? आन् परवां गांधी टोप्या घेतल्या आमच्या हिसकून अन् कॉंग्रेस–गांधी म्हून रागवत आमच्या पाठीवर वेत ओढले."

बारणे—अस्सं ! म्हणजे नुसत्या चोरीसाठीं शिक्षा होत नाहीं तुम्हांला !

हणम्या—नाहीं महाराज. ते म्हनतील त्ये ऐकाया लागतं. कुनाचं काय करत्याल, कांईं सांगतां येत न्हाई. एकाद्याला तार नसली तरी तार लावत्यात. हाजरी लावत्यात.

बारणे—ही तार अन् हजेरीची भानगड कळली नाहीं मला !

काशिनाथ—ज्याच्यावर चोरीचा आरोप नाहीं तर वहीम असतो त्याला दिवसांतून एकदां नाहीं तर दोनदां हपिसांत हजेरी द्यावी लागते. एकाद्या वेळीं मध्येंच रात्रीची पण हजेरी घेतात.

बारणे—तिथें शाळा आहे नाहीं ?

आबा—शाळा आहे. पण पांच इयत्तांवर कुणाला शिकवीत नाहींत. वाटला कुणी, तर त्याला शिकायला मदत करतात. अशानं महाराज आमची फार निराशा होते. काम नाहीं तर आईबाप तरी किती दिवस भाकरी देतील ? साहेब, अन्नाच्यान् परवां कंटाळून भुकेच्या पोटीं मी पण शेतांत जाऊन चोरी केली.

आबानें मान खालीं घातली. आबाचे मित्र त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले. " यानं चोरी केल्याचं कबूल केलं ! " वन्याला भीति वाटली. " हा माझं नांव तर नाहीं सांगणार ? " त्याला स्वतःची लाजही वाटली आणि आबाचें कौतुकही वाटलें. पुनः वर पहात आबा म्हणाला,

" होय महाराज. मीं चोरी केली आणि मला काम मिळालं नाहीं तर मी पुनः चोरी करीन अशी भीति वाटते मला. तुम्ही मायबाप मला तारा नाहीं-तर तुरुंगांत पाठवा साहेब. पण मी तुरुंगांत गेलों तरी मला बरं वाटेल. मीं चोरी कां केली हें कुणाला तरी सांगितलं म्हणून बरं वाटेल."

बारणे उठले. त्यांनीं आबाच्या पाठीवर समाधानाकरितां नुसतें थोपटलें· आबाच्या डोळ्यांना पाणी आलें.

काशिनाथ—महाराज, कसंही करून हा गोरा साहेब गेला पाहिजे इथून.

हणम्या—अन् तार अन् हाजरी पण गेली पाहिजे.

आबा—नाहीं. तार अन् हजेरी ठेवा पण शिकणाराला शिकायची संधि द्या. काम करणाराला पोटभर खायला मिळेल असं काम द्या. असं केलं तर कोण चोरी करणार आहे ? सगळे सुधारले कीं तार अन् हजेरी काढा.

बारणे—चोरी करणं वाईट असं तुमच्या लोकांना वाटतच नाहीं. तो धर्म समजतात ना तुमचे लोक ?

आबा त्वेषानें म्हणाला, " पण साहेब, कांहीं मिळालं नाहीं पोटाला राज-रोस मार्गानें कीं चोरी हा धर्म ठरतो. चोरी वाईट हें मनावर ठसवायला बाकी गोष्टींची अनुकूलता नको का ? महाराज, माझ्यासारख्या १२ वर्षे चोर-वस्तींतून दूर राहिलेल्या आणि चांगल्या माणसांच्या सहवासांत असलेल्याला नाहीं वाटलं तें चोरी करावी असं ? मला कुणी कमी मानलं नाहीं. सारखा सारखा माझा अपमान केला नाहीं अन् मला पोटाला कमी पडलं नाहीं, तेव्हां चोरीचा विचार माझ्या मनांतून गेला. पण इथें आलों अन् त्या खता-ड्यांत पडलों तेव्हां पुनः चोरीखेरीज मार्ग नाहीं दिसत, महाराज, माझ्या-सारख्यालासुद्धां."

बारणे चकित होऊन आबाकडे पहात होते. परिस्थितीच्या भट्टींतून जीवनाचे बोल तावून सुलाखून बाहेर पडत होते. पुस्तकांतून जें वाचलेलें, तें ज्ञान हे चोर-वस्तींतील तरुण स्वानुभवानें सहजासहजीं सांगत होते.

बारणे—हें पहा, मला आतां थोडीशी कल्पना आली आहे. आपण जरूर कांहीं तरी करूं. पण यासाठीं एक दोन गोष्टी करायला हव्या.

सगळे उत्सुकतेनें बघूं लागले.

" मला निरनिराळ्या लोकांच्या तक्रारी–खऱ्या हं–कोणत्या आहेत तें पाहिलं पाहिजे. तुमच्याखेरीज आणखी कुणी लोक भेटूं शकतील का मला ? "

चौघे एकदम म्हणाले, " महाराज, हजार लोकांचीं हजार गाऱ्हाणीं आहेत. सगळे आपल्याला सांगतील."

बारणे—मग असं करा. सवडी-सवडीनं दहा पांच माणसं येऊं द्या. मग पाहूं काय करायचं तें.

बारणे उठले. चौघेही उठले.

बारणे—आणि तुम्ही रोज भेटूं शकाल का मला चार सहा दिवस ?

चौघे—हो महाराज. आम्हांला तारेंत घातलं तरी चालेल. आम्ही येऊं.

बारणे हंसले—" बरंय भेटलांत म्हणजे बरं. आतां जा तुम्ही."

चौघे निघाले. चौघाच्या अंतःकरणांत कधीं न अनुभवलेल्या माणुसकीनें बागा फुलवल्या होत्या. कसल्या तरी नव्या आशेचे अंकुर फुटले होते. चांगल्या वासना–भावनाच जणुं उचंबळून आल्या होत्या. बारण्यांच्या सहानुभूतीनें स्वतःच्या मोठेपणाचीं स्वप्नेंही ते पहात होते.



## ३४

आबा आणि काशिनाथ तडक नाऱ्या भामट्याच्या बायकोकडे गेले.

" ए मुगसव्वा ! तुला नाऱ्या भामट्याला भेटायचं आहे काय ? "

मुगसव्वा कांहीं बोलण्याआधीं मोठ्यानें रडूं लागली. त्या तरुण पोरांच्या उतावीळ स्वभावाला तिचें रडणें अवेळीसें वाटूं लागलें.

" अग रडतीस काय, तुला नाऱ्या हिथं यायला पाहिजे असला तर तसं सांगायला चल. "

" कुठं ? "

" बोंबलूं नको मोठ्यानें. आम्ही घेऊन चलतों तिथं चल. "

" अर पन कुठं ? " सारी उत्सुकता डोळ्यांत आणून हळूच तिनें विचारलें.

"लालबावट्याकडं."

मुगसव्वा क्षणभर थक्क झाली. लालबावटा ! तिला हें कसं सुचलं नाहीं ?

"कुठं ऱ्हातो त्यो बाबा ?"

"कोन ?"

"लालबावटेवाला बाबा."

"आम्ही दाखवतों चल."

मुगसव्वा निश्चयानें निघाली. आतां असहायतेचें रडणें कुठल्याकुठें पळालें. ती म्हणाली, "त्या शाम्याच्या अन् चंद्याच्या बायकूला घेऊनशानी ग्येलों तर ?"

आबा—काशिनाथला हा विचार फारच पसंत पडला, आणि त्या तीन बायकांना पुढें चलायला सांगून ते निघाले. बारण्यांना पाहतांच तिन्ही बायांना एकदम उमाळा आला. त्या तिघी मोठ्यानें रडूं लागल्या. कचकच बोलूं लागल्या. आबा—काशाला ओशाळल्यासारखें झालें.

बारण्यांनाही तें दृश्य नवें होतें. रयत-मजूर आणि चोर-वस्तींतील मजूर यांतील फरक त्यांना नवा होता. चोर-वस्तीमधील माणसांची त्यांना ओळखच नव्हती. त्यामुळें त्या बायकांची कचकच, रडणें, हात चोळणें त्यांना खऱ्या असीम दुःखाचें वाटलें. त्या तिघींच्या हकीगती त्यांनीं लिहून घेतल्या. आणि त्यांची समजूत घालून त्यांना जावयास सांगितलें. पण जाईजाईपर्यंत त्या बायका कलकलत, रडत, विनवीत होत्या.

त्या गेल्याबरोबर बारण्यांची मोठी विचित्र अवस्था झाली. इतका दुःखी समाज आणि तिकडे कुणाचेंही कधीं लक्ष गेलें नाहीं ! आतां बारण्यांचें तें चोवीस तासांचें कामच होऊन गेलें. ज्यांच्या ज्यांच्या कांहींही तक्रारी असतील त्या माणसांना भेटायची त्यांनीं इच्छा दर्शविली.

आतां आबा आणि त्याचे मित्र यांना क्षणाची फुरसत नव्हती. याला भेट, त्याला भेट. कुणाची काय तक्रार आहे ती शोधून काढ. त्या माणसाला बारण्यांकडे घेऊन जा, यांत त्यांचा वेळ केव्हांच जाई. ती बेकारी, दर क्षणीं होणारा अपमान, सक्तीच्या आळसानें आलेली चिळस, किळसवाण्या आळसानें सुचणारी किळसवाणी करमणूक--सगळें कुठल्या कुठें गेलें. धाडस, साहस, अविश्रांत श्रम. सगळे मित्र जणुं नव्यानें जगत होते. बारण्यांनीं त्यांना

नवी चेतना दिली. कामाच्या नादांत जेवायला फुरसत झाली नाहीं. तेव्हां बारण्यांचा डबा आलेला होता.

त्यांनीं विचारलें, " तुमचीं जेवणं झालीं का नाहीं ? "

" नाहीं साहेब. आम्ही संध्याकाळीं जेवूं."

" वा: ! जा जेवून या. नाहीं तर असं करा. आज इथेंच आपण जेवण करूं." त्यांनीं डबा उघडला. थोडी पोळी-भात-भाजी दोघां तिघांना वांटून दिली. तेही काम करतां करतां हातावर पोळी-भाजी घेऊन खात होते. मुलांचीं अंतःकरणें गद्गदून गेलीं.

त्या समानतेच्या सहज वागणुकीनें तरुणांचीं मनें जिंकलीं गेलीं. कोणतेंही वैभव तेथे नव्हतें पण अंतरंगाची कळकळ, श्रमाची हौस आणि ज्ञान हीं तिन्हीं तेथें होतीं. त्यांचा प्रत्यक्ष वैभवापेक्षांही त्या मुलांच्या मनावर अधिक पगडा बसला. आदर-भक्ति प्रेम-तिन्ही भावनांनीं ते तरुणही वाटेल तीं कामें वाटेल तेव्हां करायला तयार होते.

रयतेतील माणसाचा सहानुभूतीचा तो स्पर्श चोर-वस्तींतील हरएक दुःखितांच्या मनावर खोल ठसा उमटवीत होता. आणि पाण्याच्या आवाजानें तहानेलेली जीवसृष्टि लगबगीनें धांवावी त्याप्रमाणें चोर-वस्ती बारण्यांकडे धांवूं लागली. कुणी न सांगतां न संवरतां. इकडे तिकडे भिरभिर पहात. चोर पावलांनीं. कितीकांचीं कितीक दुःखें. राईएवढें दुःखही पर्वताएवढें होऊन जात होतें.

चोवीस तास बारणे यांनाच वाहिले होते. आबा-काशिनाथ-वन्या-हणम्या तक्रारी लिहिण्याचे काम करीत होते. त्याच त्या तक्रारी सगळ्यांच्या. त्या सांगायला येतांना वेळ वखत कोणी पहात नव्हतें. वटवट, बडबड, कचकच, रडणें, ओरडणें, तेंच तेंच पुनः सांगणें आणि मग बारण्यांनाही शंका येऊं लागली. पण प्रत्येकाच्या बोलण्यांतील वटघट पहात बसायला वेळ नव्हता. कोडगेपणाला तोंड देणें भाग होतें. तें कोडगेपण असहायतेच्या पोटीं जन्माला आलेलें होतें आणि बारणे ऐकत रहात.

एक म्हणे, " महाराज, आमाला शेटलमेंटाला आनूनशान टाकलं. हिथं

न्हाई ताडी प्याया मिळत. न्हाई रेडा कापाया मिळत. द्येव तर शेंटलमेंटांत न्हाइलाच न्हाई."

दुसरा म्हणे, "द्येवाला निवेद म्हून बी ताडी मिळत न्हाई."

"साहेब, जाखाई न्हाई, जोखाई न्हाई, मरीआई न्हाई. आमचा धरमच बुडून ग्येला." बारण्यांना हंसूंही येई. कींवही येई.

"दवाखान्यामंदी बायकूला बाळांतपनाला न्येली. तथं बाळंतीचं पानी रस्त्यावर ग्येलं तर माझ्या बायकूला भूत लागून न्हायलंय्. तिला प्वारच व्हत न्हाई."

या तक्रारीवर तोड नव्हती. पण तितक्याच सहानुभूतीनें ऐकून घेणें भाग होतें.

"सायब, माझ्या प्वाराची शाळा तेवढी काढा. त्यो भुईमुगाच्या शेंगा खादाया ग्येला तर चार आनं मिळत्यात. गुरं राखाया ग्येला तर चार दोन आनं मिळत्यात. शाळमंदी जाऊनशानी काय मिळनार? कराच सायब तेवढं गरिबासाठीं."

"माझ्या प्वारांना भाकर घालाया कोनी न्हाई. हामी द्वाघं जातुया गिरनीला. माझ्या पोरीची शाळा काढाया सांगा साहेबाला. लई उपकार व्हतील म्हाराज. प्वारं संभाळाया बी प्वारगी कामा येती."

"माझ्या बायकूला दुसऱ्या शेंटलमेंटांत धाडली म्हाराज. पोरं हिथं अन् बाईल तिथं. कसं करावं म्यां?"

सगळीं दुःखें उलून बाहेर येत होतीं. खरीं आणि खोटीं. खरीं आणि आपस्वार्थी. अडाणीपणाचीं आणि अधिक बुद्धिमत्तेचीं. बारण्यांच्या मनाची चाळण लागत होती. आबाला लिहितां लिहितां लाज वाटे आपल्या लोकांची आणि तो मध्येंच म्हणे,

"आमच्या लोकांना कळत नाहीं महाराज."

बारणे म्हणत, "असूं दे. सांगूं दे त्यांना काय हवं तें."

एक म्हणे, "सारा कारभार किरिस्तावांच्या हातीं झालाय्. मोठ्या इपिसरापासून तों पट्टेवाल्यापर्यंत. आमच्या हिंदु लोकांना कॉंग्रेस सरकारनं नेमाया होव."

आणखी एक म्हणे, " आमच्या पोरांना दवा घ्येत्यात अन् किरिस्ती करत्यात. बाप्तिस्मा झाला तर म्होरं शिकाया घ्येत्यात. न्हाई तर चार यत्ता झाल्या कीं लक्ष बी घ्येत न्हाईत."

" शिकूनशानी किरिस्ताव झाला तर नोकरी मिळती. न्हाईतर किती बी गुनाचा मानूस असला तरी त्यो खड्डयांतच. त्या परीस आमची तार-हजरी ग्येली तर हामी भीक मागून प्वाट भरूं. आमाला रयतवस्तींत काम न्हाई अन् आमच्या वस्तींत बी काम न्हाई. मग ऊठ, बडव कीं न्ये खडी फोडाया. अन् चार चार मैल चालावं, खडी फोडावी अन् मिळायच दोन आनं; त्येवढ्यांत काय व्हनार? महाराज, ही तार अन् हजरी त्येवढी काढून घ्या. मग हामचं प्वाट हामी कुटं बी भरूं."

" येक झोपडी उठवावी डोक्शावर तर पच्चीस रुपये कर्ज घ्येत्यात. अन् धा रुपय पगारांतून कापूनशानी घ्येत्यात. मग हामी खायचं काय अन् या पोरांच्या प्वाटाला घालायचं काय?"

एकदां कुणी सहानुभूतीनें ऐकून घेतें हें कळल्यावर उमाळ्यावर उमाळे येऊन बारीक दुःखेंही राक्षसाचीं रूपें घेऊन पुढें आलीं. बारण्यांना कल्पना येईना. माणसें माणसांना अशीं कशीं वागवतात! साऱ्या दुःखांना वाचा फोडणें भाग होतें. आणि उदासीनतेंत कित्येक वर्षें गाडलेलीं तीं माणसें साऱ्या रयतेचें लक्ष्य होऊन बसणें जरूरीचें होतें.

चोर-वस्तींतील लोकांना कितीक वर्षांनीं मोठें धाडस साहस केल्याचा आनंद झाला. चोरी करून ती पचवण्याच्या प्रयत्नांत असीम धाडस आणि असीम आनंद. सायबाविरुद्ध बारण्यांकडे चोर पावलांनीं तक्रारी करून आपलें नांव बाहेर न फोडण्याविषयीं पुनः पुनः विनवून ते येत तेव्हां असाच कांहींसा आनंद त्यांना होई.

पण चोर-वस्तींत जेर होऊन गेलेल्या कित्येक माणसांना हेंही नकोसें वाटे. सांपडलों तर पुढें काय? हा प्रश्न त्यांना भयंकर वाटे. कुणी परस्पर गाऱ्हाणें नेल्याचा त्यांना आनंद होता. पण आपण त्यांत नसावें असेंही त्यांना वाटे.

चोर ही जात असूं शकते यावर बारण्यांचा विश्वास नव्हता. कारण पोटाला चिमटे घेणारे कुणी तरी असल्याशिवाय माणसाला चोरी करावी

लागणार नाहीं ही त्यांची खात्री होती. त्यामुळें कित्येक गोष्टी अतिरंजित असल्या, तरी त्यांना थोडें तरी अन्यायाचें मूळ असणारच ही त्यांची खात्री झाली.

स्वतंत्र असतांही हे लोक चोऱ्या कां करीत, याबद्दलहि सुसंगत विचार बारण्यांच्या राजकारणांत होता.

बारण्यांनीं चोर-वस्तींतील माणसांच्या कैफियती घेतल्या. त्यांतून मुख्य मागण्यांचें एक टांचण तयार केलें आणि त्यांनीं रिपन्साहेबांना भेटण्याचें ठरवलें.

• • •

## ३६

रिपन्साहेबांना बारण्यांचें नांव माहीत झालें होतें. त्यांचा बारण्यांवर अतिशय रोष झाला होता. चोर-वस्तींत आज इतकीं वर्षें काम केलें. चोरांच्या आत्म्यांची उन्नति करण्यासाठीं त्यांनीं दोन तपें खर्च केलीं होतीं. ती चोर-वस्ती एकेकाळीं बेबंद होती. ती आतां सर्वस्वीं अंकित होऊन वागत होती. रिपन्साहेबांचा हुकूम अवमानण्याचें कुणीहि धाडस केलें नसतें. त्यांनीं चोर-जातीला शिस्त लावली होती. त्या शिस्तीचा बोजवारा उडवण्याचा प्रयत्न बारणे आणि त्यांचे भाईबंद करीत होते. ही गोष्ट रिपन्-साहेबांना असह्य झाली. तो लालबावटा, तो तिरंगी झेंडा, कॉंग्रेस, यांचें नांवही चोरवस्तींत त्यांनीं उच्चारलें नव्हतें. उच्चारलेलें पाहिलें नव्हतें.

रिपन्साहेबांना गोऱ्या सत्तेकडे वर मान करून बघणारा अप्रतिष्ठित वाटत होता. गोऱ्या सत्तेशीं झुंजणारा हा त्यांचाही शत्रूच त्यांना वाटे. आणि अशा झुंजणारांचें बळ कितीही असलें तरी गोरी सत्ता त्यांना सहज भरडून, चिरडून टाकील ही त्यांची खात्री होती. पण परवांच्या संपाच्या वेळीं चोर-वस्तींतील कांहीं लोक या कॉंग्रेसवाल्यांनीं फितवले. आपल्या सत्तेला भगदाडें पाडलीं याचा रिपन्साहेबांना अतिशय राग आला होता.

बारणे रिपन्‌साहेबांच्या बंगल्यावर गेले. त्यांनीं आंत भेट-चिठी पाठवली. ती चिठी पाहून रिपन्‌साहेब खवळून बाहेर आले. त्यांनीं इंग्रजींत बारण्यांना धमकावून विचारलें,

" तुम्ही चोर-वस्तींत कुणाच्या परवानगीनें आलां ? तुम्ही चालते व्हा."

" मीं तुम्हांला पत्र पाठवलें होतें. त्याचें तुम्हीं उत्तर पाठवलें नाहीं. म्हणून मी स्वतः आलों."

पण बारण्यांच्या या वाक्यांत दहा वेळां रिपन्‌साहेबांनीं रागाच्या उद्‌गारांनीं व्यत्यय आणला.

" तुम्हाला चोर-वस्ती पहायला परवानगी मिळणार नाहीं. हे चोर लोक आहेत. त्यांच्यावर कायद्याचा अंमल आहे. ही सार्वजनिक भेटीची जागा नाहीं. तुम्ही यापुढें एक शब्द बोलत रहाल तर तुम्हांला घालवून द्यावें लागेल.

" आपलें हें वर्तन सभ्य गृहस्थासारखें नाहीं."

" मी सभ्य माणसाबरोबरच सभ्यपणानें वागतों."

बारण्यांनाही हा भयंकर अपमान वाटला. ते रिपन्‌साहेबांचा धिक्कार करूं लागतांच रिपन्‌साहेबांनीं बारण्यांच्या अंगावर हात टाकला आणि सारी सत्ताच पणाला लावून रिपन्‌साहेबांनीं बारण्यांच्या देखत कलेक्टरसाहेबांना फोन केला—

" कॉंग्रेसवाले चोर-वस्तींत दंगल माजवीत आहेत. मदत पाठवा."

आतां तेथें राहण्यांत कांहींच अर्थ नव्हता. बारणे अपमानानें जळत तेथून बाहेर पडले. पण एकंदर परिस्थिति पाहून या चोर-वस्तींत भयंकर अन्यायाचें राज्य असल्याखेरीज साहेब चिडले नाहींत, ही त्यांची खात्री झाली. बारणे चालूं लागले. पण रिपन्‌साहेबांना अजून ते सरळ वस्तीच्या बाहेर पडतील, ही खात्री नव्हती. त्यांनीं पोलिस-सबइन्स्पेक्टरला बारण्यांना बाहेर घालवण्याबद्दल हुकूम दिला.

● ● ●

# ३७

संध्याकाळीं आबा चोर-वस्तीच्या रस्त्याला लागला. आज वन्या त्याची वाटत पहात बसला होता.

" अर एक काम हाय गड्या ! लई जोखमीचं ! "

आबाला कांहीं तरी करायला मिळणार याचा आनंद केवढा झाला ! तो झरझर वन्याच्या अगदीं जवळून चालूं लागला.

" ह्ये बघ आबा. तूं आमच्यांतला म्हून सांगतोय; गळा कापूं नग."

" अरे सांग तर पण."

" ह्ये बघ. आमचीं घरं हाएत भाईरल्या आवारांत. तुझ्या बाचं झ्वापडं हाए तारंत. म्हून तुलाच ह्ये काम कराया होवं."

" अरे बोलशील का नाहीं ! का उगाच ह्येन त्येन बोलून वेळ गमावतोस ? "

" गळ्याची आन घे."

" गळ्याची आण."

" मरीआईची आन."

" मरीआईची आण."

" लेका, पटकी व्हईल मरीआईची आन खोटी करशील तर."

" जा साल्या, तुला जर सांगायचं नाहीं तर नको सांगूं."

" बरं ह्ये बघ. जोखमीचं काम हाए."

इतका वेळ हळू बोलणाऱ्या वन्याचा आवाज आणखी हळू झाला. " तुझ्या झ्वापडीमंदी आज येक पावनं येत्याल."

" पावणं ? अन् कोण ? "

" त्ये लालबावट्याच बारणेसाहेब हैती त्ये ! रातभर ऱ्हातील."

आबाला बोलतां येईना. तो आ वासून उभा राहिला. भीति, उत्सुकता, आनंद. बारणे ? एवढा मोठा माणूस ! आपल्या घरांत रहाणार ? आपल्या भिकार घरांत ? त्याला खरेंसुद्धां वाटेना.

" ए जा. मस्करी करतोय माझी ? "

" गळ्याच्यान् मस्करी न्हाई. तुझ्या बाला सांग."

आबाला बारणे येणार याचा कोण आनंद ! साहसाच्या कल्पनेनें त्याच्या अंगावर रोमांच उठले. पण आपलीं भावंडे आणि तीं तरी किती ! पाहुण्याला जागा कुठें नि कशी द्यायची. त्यांना झोंपायला काय द्यायचें. त्याला कळेना. त्यानें विचारलें. वन्याचीही मति गुंगच झाली होती. पण बारण्यांनींच त्याला सांगितलें होतें. आणि एवढ्या मोठ्या माणसाचा शब्द त्याला उत्सुकतेने झेलायची हौस होती. आबाला चोर वस्तींत येण्याची बंदी झालेली होती. पण तो डगमगला नाही. आबानें आणि वन्यानें ठरवलें. गिरणीच्या कामगारांच्या लोंढ्याबरोबरच बारण्यांनी आंत शिरायचें. गिरणी सहाला सुटे. दिवस लहान. अंधार लवकर पडे. तारेच्या कुंपणांत जाणारावर लक्ष ठेवण्यापेक्षां, बाहेर जाणारावर लक्ष ठेवायला हवें होतें. आणि पहारेकरी तेंच काम काळजीपूर्वक करतों, हें त्यांना माहीत होतें. पुनः आणाभाका. दोघे चूपचाप निघून गेले.

आबा मावळणीच्या घरीं आला. तो अत्यंत अस्वस्थ झाला होता. आई-बापाला केव्हा सांगेनसें त्याला झाले होतें. रात्र झाली. पालाच्या बाहेर पोरें झोंपलीं. अलीकडे आबा नेहमींच बाहेर मावळणीच्या दारासमोर झोंपत असे. गेन्या हजेरी देऊन आला. बाहेर आबा त्याच्या कानाशीं लागला. गेन्याला कापरें भरलें. " आतां ह्ये करुनशानी हामाला तुरुंगांत टाक." पण आबा खचला नाहीं. त्यानें बारण्यांबद्दल माहिती सांगितली. तार, हजेरी घालवणार आहेत, हें कळतांच गेन्याला आनंद झाला. ती तार आणि हजेरी जाण्यासाठीं त्यानें वाटेल तें साहस पत्करलें असतें. पण त्याला कळेना, हा माणूस आपल्या घरीं रात्रभर राहणार कसा ! आपल्याला शिवेल कसा ? पण तें सगळ्यांनाच कोडें होतें. गेन्यानें चांगुणेला सांगितलें. बजावलें. आबा, गेन्या, चांगुणा केवढें गुपित, केवढी भीति, केवढें साहस पोटांत बाळगून सारा दिवस हिंडत होतीं ! आबाला आपल्या आईबापांबद्दल धन्यता वाटली.

● ● ●

# ३८

अंधेरी रात्र. नेहमींप्रमाणें सारी चोर-वस्ती सूर्य बुडतांच अंधेरानें गिळा-यला सुरुवात केली. त्या अंधेराला प्रतिकार जळत्या विड्या--चिलमींचाच. चुलीही थंड पडल्या होत्या. फाटकावरचा पहारेकरी गेटाला कुलूप घालून स्वस्थ बसला होता. रात्रीचे अकरा वाजले. आतां तारेंतील पालांमध्यें कांहीं ऐकूं येत नव्हतें. बडबडणीं, रडणीं थांबलीं होतीं. सर्वत्र सामसूम. पण आजची सामसूम नेहमींपेक्षां निराळी होती. द्रौपदी झोपली तरी श्रीकृष्णाची युद्धनीति पोटांतील गर्भ ऐकत राहिला. हुंकार देऊं लागला. गेन्याची झोपडी झोंपल्या-सारखी दिसली. पण एकेक जणांच्या कर्मकथा बारणे सावधान ऐकत होते. अत्यंत दबत्या पायांच्या हालचाली. दबते आवाज. रात्रीच्या त्या अंधारांत गेन्याच्या झोपडींत बारणे अंगाची घडी करून बसले होते. गेन्याला-आबाला-चांगुणेला धन्यता वाटत होती. शरम वाटत होती. भीति वाटत होती. मधूनच टॉर्चच्या उजेडांत बारणे झोपडीची अवस्था पहात होते. आता ते गेन्याच्या झोंपडींतून बाहेर पडले. त्यांनी केकाड्याच्या झोंपड्या पाहिल्या. भाटाची—भामट्याची—पारध्याची. सगळीकडे तेच ते. ना धड छप्पर ना भिंती. कावळ्यांनीं काटक्या-कुटक्यांची घरटी बांधली, तर तेथेंही घाण कमी असेल. सारवलेली भुई. एका माणसालाही झोंपता येणार नाहीं इतकी जागा. वळचणींतून वारें घोंघावत होतें. चार दोन गाडग्ीं मडकीं. तिन्ही ऋतु-राजांनीं झोडपलेली ती प्रजा म्हणजे माणूस जातीवरचा काळाकुट्ट डाग. प्रामाणिकतेनें पोटें भरण्याची शिस्त वीस वर्षे लावून जणुं प्रामाणिकतेची ढोंग-बाजी विचकटपणें त्या झोपड्या सिद्ध करीत होत्या. झोंपडींत रहाणारा तोच प्रामाणिक. हवेलींत राहणारा माणूस प्रामाणिक कष्टांनीं हवेल्या बांधूंच शकणार नाहीं, या प्रमेयाची सत्यता जणुं त्या पटवीत होत्या. बारण्यांना चोर-वस्तीच्या आवारांत येण्याची परवानगी कां नव्हती हें त्यांना आतां चांगलेंच कळलें. चोर-वस्तीसाठीं केलेले लिखित कायदे कमी निष्ठुर असले पाहिजेत आणि न लिहिलेले कायदे मात्र कठोर. त्यांना मर्यादा नव्हती. रिपन्साहेब घालतील ते कायदे. ते

न मानणारांच्या कुटुंबांचे तीन तेरा नऊ बारा होत. आणि माणसांच्या जन्माला येऊन माणसाच्या हृदयाचे तुकडे तुकडे करणाऱ्या त्या नियमांनीं आणि लहरी कायद्यांनींच चोर-वस्ती जेर झाली होती. बारणे रात्रभर तेथें राहिले तर सकाळीं शिपायांच्या नजरेला पडतील ही गेन्याला भीति. बारण्यांनाही भीति. रातोरात भुईसरपटे जाऊं शकतील एवढा खड्डा तारेच्या कुंपणाखालीं पांचसहा जणांनी मिळून केला. आणि पहांटे पहांटेला बारणे आणि त्यांच्या पाठोपाठ आबा तारेच्या कुंपणाखालून बाहेर पडले. शिपायांच्या पुऱ्या बंदोबस्तांत कांटेरी तारांच्या कुंपणांत दडपलेल्या त्या वस्तीचें हृदय जिंकून बारणे बाहेर पडले. रात्रीच्या अंधारांत हिमालयांतील औषधि चमकाव्या, तशा नव्या चेतना चोर-वस्तींतील घनदाट अंधारांत चमकून राहिल्या. आंतील चेतलेले पारधी, भाट, भामटे, कैकाडी, कोणी कोणीही त्या अंधारांतील गुपितें ओठापर्यंतही येऊं दिलीं नाहींत. ते नुसते पहात राहिले. ऐकत राहिले. वाट पहात राहिले.

● ● ●

# ३९

इकडे बेकार तरुणांना क्षणाची फुरसत नव्हती. आबा, काश्या, हणम्या, शिरप्या. सारा दिवस ते गांवांत असत. बारण्यांचीं निरोपांचीं कामें करीत. बेत रचीत. आशांचे फुलोरे बांधीत. झोपडी-झोपडींतून त्यांनीं चेतना दिली. पण किती सावधपणें ! तो रंग्या भामटा बाटला होता. त्याची झोपडी त्यांनीं नेमकी वगळली. त्यालाही कांही तरी चाललें आहे काय ? आपल्याला एका बाजूला काढला आहे काय ? असा संशय येऊं लागला. तो कानोसा घेई. पण धनाच्या चोऱ्या करून सावांचे चेहेरेमोहोरे हिंडवीत फिरण्यांत जन्मजात तरबेज असलेल्या तेथल्या कोणाही माणसानें रंग्याला पत्ता लागूं दिला नाहीं. मुंग्यांच्या रांगेत मुंग्या कानगुज़त जातात तसे ते लोक कानगुजत जात आणि बारण्यांच्या घरच्या शिजल्या स्वयंपाकाची दखल प्रत्येक जणाला घेतां येत होती. रंग्या भामट्याला अजूनही कांहीं निराळें निराळें वाटलें. त्यानें परक्या

कैकाड्याच्या कानाशीं गोष्टी केल्या. परश्याही तसाच बेचैन झाला होता. त्यालाही आपण बाटल्याची भीति, लाज, पश्चात्ताप वाटायला लागला. परश्या, रंग्या, नबी, सैबा आणि कितीक जण कानाला लागत. त्यांना वाटे वरच्या साहेबाला सांगावे, तर हे लोक मारतील. झोपडीत राहण्याची सोय नाहीं. बरें त्यांच्याच झोपडीशेजारीं राहून संशयाचें भूत बोकांडीं तरी किती दिवस बसूं द्यायचें ? प्रत्येक जण म्हणे, " वरल्या सायबाला बोलूं नका. मुडदे पडत्याल आपले. " आणि प्रत्येकानें दुसऱ्यापासून लपवून छपवून वरल्या साहेबाला सांगितलें. मास्तरना कळलें. हेडमास्तरांना कळलें. देखरेखीच्या बायकांना कळलें, पट्टेवाल्यांना कळलें, पोलिस इन्स्पेक्टरला कळलें, पण काय चाललें आहे हे कळलें नाही. आणि एक दिवस पहाटेलाच ' प्रजे 'चे अंक झोंपडी-झोपडींतून खसखसत होते. चोर-वस्तींतील वस्तीकरांना धन्य झालें होतें. त्यांच्या गोष्टी ' छाप्यां 'त छापल्या गेल्या होत्या. नाऱ्या भामड्याचें नाव त्यांत होतें. शाम्या, चंदू पारध्याचे नाव त्यात होतें. सायब्या भाटाचे नांव त्यांत होतें. कितीकांचीं नांवे आणि कितीक गोष्टी. पण सारें गुपचूप. आबा–काश्या–वन्या–हणम्यानीं सगळ्या वस्तीत 'प्रजे'चा छापा वांटला होता आणि कुणाला बाहेर दाखवूं नका म्हणून बजावलें होतें. चोर जातीच्या सावधगिरीनें कोणी कोणीही मुलांची आज्ञा मोडली नाहीं. त्यांची आज्ञा मोडली तर तार अन् हजेरी निघणार नाहीं असें प्रत्येकाला वाटे.

● ● ●

## ४०

सकाळ झाली. लोक कामावर गेले. ज्यांना काम नव्हतें तेही संध्याकाळची वाट पहात भटकत होते. आज जणुं साहेबाची भीति त्यांनीं हवेवर उडवली होती. संध्याकाळ झाली. सहा वाजले आणि चोर-वस्तींतील हजेरी नसलेल्या स्वतंत्र लोकांच्या आवारांत प्रचंड सभा भरली. सभा भरणार हें चोर-वस्तीं-तील साऱ्यांना माहीत होतें. पण सभा भरेपर्यंत अधिकाऱ्यांना कळले नाहीं. ती सभा पाहूनही शिपाई पुढें गेले. त्यांना वाटलें, लावण्या म्हणणार आहेत.

पण दुसरे शिपाई आले. त्यांना भाषण ऐकूं आलें. ते साहेबांकडे धांवले. धांवपळ सुरू झाली. सभाबंदी एकदम होणें शक्य नव्हतें. चोर-वस्तींतील एकही असामी सभेंत बोलला नाहीं. बोलले ते फक्त बारणे. रिपन्‌साहेबांना आणि डगन् मडमसाहेबांना कळलें. रिपन्‌साहेब अस्वस्थ झाले. कॉंग्रेस-वाल्यांवरचा त्यांचा राग अनावर झाला. कलेक्टरसाहेबांकडे ते धांवूं लागले. चोर-वस्ती कडक बंधनाखालीं कसकसूं लागली. रात्रीं—अपरात्रीं—दिवसां हजेऱ्या होऊं लागल्या. लोक हैराण झाले. रिपन्‌साहेबांनीं हजेरीला असणाऱ्या लोकांनाही बेशिस्त म्हणून वस्तींतील तुरुंगांत डांबलें. कांहींच्या संसाराचे तुकडे करून निरनिराळ्या गांवीं भिरकावले. कित्येक कुटुंबांतील मुख्य पुरुषांना लालबावटेवाले—कॉंग्रेसवाले म्हणून कुटुंबापासून तोडून दुसरीकडे पाठवून दिलें. कित्येकांचीं कामें काढून घेतलीं. रात्रीं हपिसापुढें बसलेल्या लोकांची मारहाण वाढली. चार-दिवस-आठ दिवस. मनस्तापानें अंतःकरणाच्या धगींत दुःखें पुरीं शिजलीं. आणि खूण करायचाच अवकाश. बासनामधील कोरे कपडे मिरवायला काढावे तसें इतके दिवस लपवून ठेवलेलें साहस, धाडस, हट्ट, संताप बाहेर पडून ती चोरवस्ती जणुं दण्ड थोपटून आव्हान देऊन उभी राहिली. शाळा ओस पडली. स्वच्छता, टापटीप नाहींशी झाली. देखरेख करणाऱ्या बायका त्या वस्तींतील खुनी नजरांना भिऊन दडी धरून बसल्या. अवशेचीं हत्यारें परजलीं. सगळा अधिकारी वर्ग स्तंभित झाला. भ्याला. रिपन्‌साहेबांची मोटर कलेक्टरसाहेबांच्या बंगल्याकडून येत होती. आज शेंकडों दलितांनीं ती अडवली. रिपन्‌साहेबांना बाहेर ओढले. मोटारीचा चक्काचूर केला. रिपन्‌साहेब पळून गेले. डगन्-बाईनीं बंगल्याचीं दारें लावून घेतलीं. त्या ख्रिस्ताला स्मरूं लागल्या. बंगल्या-भोंवतीं गर्दी जमली. आतां त्या लोकांनीं बंगले जाळायचे ठरवलें. सारी क्रूरता दाटून आली. चोर-वस्तीचा पोलिस बंदोबस्त अपुरा पडला. पोलिस बंदोबस्तापेक्षांहि गोऱ्या कातडीच्या धाकानेंच नमलेली ती सारी चोर-वस्ती गोऱ्या कातडीचा अवमान——धिक्कार करायला आली होती. सूड घ्यायला आली होती. पण रिपन्‌साहेब पळाले ते कलेक्टरच्या बंगल्यावर. क्षणार्धांत हत्यारी पोलिसांनीं चोर-वस्ती वेढली. मारहाण, मारहाणीला कःपदार्थ लेखीत लोकांची दंगल. जणुं कित्येक दिवस झोंपी गेलेली हिंसा जागी होऊन पिंगा

घालायला लागली. पण त्या असहाय वस्तीला बंदुकीच्या गोळ्यांनीं हतबल केलें आणि घायाळ वाघासारखीं ती माणसें आपापल्या गुहेंत दडलीं. त्या-नंतर हत्यारांची सक्त नजर त्यांच्यावर होती. पण वस्तींतील लहानमोठ्या अधिकाऱ्यांची सारी शक्ति जणुं पिळून टाकली गेली. देह चालत होते, पण मनें कांपत होतीं. उद्यां नाहीं परवा, परवां नाहीं, दहा दिवसांनीं या चोर-वस्तींत जित्या जिवानें आपल्याला काम करतां येईल का? प्रत्येकापुढें प्रश्न पडला. आठ दिवस—दहा दिवस गेले. संवयीनें माणसें हालत होतीं, व्यवहार करीत होती. अधिकारी अधिकाराला झळ न लागल्याचा आविर्भाव आणीत होते. पण जणुं कोणत्या तरी अदृश्य शक्तीच्या भीतीनेंच त्यांचे नकली आविर्भाव होत होते. ती अदृश्य शक्ति म्हणजे गोरी सत्ता की पोटाची खळगी हें कुणाचें कुणाला कळत नव्हतें. शाळा अजूनही ओस होत्या. वस्तींतील नेहमींची स्वच्छता लोपली होती. कायद्याच्या बडग्याखालीं वस्तीचे लोक कामें करीत होते. पण त्यांच्या तरळ नजरा आतां पुढें काय हेंच जणुं शोधीत होत्या. पुनः तोंडावर मेलेलें हंसूं आलें. पुनः विनम्रता आली. पुनः विनवणी आणि याचना आली. पण तेव्हा अंतःकरणानें त्यांत पहिला निर्जीवपणा ठेवला नाहीं. कुत्र्यासारखी शेपटी हलवली जाईना. घायाळ वाघासारख्या डाव साधणाऱ्या नजरा अजून फिरत होत्या. रिपन्‌साहेब अजून वस्तीवर आले नव्हते. आणि या तुडवलेल्या लोकांच्या नजरा व कान त्यांच्याच हालचालीकडे लागले होते. मिस् डगन् बाईमाणूस. तिच्याकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. पण मिस् डगनही फारशा बंगल्याबाहेर पडल्या नाहींत.

• • •

## ४१

दिवस गेले. अनेक. आणि एक दिवस एक महत्त्वाची बातमी चोर-वस्तीभर एक दुसऱ्याच्या कानांत सांगत होता. कागद खसखसत होते.

फाटक्या कुडत्याच्या आंतल्या खिशांत ' छापे ' कोंबले जात होते. जेमतेम साक्षर झालेल्या माणसापासून तों सात बुकें लिहिणारा-वाचणारांना आपल्या चोर-वस्तींतील बंडाची हकीगत दर रोज वर्तमानपत्रांत येत आहे हें कळलें ! रयत प्रजेचें आपल्याकडे लक्ष लागलें आहे. आपला छळ वर्तमानपत्रें ओरडून ओरडून सांगताहेत. रिपन्साहेबांचा जुलूम चव्हाटयावर मांडला जात आहे. कधीं नाहीं ती वर्तमानपत्राचा तुकडा वाचण्याऐकण्याची चोर-धरपड सगळीकडे दिसत होती. नुसत्या चोर-वस्तींतच नव्हे वरच्या नोकर-वर्गांतही त्या प्रत्येकाचे खिसे चाचपले असते तर ' प्रजा ' वर्तमानपत्राची प्रत खिशांत सांपडली असती. पण ' प्रजा ' वाचणें–आवारांत आणणें हें अराजक ठरलें. पण रिपन्साहेबांच्या गैरहजेरींत काम करणाऱ्या अ. मॅनेजर वंगर्डीनीं ' प्रजा ' वर्तमानपत्र जो वाचील, ऐकेल, आवारांत आणील किंवा दुसऱ्याला देईल त्या नोकराला बडतर्फ केलें जाईल अशी जाहीर नोटिस काढल्यापासून वंगर्डींच्या स्वतःच्या खिशांत ' प्रजे 'चा अंक असेच, पण इतरही नोकर अंक वाचण्यासाठीं धडपडत. ते पानवडहून उठून सकाळींच बाजाराला म्हणून जात. गगनवाडींत वर्तमानपत्र वाचून माघारे येत. चोर-वस्तीलाही वर्तमानपत्र आणण्याची मनाई होती. पण अधिकारीवर्गाच्या कक्षे-बाहेर असलेले काश्या, बन्या, हणम्या, आबा सगळें वृत्त मुखामुखानें तारें-तील पालांपालांत पसरवीत. गिरणींत जाणारे तिखट कानानें सगळ्या बातम्या ऐकत. चोर-वस्तींतील कामगार हे गिरणीत म्युनिसिपालिटीत सगळ्या रयतेचें लक्ष्य होऊन राहिले होते. आणि त्यामुळें कधी नाहीं त्या अभिमानानें ते फुलले होते. कधीं नाहीं त्या तिखट जिभेनें रयतेला खरींखोटीं पाल्हाळें ते ऐकवीत होते.

' प्रजा ' वर्तमानपत्रांत चोर-वस्तींतील अन्याय–जुलुमांचे चौघडे वाजले. ' बंडा 'च्या हकीगती आल्या. दूरदूरच्या वर्तमानपत्रांनींही त्या छापल्या. सरकारला, कॉंग्रेसला, खडबडून जाग आली. सरकारला आपल्या खात्याविरुद्ध होणाऱ्या ओरड्यानंतर आत्मसमर्थन करणें जरुरीचें होतें. कॉंग्रेसला प्रजेच्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेणें आपलें कर्तव्य वाटत होतें. लालबावट्याबरोबर कॉंग्रेसही गाऱ्हाण्यांची दाद मागूं लागली. सरकार-लाही चौकशी-समिति नेमणें भाग पडलें. लालबावट्यानें आणि तिरंगी

झेंड्यानें सरकारचें पित्त खवळलें; परंतु त्यांतल्या त्यांत लालबावट्याला अवमानून तिरंगी झेंडा मानण्याकडे सरकारची वृत्ति होती.

• • •

## ४२

इकडे बारणे हे चोर-वस्तीचे मायबाप झाले होते. त्यांच्यामुळेंच विस्मरणांत जिवंत गाडलेल्या चोर-वस्तीला पुनः श्वास करतां येऊं लागला होता. आणि आतां नुसता श्वास टाकून उपयोगी नव्हतें. बोलणें भाग होतें. आबा हा बारण्यांचा उजवा हात झाला होता. तो बारण्यांकडे जाई तेव्हां ते त्याला घरच्या माणसासारखें जवळ बसायला सांगत. त्यांच्या खाटेवर तो किती वेळां बसला होता. बारण्यांनीं आपल्याबरोबर त्याचाही चहा केला होता. बारण्यांच्या जेवणाच्या डब्यांतून त्याला कधीं कधीं जेवायलाही मिळत होतें. इतकी आपुलकी त्यानें कधीं अनुभवली नव्हती. रयत आणि त्यांतून बारण्यांसारखा मोठा माणूस इतक्या आपुलकीनें वागवील हें त्याला खरें वाटलें नसतें. बारण्यांचा साधेपणा पाहून ते सारे लोक थक्क झाले होते. पैशांची हाव नाही. रात्रंदिवस दुसऱ्याकरितां झीज. कितीही आजारी पडले तरी निजल्या निजल्या ते सरकारला पत्रें लिहीत. आणखीही कुणाकुणाला पत्रें लिहीत. आबा–काश्या कंपूकडून चोर-वस्तींतील जाणतीं माणसें ते बोलवून घेत. त्यांना प्रसंग पडला तर आपलीं गाऱ्हाणीं व्यवस्थित कशीं मांडावीं लागतील याचें ज्ञान देत. एक दोन नव्हे, कितीक माणसें आबा बोलवी. काश्या बोलवी. गगनवाडीचे कॉंग्रेसवाले शिवनाप्पा यांच्याकडे कितीक चिठ्या-चपाट्या पोंचवाव्या लागत. तीं कामें आबा–काश्या कंपूच करी. बारण्यांच्या संगतींत आबा–काश्यांच्या हृदयांत नव्या आकांक्षा उत्पन्न झाल्या. त्याना आपणही मोठे होणार अशी आशा वाटूं लागली. बारण्यांशीं रोज गांठीभेटी झाल्यानें पूर्वीं कधीं नाहीं इतक्या तीव्रतेनें त्यांना चोरीमारीची लाज वाटूं लागली. ते अत्यंत प्रामाणिकपणें वागत. दिल्या शब्दाचा बोज ठेवण्यासाठीं धडपडत. आबाला तर आपल्याला स्पर्श करण्यांत कमीपणा न

मानणारा स्पृश्य हा देवासारखा वाटत होता. आतां त्याला आशा वाटत होती, कीं आपली जातीची बेडी आपल्याला बोंचणार नाहीं.

पण बिचारे ! त्यांच्या अंतःकरणांतल्या अंतःकरणांत त्यांना या अंगावर आलेल्या मोठेपणांत आपले पाय जमिनीला लागतील, लालबावटा आपल्याला नोकरी लावून देईल हीही केवढी आशा होती. सारी चोर-वस्ती या मुलांकडे आदरानें पहात होती आणि त्यांनाही वाटे या पोरांना काम मिळणार.

सरकारनें चौकशी कमिटी नेमल्याची बातमी साऱ्या चोर-वस्तींत पसरली. सगळ्यांना रिपन्साहेबांवर सूड घेतल्याचा आनंद झाला होता. पण त्यांच्या आनंदाच्या कटोऱ्याला कशीं छिद्रें पडली आहेत, हें बिचाऱ्यांना कळत नव्हतें. त्या चोर-वस्तीच्या मुक्ततेपेक्षांही ती मुक्तता आम्हीं केली असें म्हणण्याची मोठ्यामोठ्यांत अहमहमिका लागली होती. सरकारनें नेमलेल्या कमिटींत कॉंग्रेसवाले होते, लालबावटेवाले होते. कॉंग्रेसवाले शिवनाप्पा गगनवाडींत अत्यंत महशूर. चोर-वस्तींतील लोकांची त्यांनीं जातीनें विचारपूस आरंभली. आणि ती विचारपूस करतांना लालबावट्याविषयींची अप्रीति नाहीं नाहीं म्हणतां त्यांच्या बोलण्यांतून बाहेर पडे. चोर-वस्तींतील लोकांना सगळेच कॉंग्रेसवाले. त्यांना लालाबावटा हा कॉंग्रेसचाच वाटे. लालबावटेवाले स्वतःला कॉंग्रेसचेच म्हणवीत. पण शिवनाप्पा लालबावट्याबद्दल सावत्र भावानें बोलत. बाकी कुणाला नाहीं, तरी आबा-काश्या कंपूला मात्र हा फरक कळत होता. ते आपसांत चर्चा करीत. तिरंगी कांग्रेसवाले चांगले कीं लालबावटेवाले कॉंग्रेसचे लोक चांगले ! पण त्यांना कोणतेंच मत खात्रीचें असे काढतां आलें नव्हतें. कॉंग्रेसवाल्यांनीं आणि लालबावटेवाल्यांनीं चोर-वस्तीची बाजू घेतली आहे, ते दोघे सरकारांत आपल्या बाजूनें भांडत आहेत हें त्यांना कळत होतें; पण कॉंग्रेसवाले कोणत्या मर्यादेपर्यंत आपल्याला मुक्त करायला तयार आहेत आणि लालबावटेवाले किती मर्यादेपर्यंत मुक्त करायला तयार आहेत, याचा पत्ता त्यांना लागला नव्हता. त्यांना साऱ्यांना वाटे आतां हजेरी संपणार, आतां तार जाणार. रयतेसारखें आपल्याला वावरतां येणार आणि त्या आशेची वात जाळीत, ती वस्ती देव केव्हां प्रसन्न होतो याची रोज वाट पहात बसली.

● ● ●

# ४३

सरकारनें नेमलेल्या कमिटीचें भिजत घोंगडें, चोर-वस्तींतील जनतेची उत्सुकता नाहींशी होईपर्यंत भिजत पडलें असलें, तरी चोर-वस्तींत कितीक सुधारणा डोकावूं लागल्या. चोर म्हणून ज्यांना डांबले, ते चोर नसून मागासलेले म्हटले जाऊं लागले. कित्येकांना तारेंतून बाहेर काढलें. त्यांच्यासाठीं आखाडे बांधण्याचें ठरलें. तरुण लोकांनीं तालमी, कुस्त्या, खेळ, यांत मन घालून चोरीच्या मार्गाकडे वळूं नये यासाठीं आखाड्यांची व्यवस्था झटपट झाली. धर्म, नीति याकडे मन वळावें म्हणून हनुमानाचें देऊळ बांधलें गेलें. बैठे खेळ, करमणूक यांसाठीं एक क्लब तयार झाला. तेथें कॅरम्, रेडिओ, ग्रामोफोन ठेवण्यांत आले. चोर-वस्तींतील लोकांच्या हितासाठीं जें जें करतां येईल, तें तें करण्याची सरकारची सूचना असावीसें वाटत होतें.

आखाडा बांधला तेव्हां कलेक्टरला बोलावून आखाडा उघडण्याचा समारंभ झाला. गोऱ्या कलेक्टरनें उपदेशपर चार शब्द सांगितले. वस्तींतील लोकांनीं कलेक्टरसाहेबांच्या करमणुकीसाठीं कित्येक खेळ केले. भाटाच्या पोरींनीं नाचून दाखवलें, पारध्यांनीं फासे टाकून पक्षी, हरणें कशीं पकडतां येतात हें दाखवलें, नकल्यांनीं नकला केल्या. सोंगाड्यांनीं सोंगें घेतलीं. कलेक्टरसाहेबांची करमणूक झाली. नव्या मनूला सुरुवात झाली असें वस्तीला वाटलें.

क्लब सुरू झाला. मॅनेजर, इन्स्पेक्टर्स खेळीमेळीनें खेळत बसले. त्यांनीं वस्तींतील लोकांनाही आपल्यांत खेळायला बोलावलें. हा देखावा कॉंग्रेसवाल्या शिवनाप्पांच्या देखत झाला होता. कारण कॉंग्रेस मंत्रिमंडळें अधिकारावर होतीं. अधिकारी लोक आपल्याशीं खेळीमेळीनें वागायला लागले. आपण जिंकली, असें चोर-वस्तीला वाटलें. ज्या तरुणांच्या खटपटीनें त्या खडकाळ जमिनीत माणुसकी उगवली होती, त्यांना धन्य वाटलें—नव्हे—त्यांची स्वतःबद्दलची कल्पनाही अवास्तव वाढली. त्यांना असेंही वाटूं लागलें कीं आतां मॅनेजर, इन्स्पेक्टर, मडमसाहेब आणि साऱ्या नोकरवर्गाला आपण

केव्हांही वठणीवर आणूं ! खेळीमेळीचे देखावे चालत, तेव्हां हे तरुण दूर उभे राहून साऱ्या गोष्टी पहात. आणि पहातां पहातां त्यांना दिसे, कीं अजून किती तरी करायचें आहे. अजून हजेरी द्यायला रोज जावें लागतें, कित्येकांना विनाकारण हजेरी लावलेली आहे, आणि तारेचें कुंपण अजून आहेच, तोंपर्यंत आपली खटपट पुरी झाली नाहीं. वस्तींतील लोकांनाही वाटे, कीं कुणीं अन्याय केला, तर आपल्या या पुढाऱ्यांकडून आपण लालबावट्याकडे नाहीं तर कॉंग्रेसकडे जाऊं. आणि अजूनही शिवनाप्पांच्या आणि बारण्यांच्या घरीं वस्तीवरील लोक जात. तक्रारी करीत. बेबंद वागायला हवें असणारेही जाऊन तक्रारी करीत. खोट्या तक्रारी करीत आणि इकडे अधिकाऱ्यांपुढें लाचार हसेंही हंसत. त्यांच्याकडे आतां बारण्यांचेंही लक्ष नव्हतें आणि शिवनाप्पांचेंही नव्हतें. त्या दोघांनी जें करायचें तें केलें होतें. आतां सरकारी रिपोर्टांची ते वाट पहात होते. दुसऱ्या कामाकडे त्यांचें चित्त वेधलें होतें. शिवनाप्पांना आतां बारण्यांना झाडून टाकण्याची इच्छा होती. वस्तींतील लोक आले कीं ते हळूच सांगत, 'आतां आपल्या कॉंग्रेसचें राज्य आहे. तिरंगीचें राज्य आहे. लालबावट्याचे नाहीं. तुम्ही लालबावट्याच्या नादीं लागून दंगल माजवूं नका. संप करूं नका. त्यांत तुमचें हित नाहीं.'

इकडे बारण्याकडे जाणारांना बारणे सांगत, "हे तिरंगी झेंडेवाले तुमच्यासाठीं कांहीं करणार नाहींत. उद्यां गिरणीचा संप झाला तर हे तिरंगीवाले तुमच्यावर पोलिसांना पाठवतील. तुम्हांला लाठ्या मारतील. गोळ्या घालतील. मथुरादास तिरंगीवाले आहेत. तुम्हीं पगारवाढ मागितली, कीं ते, कलेक्टर, तिरंगी सरकार आणि त्यांच्यावरलें गोरे सरकार सगळीं एक होतील."

पण बारणे आणि शिवनाप्पा यांच्या मनांतील फरक कुणालाही कळला नाहीं.



# ४४

"वंगडी मॅनेजर आज जेवन हैती घेनार हपिसरांना." सायब्या पट्टेवाला सांगत आला होता. सायब्या बाटला होता. त्याला पट्टेवाल्याची जागा मिळाली होती. रिपन्-डगन् गेल्यामुळें चोरवस्तीनें जितलें, एवढेंच त्याला कळलें. आबा-काश्या-वन्या-हणम्यासारखे तरुण, साहेबांच्या नजरेनें वाईट असले तरी आतां ते वाईट ठरणार नाहींत, असेंच त्याला वाटलें. आणि तो आपण केलेल्या चुगलखोरीचें प्रायश्चित्त म्हणून कीं काय या तरुणांच्या बरोबर मनमोकळेपणानें बोलूं लागला होता. आज वंगडींच्या जेवणाची सरबराई करून आल्यावर त्याच्या मनाचा गोंधळ उडाला होता. पण आजही त्याला या तरुणाना भेटण्याचा मोह आवरला नाहीं. अंधाऱ्या रात्रीं चौघे पांच जण कुजबुजत बसले होते.

सायब्या—अरे रिपन्सायबाच्या येवढा पुढं पुढं करीत व्हता ना वंगडी मॅनेजर, तरी त्यो बी म्हणतो सायब ग्येला बरं झालं.

वन्या—खरं ?

सायब्या—अर आज जेवान दिलं त्ये बी सायब ग्येला म्हून दिलं.

आबा—लेका तुला तर कांहीं कळत नाहीं.

सायब्या—मला कळत न्हाई ? अर त्यो म्हनत व्हता ह्ये गोर साहेब हिथं असल, कीं लई मुजोरी करत्यात. कुनाला सत्ताच नसती काई कराया. पन गड्या वंगडी आला म्हून तुमचं बरं न्हाइ व्हनार. त्यानं नजर ठिवाया सांगितली तुमच्यावर.

आबा—काय म्हणून ?

सायब्या—तुमी लालबावट्याकड जाताय काय ह्यें बघाया सांगत्यो त्यो हामाला.

आबा—-अन् कॉंग्रेसकडे ?

सायब्या—-अर लालबावटा न्हाई त्याला आवडत. पन आतां त्यो बी गांधी टोपी घालाया लागलाय !

वंगडींचा लालबावट्यावरचा राग उघड उघड दिसत होता. हपिसासमोर येणाराजाणारांवर ते सारखेंच शस्त्र धरीत. " जा. लालबावट्याकडे जा ना. तो काम देईल तुम्हांला. आमच्याकडे कशाला नोकऱ्या मागतां ? इथें नोकरी मागायची अन् मग गिरण्यांतून संप करायचे काय ! फिरून आम्हांलाच लोकांना तुमच्यासाठीं पुनः गिरणीच्या मालकाकडे तोंड वेंगाडाव लागतं. तुम्हां अद्दल घडली पाहिजे. लालबावट्याकडे जा नाहीं तर लढाईवर जा. "

त्या दिवशीं किती तरी लोकांना कळलें कीं महागाई झाली ती लढाईमुळें. कितीक लोकांचीं मनें सैन्यांत भरतीसाठीं वळवलीं जात होतीं. कितीकांना आमिषें दाखविलीं जात होतीं. कित्येक जणांना मोह होई. पण प्रत्यक्ष भरती फारच थोड्या लोकांची होत होती.

हपिसासमोर रोज बेकार लोक कामासाठीं जमत. पहिल्या पहिल्यांदा वंगडीसाहेब लालबावट्याकडे जाणारांनाच छेडीत. पण आतां शिवनाप्पा-सारख्या कॉंग्रेसवाल्यांकडे जाण्याबद्दलही ते हळू हळू बोलूं लागले. चोर-वस्तीच्या लोकांना कळेना, कीं ' कॉंग्रेस आली ' ' कॉंग्रेस आली ' म्हणतात तर वंगडीसाहेब कॉंग्रेसवाल्यांवरही दांत कां धरतात ?

एक दिवस तर ते म्हणाले, " अरे काय कॉंग्रेस कॉंग्रेस करतां ? आतां लढाई सुरू झाली आहे. इंग्रज सरकार कॉंग्रेसला लाथ मारून हांकून देईल तेव्हां कळेल."

● ● ●

## ४५

वंगडी मॅनेजरांनीं आपल्या कारकीर्दींत डोळ्यांत भरण्याजोगी कामगिरी करून दाखवण्यासाठीं एक योजना सुचवली आणि वरच्या मुख्य अधिकाऱ्यांच्या परवानगीनें हिरणगांवचें धरण बांधणाऱ्या इंजिनियरजवळ मजुरांचें कंत्राट ठरवलें गेलें.

हिरणगांव पानवडपासून दहा मैलांवर होतें. तेथें लागणाऱ्या मजुरांची एक वस्तीच तेथें करायचें ठरलें. त्याप्रमाणें ऑफिससाठीं, व अधिकाऱ्यांसाठीं

पत्र्याचीं तात्पुरतीं घरें बांधलीं गेलीं. पत्र्याची एक शाळा बांधली गेली. कांहीं थोडीं औषधें, कांपौंडर हीही व्यवस्था झाली. आणि पानवडचीं हजेरी असलेलीं चोर-वस्तींतील शंभर कुटुंबें हलवण्याचें ठरलें. कुणी जायचें, कुणी नाहीं, हें त्या कुटुंबांच्या मनावर अवलंबून नव्हतें. ज्याच्या मनांत जायचें होतें, त्यांना नेलेंच असतें. पण भरती पुरी व्हावी म्हणून ज्याच्या मनांत नव्हतें, अशा बेकार कुटुंबांनाही न्यावयाचें ठरलें होतें. इकडे काम मिळणार म्हणून आनंद, तर पुष्कळ वर्षांचीं आपलीं चिमणी-कावळ्यांची घरें सोडून जातांनाही दुःख ! त्या घरांच्या काटक्याकुटक्यांत मने गुंतून पडलीं होतीं. आणि कां पडूं नयेत ? जुने पत्र्याचे तुकडे, तरटें, जुनीं लांकडें, बांबूचे तुकडे हे मिळवायलाही त्रास पडलाच होता. त्या उकिरड्यासाठींही पांच दहा रुपये खर्च झाले होते. पुनः हिरणगांवला तोच खटाटोप व्हायचा होता. पण विवंचना पाठुंगळीस घेऊन जन्माला आलेल्या त्या कुटुंबियांना, कुठेंही गेलें तरी खटाटोपच करीत जगायचें होतें.

हपिसासमोर वाचलेल्या यादींत गेन्याचें नांव होतें. गेन्या, चांगुणा यांना मधून मधून काम असे. मधून मधून ती बेकार हिंडत. 'भीक मागूं नये' हा कायदा होता. पण चांगुणा भीक मागायला जाई तेव्हां अधिकारी दुर्लक्ष करीत. कारण त्यांनाही काम देतां येत नव्हतें. परस्पर त्रास न होतां एका बेकार कुटुंबाची व्यवस्था लागत होती. पण आपणच कायदा मोडूं देत आहों याची जाणीवही चोरटेपणानें अधिकाऱ्यांच्या मनांत होतीच. म्हणून गेन्या आणि गेन्यासारखीं कुटुंबें हीं हिरणगांवला न्यायचें अधिकाऱ्यांनीं निश्चित केले.

आईबापें जाणार, म्हणजे रागाजाळानें कां होईना, कधींमधीं मिळणारी भाकरी जाणार, हेंच आबाच्या पहिल्यांदा लक्षांत आलें. पण त्याला वाईट वाटलें नाहीं. त्या चोर-वस्तीखेरीज त्याला गति नव्हती म्हणून, नाहीं तर उपाशीं पोटीं तो केव्हांच वस्ती सोडून गेला असता. आईबापें जाणार या कल्पनेनें त्याला थोडेसें बरेंच वाटलें. आईबाप, भावंडें पोटभर खातील, या विचारानें तर त्याला बरें वाटलेंच; पण थोडासा स्वतंत्रतेचाही आनंद त्यांत होता. त्याच्या पाठीमागें त्याची स्वतःची भुणभुण नव्हती, असें थोडेंच होतें ? पण त्याचा ज्या गोष्टींत नाइलाज होता, त्या आईबापांच्या लक्षांतच येत नसत. तीं पुनः पुनः त्याला कळणाऱ्या, पटणाऱ्या गोष्टींची

भुणभुण त्याच्या मागें लावीत. वस्तींतच राहून त्यांना न भेटणें, न गांठणेंही शक्य नव्हतें. आतां हे सगळे प्रश्न मिटतील, या कल्पनेनेंच त्याला सुख वाटत होतें. ' मी तारेच्या कुंपणांत नसलों तरी तारेच्या कुंपणांतील आई-बापांचा मुलगा आहे. जरी मी स्वतंत्र असलों, तरी चोरांच्या स्वतंत्र वसाहतींवरही जोंपर्यंत अधिकाऱ्यांची देखरेख असते, तोंपर्यंत माझ्यासारख्या चोर-जातींत जन्माला आलेल्याला वस्तीचाच आधार.' आबाचें मन न कळतां मावळणीच्या घरीं विसांवत होतें. बारण्यांच्या दाराशीं विसांवत होतें; आणि निराधारपणें कल्पनेंत चोऱ्या करीत पोटाला मिळवीत होतें. पण आईबाप दूर जाणार असल्यानें मनाला मिळणारी स्वस्थता त्याला त्या क्षणीं लाख मोलाची वाटत होती. " आतां मी कुणाचा नाहीं. हवं तें करीन." असें तो म्हणत होता. पण चांगुणेचें आंतडें स्वस्थ बसूं देईना. तिला व गेन्याला हिरणगांवला जायला ज्यानें फर्मावलें, त्या हपिसराचे तिनें पाय धरले,

" माझ्या आबाला पण काम द्या सरकार."

" आबाच्या कामाचं माझ्याजवळ नको बोलूं. त्याला म्हणावं, बघ तुझं तूं."

" असं नका व करूं साहेब ! मुलाला इथं टाकून त्याला भाकर कोन देनार ? "

" आतां तो अठरा वर्षांच्या वर गेला. त्याला तूं नको द्यायला भाकर."

" असं कुठं होतंय्. हिथं काम न्हाई त्याला सरकार. त्याला तिथं काम द्या सरकार. न्हाई तर उपाशी मरल."

" मरूं दे मेला तर."

पण चांगुणा निकरानें विनवीत होती आणि त्या दिवशीं आबाचे ग्रह उच्चीचे निघाले.

" जा, बाईसाहेबांना म्हणावं त्याला शाळेवर घ्या. हिरणगांवच्या शाळेवर मास्तर म्हणून घ्या म्हणावं." हपिसर बोलून गेले. चांगुणेला आणि गेन्याला बाईसाहेबांच्या बंगल्याचें अंतर तोडायला दोन दोन पाय अपुरे झाले.

" अग न भेटाया का ती मडम् न्हाई. कितीक लोक आतां बंगल्यावर जात्याती."

" त्यो माळी हाए ना ! "

" माळ्याला कोन पुसतोय ? आतां त्यो बी ग्येला मडनमागं."

दोघें आशेनें पळत पळत गेलीं. पण नव्या बाईसाहेब बंगल्यावर नव्हत्या. तीं माघारीं फिरलीं. आतां आबाला शोधून काढलें पाहिजे होतें.

" ऊठ कीं गांवांत हिंड. आतां कशापायीं मरत असतोय् गांवांत घेवाला ठावं."

" अन् आतां धुंडायाचा तरी कुठं ? "

" मावळणीकड पडला असल. ती बी बरी भेटलीया त्या उनाडाला."

चांगुणेला आणि गेन्याला आबाचा राग येई आणि कौतुक वाटे. राग येई त्याला काम लागत नाही म्हणून; पण कौतुक वाटे, तें त्याच्या हर एक गोष्टीचें. 'त्यो बोलतो कसा, चालतो कसा, मोठ्या लोकासंगं कसा बोलतो.' तीं पुनः पुनः म्हणत.

रिपनसाहेब गेला तो आबानें घालवला, याचीही त्यांना जाणीव होती. प्रेमाची कडकड करीत तीं दोघें आबाला वस्तीवर शोधायला हिंडत होतीं.

• • •

## ४६

रिपन्‌साहेब गेले. डगन्‌बाई गेल्या. चोर-वस्तींत नवे नवे अधिकारी दिसूं लागले. कांहीं माणसांची हजेरी गेली. कांहींची तारेच्या कुंपणांतून मुक्तता झाली. पण 'माझें काय ? मी अजून रिकाम्या पोटींच हिंडणार काय ?' आबापुढें प्रश्न पडला. कॉंग्रेसचें मंत्रिमंडळ आल्यानें एकदम नवें वारें वाहूं लागल्यासारखें झालें. त्यांतच काशिनाथ, वन्या, हणम्या या सगळ्यांना गिरणींत कामें मिळालीं. राहतां राहिला आबा. तो त्या सभोंवतालच्या बदलत्या वस्तीकडे पाही आणि खिन्न होई. तो बारण्यांकडे जाई. पण तेथेंही जाऊन काय करायचें ? त्याच्या पोटाचा प्रश्न बारणे सोडवतील काय ? पण बारणे स्वतः कुठेंही नोकरी करीत नव्हते. ते अगदीं साधेपणानें रहात. लोकांसाठीं त्यांचें कांहीं कांहीं काम सारखें चाललेलें असे. ते पैसा कुठून आणतात ? जेवतात कसे ? आबाला प्रश्न पडे. एकदां त्याला वाटे आपणही

लोकांसाठीं अशींच कामें करूं; पण मग जेवायचें कुठें ? बारण्यांचे नातेवाईक श्रीमंत. ते त्यांना जेवायला घालीत असावे. त्यांच्याकडेही आबानें कितीक वेळां निरोप पोंचविले होते. तरीही आबाचें मन घुटमळत होतें. गांधी-सेवा-मंडळाच्या शाळेंतून निघाल्यापासून ज्या वातावरणाची त्याला न कळतां भूक लागलेली असे, तें त्याला तेथे मिळे. आणि त्याचें मन चोर-वस्तींतून लोभावून बारण्यांच्या आसपास हिंडूं लागे. रयतेंत त्याला कुठेंही सहानु-भूतीचा स्पर्श झाला असता तर तो तेथेंही विसांवला असता. पण तो स्पर्श मिळण्याची शक्यता नव्हती. शिवनाप्पांकडेही तो मधून मधून जाई, पण तेथें थोरांची बैठक निराळी पडल्यासारखी होई आणि मग आबा बुझून जाई. बारणे आबाची विचारपूस करीत. आबा त्यांच्या चिठ्याचपाट्या पोंचविण्याचें काम तत्परतेनें करी. पण त्याचा खरा प्रश्न सुटत नव्हता. त्याच्या स्थितीचें ज्ञान बारण्यांना आहे, हेंही त्याला माहीत होतें. पण जेथें श्रद्धा, भक्ति, आदर, तेथें तोंड वेंगाडणें त्याच्यानें होईना. 'मला कांहीं करतां येणार नाहीं' असें बारणे म्हणाले तर ? त्याच्या वाईट परिस्थितीचें वर्णन एकदांच त्यानें आपल्या मुखानें केलें. त्यानंतर तो कधींही बोलला नाहीं. पोटाच्या विवंचनेचें स्वरूप हें त्याला हीनही वाटत होतें. बारण्यांच्या व त्याच्यामध्यें निर्माण झालेला धागा, तोंड वेंगाडण्यानें, पुनः पुनः विवंचना बोलून दाखविण्यानें, नाहींसा होईल असें आबाला वाटे. तो बारण्यांजवळ बोलला नाही. पण आंतडी पिळली जात होती. त्यानें आपली म्हणून कांहीं एक लायकी बारण्यांजवळ निर्माण केली होती. त्या लायकीला याचनेनें धक्का लावण्याचें आबाच्या मनांत येईना.

आज तो बारण्यांकडे गेला. दारांत उभा राहतांच त्याला जणुं धक्का बसला. त्याच्या डोळ्यावर त्याचा विश्वास बसेना. डगन्बाईच्या ऐवजीं आलेल्या नव्या बाईसाहेब बारण्यांकडे बसल्या होत्या ! अधिकारीवर्गापैकीं लालबावटावाल्याकडे इतक्या घरोब्यानें कोणी येऊन बसेल ही त्याला कल्पनाही आली नाहीं. तो परत जाण्यासाठीं वळला पण त्याचे पाय वळतना. इतक्यांत बारण्यांनींच त्याला म्हटले,

"कां हो जातासे ? थांबाना."

आबा खुर्चीवर नेहमींप्रमाणें बसला. पण किती अस्वस्थपणें. त्याला सगळेंच

आश्चर्याचें वाटत होतें. खुर्चीवर बाईसाहेबांदेखत बसण्याचे परिणाम काय होतील याची त्याला कल्पना नव्हती. किंबहुना तो बारण्यांकडे दिसल्यामुळें, आतां पुढे काय होणार, याची त्याला चिंता वाटूं लागली. बारण्यांच्या सांगी-वरूनच आजपर्यंत जे जें त्यानें केलें तें छपून छपून. त्यानें माणसें वळवलीं, भेटवलीं, वर्तमानपत्रें वांटलीं, बंडाची उठावणी केली. पण अधिकाऱ्यांना वा शिपायांना कुणालाही आबाचा हात दिसला नव्हता. आबाचा हात दिसला असता तर बारण्यांचा चोर-वस्तींतील हात नाहींसा झाला असता. काश्या, वन्या, हणम्या सगळ्यांनीं ही खबरदारी घेतली होती. त्यामुळेंच त्यांना गिरण्यांतून कामें मिळालीं होतीं. आणि इतके दिवस काळजी घेऊन आज आबा नेमका बारण्यांकडेच सांपडला. पण बाईसाहेबही बारण्यांकडे सांपडल्या ! त्या लालबावट्याच्या तर नसतील ? आबाला कुतूहल वाटूं लागल. बाईसाहेबानीं त्याला ओळखलें नाहीं.

बारणे—काय ग, तुम्ही वस्तीच्या बाहेर्चीं माणसं आणून त्यांना नोकऱ्या देतां, त्यापेक्षां वस्तीर्चीं लायक माणसं कां घेत नाहीं कामावर ?

" वस्तींत आहे कोण एवढ्या लायकीचं ? " बाई हंसत म्हणाल्या.

" पुष्कळ सांपडतील. "

" पुष्कळ सांपडलीं असतीं तर नेमलींच असती."

" तुला कांहीं माहीत नाहीं. इंग्रजी चार अन् पांच इयत्ता झालेल्या चोर-वस्तीच्या बाहेरच्या माणसांना नोकऱ्या दिल्या जात आहेत तुमच्या वस्तीवर."

" अरे, पण चोर-वस्तीच्या अधिकाऱ्यांनीं खूप चलाखी केली आहे. इंग्रजी ४-५ इयत्तांपर्यंत चोर-वस्तींर्चीं पोरं शिकवलींच नाहीं त्यांनीं. "

" कां ? "

" नोकऱ्या मागतील म्हणून. "

" मग ती वस्ती अन् सुधारणेच्या नांवाखालीं हजारों रुपयांचे अधिकारी नेमले आहेत कशाला ? नुसतेच पगार देऊन घरीं बसवायचं होतं तुम्हां लोकांना. "

" सांगूं आम्हांला कशाला नेमलं आहे तें ? सुधारणा न होण्याची खबरदारी घेण्यासाठीं ! " खोडसाळपणें बाई म्हणाल्या. " अरे, तुला

माहीत नाहीं. कांही मुलांना ट्रेनिंगकडे आणि हायस्कूलकडे पाठविण्याचं मीं ठरवलं अन् तशी शिफारस केली वर स्कॉलरशिपसाठीं, तर येथल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं मला बोलावून सांगितलं, कीं तुम्ही या भानगडींत पडूं नका. हीं मुलें शिकलीं कीं आपल्याच डोक्यावर बसतील नोकऱ्या घ्या म्हणून. या लोकांची बुद्धि जागी केली कीं हे लोक आवरणार नाहींत आपल्याला !"

बारणे हंसले. आबा सर्वस्व एकवटून ऐकूं लागला.

"अरे, पहा तर गंमत या लोकांची; त्यांना फार राग येतो, मीं मुलांना ट्रेनिंगकडे नि हायस्कूलाकडे धाडलं म्हणून. अन् शाळेंत मुलं हजर असावीं म्हणून मी धडपडते, त्याबद्दलही चेष्टा करतात ते लोक."

"हं. पाहून घे आमच्या लोकांची लायकी. आपण पगार खात बसायचं. मग त्या पगाराला स्मरून कुणाचं कांहीं हित झालंय कीं नाहीं इकडे लक्षच द्यायचं नाहीं."

"कुणी कांहीं करायला लागलं आस्थेनं की लालबावट्याकडचा माणूस म्हणून त्याच्यावर संशय धरायचा नि रिपोर्ट करायचा वर. आस्था ही सरकारी नोकरींत घातकच ठरते कीं काय कुणाला ठाऊक."

"सांगितलं होतं कुणी तुला इथं यायला अन् सरकारी नोकरी करीत बसायला ? जनतेबद्दल आस्था घातकच असते, हा अनुभव घ्यायला इथपर्यंत येण्याचं कारण नव्हतं. सगळीकडे तेंच होतं कीं सरकारी खात्यांत."

"अरे, तूं इतकी गाजवलीस चोर-वस्ती. म्हटलं बघावं, आहे तरी काय सगळा प्रकार. आतां हिरणगांवला तलाव व्हायचाय, तिथे पाठवणार आहत लोकांना. पुष्कळांना काम मिळेल तिथें."

"म्हणजे ? वस्तीच करणार कीं काय तिथें ?"

"हो. वस्ती, शाळा, दवाखाना, दुकानं."

"असं ? अग मग याला काम दे कीं कुठें तरी."

"हे कोण ?"

"तुमच्या वस्तींतलाच मुलगा आहे. इंग्रजी ६ इयत्ता झाल्या आहेत. व्ह.फा. झाला आहे."

"मला माहीत नव्हतं !" असें म्हणून विठा थोडी अस्वस्थ झाली.

"तसं वाटण्याचं कांहीं कारण नाहीं. त्याला चांगली समजूत आहे."

पण विठाचा नूर एकदम बदलला. ती सावधपणें बोलूं लागली. मोकळेपणीं बोलल्याचा तिला पश्चात्ताप होत असावासें आबाला वाटलें. पण त्याला नव्या बाईसाहेबांबद्दल आपुलकीही वाटूं लागली. तो उठला. तेथें बसणें त्याला बरें वाटेना. त्याच्याकडे पहात विठा म्हणाली,

"तुम्ही येऊन जा उद्यां माझ्याकडे."

आबाचा विश्वासच बसेना. 'तुम्ही!' त्याला अधिकारी वर्गानें कीं कुणीहि कधीं अशा सन्मानानें हांक मारली नव्हती. त्यानें कृतज्ञतेनें लवून नमस्कार केला आणि तो निघून गेला. आज चोर-वस्तीवर जातां जातां त्याची नजर विठाच्या बंगल्याकडे गेली. 'इथेंही मला माणूस म्हणून वागवणारें माणूस आहे!' तो कुणाशी बोलला नाही. पण ज्या ओढीनें तो बारण्यांकडे जाई तीच ओढ त्याला विठाबाईच्याबद्दल वाटूं लागली होती.

● ● ●

## ४७

दुसऱ्या दिवशीं तो बंगल्यावर गेला तेव्हां बाई चहा पीत होत्या. त्यांनीं आणखी एक कप रंगव्वाला आणायला सांगितला. रंगव्वासारख्या चोर-वस्तींतील बाईला घरच्यासारखी बाईच्या बंगल्यावर वावरतांना पाहून आबा चकित झाला. विठाबाईनीं खुर्ची दाखवून म्हटलें, "बसा. चहा घेतां तुम्ही?"

रंगव्वानें चहा आणलाही. आबा संकोचून बसला. त्यानें चहाचा कप हातीं घेतला. अधिकाऱ्यांनीं खुर्चीवर बसवून आपुलकीनें चहा दिला व तोही त्यांच्यासारख्याच कपांतून. या गोष्टीचाही आबाच्या मनावर परिणाम झाला.

"तुम्ही अजून नवीन आहां शिक्षकाच्या पेशाला, नाहीं?"

"हो. मीं कुठें शिकवलं नाहीं."

"इथें दोन जागा रिकाम्या आहेत. एक विणकामाच्या कारखान्यांतील शिक्षकाची आणि एक शाळेकडे. तुम्हांला अनुभव नाहीं कसलाच, म्हणून तुमच्या आईबापांबरोबर हिरणगांवाला पाठविण्याच्या ऐवजीं तुम्हांला मी इथेंच काम देणार आहें. म्हणजे तुमच्या कामाकडे मला लक्ष ठेवतां येईल. आम्हांला

विणकामालाही एक शिक्षक हवे आहेत. तुम्हांला कुणी माहीत आहे तुमच्यापैकीं ? ”

“ माझा सगळा कोर्स पुरा झाला आहे. आम्हांला सुतारकाम अन् विणकाम शिकवीत असत सक्तीनें. मला गालिचे, लुगडीं, कापड विणतां येतं.”

पुढें बोलणें व्हायच्या आंत मॅनेजर वंगडी आले. त्यांनाही बाईसाहेबांनीं बसवून घेतलें. ते चमत्कारिक नजरेनें आबाकडे पहात होते. आबाही थोडा अस्वस्थ झाला. बाईसाहेब आणि वंगडीसाहेब इंग्रजींत बोलत होतीं. वंगडी म्हणाले,

“ तुम्ही येथें नवीन आहांत. हे मुलगे उनाडपणा करीत हिंडत होते इतके दिवस. हा मुलगा इथें कशाला आला आहे कोण जाणे ! तुमच्याकडे कांहीं तक्रारी घेऊन पुनः पुनः यायला लागला तर मला कळवा. मी त्याचा पुरा बंदोबस्त करीन.”

“ छे: छे: ! तक्रारी ? कशाबद्दल ? मीं त्याच्या अर्जासाठीं त्याला बोलावलं. त्याला विणकामाचा शिक्षक म्हणून घ्यायचं मनांत आहे माझ्या.”

“ या चोर-वस्तींतील माणसांपेक्षां तुम्ही स्वतंत्र बाहेरचा माणूस घ्या. याच्यामुळें त्रास होईल. शिस्त राहणार नाहीं.”

“ पाहूं. प्रयोग करून पाहूं या. नाहीं तर नोटिस देतां येतेच आपल्याला.” बाईसाहेब हंसत म्हणाल्या.

“ पहा बुवा. मी आपला आधीं सावध करतों. त्यांतून तुमचा आग्रह असेल, तर मीही विरोध करणार नाहीं.”

“ हं. मला एकदां या लोकांना संधि द्यायची मनापासून इच्छा आहे.”

वंगडी निरोप घेऊन निघाले. ते फारसे खुषींत नव्हते. त्यांचें बोलणें आबाला कळलें, याची त्या दोघांनाही जाणीव नसावी. आबा कृतज्ञतेनें बाईकडे पहात होता. त्या मॅनेजरला फाटकापर्यंत पोंचवून आल्या.

“ सर्टिफिकीट आहे का तुमचं ? ”

“ नाहीं. पण आपण काम पाहून मला नोकरीवर ठेवा. विणकामाचं किंवा सुतारकामाचं सर्टिफिकीट देण्याची पद्धत नव्हती तिथें.”

" बरं, मग तुम्ही एक अर्ज पाठवा माझ्याकडे. सात आठ दिवसांत तुमच्या नेमणुकीची ऑर्डर तुम्हांला मिळेल. पण सध्यां तुम्ही कारखान्याचा ताबा घ्यायला हरकत नाहीं सोमवारपासून. "

" बाईसाहेब, फार उपकार झाले माझ्यावर." कसेंबसें कांहीं वेळ घुटमळून आबा म्हणाला. त्याला अधिक काय बोलावें, तेंही कळेना. तो बाहेर पडला आणि सोमदत्ताची बहीण राई बाईसाहेबांकडे आलेली त्यानें पाहिली.

आबा—इकडे कुठें ?

राई—हिथल्या शाळेंत काम मिळालंय मला.

आबा चकित झाला. " केव्हां ? "

राई हंसून म्हणाली, " अव महिना झाला कीं मला हिथं लागून ! "

आबा—असं ? अन् मग दिसलां नाहीं कुठें ?

राई—कुठं म्हनजे ? मी कांहीं वस्तीभर हिंडत नाहीं सारा दिवस. तुम्हीं कुठं दडी दिली होती ? मला दिसलां नाहीं ते ?

आबा—मी पण काम नसतांना उगीच हिंडत नाहीं शाळेच्या बाजूला. आतां मात्र हिंडावंच लागेल.

राई—कां ? शाळेंत काम मिळवलं कीं काय ?

आबा—शाळेंत नाहीं. विणकामाच्या कारखान्यावर.

राई—अग बया ! मग रोजची भेट होईल आपली.

राईच्या हंसत हंसत बोलण्यानें आबा विद्ध होऊन गेला. " किती चलाख पोरगी आहे ! " आणि मग घराकडे जातां जातां आजच्या दिवसाच्या अपूर्वाईनें तो चकित झाला. ज्या चोर-वस्तींतून त्याचें मन क्षणाक्षणाला पळायला बघे, त्या वस्तीला आतां कितीक गोडव्या गोष्टी त्याचें मन खिळवून धरीत होत्या. कधीं नव्हे त्या माणुसकीचा अनुभव त्याला तेथें आला होता. त्या माणुसकीमुळें आबाच्या मनांत कितीक आशा-आकांक्षांना अंकुर फुटले.

● ● ●

# ४८

आबाला पाहतांच चागुणा आणि गेन्या दोघे कडाडलीं.

" अर, कुठं रातदिस मढं गाडतोयूस ? " आबा चकित होऊन पाहूं लागला.

" अर कालपून धुंडून धुंडूनशानी हैरान झालाय जीव. तुला नव्या बाईसाब काम दितील म्हून म्हनतोय त्यो बाबा; तर तुजा पत्त्या कुठं हाए ? "

" मला नाही काम करायचं. "

" आँ ? न्हाई करायचं ? मंग हामी हिरणगांवाला ग्येलों कीं उपाशीं मर. हिथं बी भाकर न्हाई तिथं बी न्हाई. "

" चांगलं काम चालून आलंय तर करीत न्हाईस. आतां काय लहान हाएस ? न्हाई तर बिगारी काम कराया जा. "

" माझं मी पाहून घेईन. तुम्ही जा हिरणगांवाला. "

" इथं वाळूनशानी ग्येलास तरी बी भाकर द्यायाचं न्हाई कुनी. "

" मावळण देईल. "

" हां मावळण दील ! चार दिवस लाड करील माझ्या डोक्यावर ठेचाया. मी ग्येलें हिथून एकदा कीं घालवून दील."

" मग मी माझ्या हातान भाकरी करून खाईन. माझ्याजवळ असतील कीं पस्तीस रुपये. कुणी भाकरी करून देईल. नाहीं तर लगीन करून टाकीन ! बायको तर घालील खायला ? "

चांगुणा आणि गेन्या त्याच्याकडे पहातच राहिलीं.

" काय येड लागलंय काय तुला ? " अजूनही ती त्याचा तलास घेत होती.

" हो. इतके दिवस शहाणा होतों. आतां सोमवारपासून कामावर जाणार वेडा होऊन." आबा हंसत म्हणाला.

मायबापांच्या डोळ्यांतून पाणी ओघळूं लागलें. हिरणगांवच्या वाटेनें तीं निघालीं, पण अधिकाऱ्यांच्या दटावणीनें. त्यांचीं फुललेलीं अंतःकरणें आबाचें कौतुक करीत मागें मागें घोटाळत होतीं. " आबाचं लगीन आवंदा कराया होवं. " " कुनी बी पोरगी दील. " " त्यो संत्या तर कवांचा पाठीमागं

लागलाय." " त्याच्या संगं बोलूनशानी टिळा लावाया येळ मिळता तरी बरं होतं. " " अग दोन दिसाची रजा काढून पुढल्या महिन्याला येऊं."
" मी तुला कवाचं सांगत व्हत्यें पन तूच मनावर घेतलं न्हाईस." " जवां तवां मला बोल लावतीस ? तुजाच प्वोरगा अन् माझा न्हाईच जसा. "

मुलांच्या कौतुकापोटीं आईनें बापाला दटावायचें, बापानें माघार घ्यायची, आईला अधिकच स्फुरण चढायचें. तिनें आणखी बोल लावायचा. बापानें तो कौतुकानें झेलायचा. नेहमींचाच आवडता खेळ तीं खेळत होतीं. त्या तडफडण्यांत, कडकडण्यांत किती प्रेम ओसंडत होतें, हें त्यांचें त्यांनाच माहीत होतें. तहानेनें व्याकुळ झालेल्यांना पळीभर पाण्याची किती अपूर्वाई वाटत होती !

आबाला मास्तर म्हणून घेतलें आणि मांग-गारुड्यांतील मुलींच्या आई-बापांना पुनः आशा वाटूं लागली. संतूला आपली नामी आबाला द्यायची फार दिवसांची इच्छा, ती इच्छा मध्यंतरीं अगदींच दबल्यासारखी झाली होती. आतां पुनः त्यानें उचल केली. गेन्या व चांगुणा यांना आबाला काम लागल्याचें कोण कौतुक झालें होतें. नव्यानव्यानें मांग-गारुड्यांचीं मुलें शाळेला जाऊं लागलीं. अनेकांना कॉंग्रेसच्या राज्यांत नोकरी लागण्याची आशा वाटूं लागली. पूर्वीं ख्रिस्ती शिक्षक होते तेव्हां ते रागावले तर मुलें हंसत नसत, बोलत नसत, भीत. पण आबा त्यांच्यांतलाच. कितीतरी मुलें त्याला 'अरे' 'तुरे' हांक मारीत. कित्येक त्याच्या बोलण्याला जुमानीत नसत. त्याचा वचक कमी असे. आबाला या गोष्टीचा त्रास होई. त्यामुळें तो इतरांपेक्षां अधिक कडकपणें वागे. त्यांच्यांतच तो रहात असल्यानें, कोण मुलें कशीं शाळा चुकवतात, हें त्याला लवकर उमगत असे. कोण पालक पळपुट्या मुलांना कसे सामील होतात हें त्याला कळे. या सर्वांचा परिणाम विचित्रच झाला होता. आबाला जागा मिळाली याचें कौतुक असूनसुद्धां बहुतेकांना वाटे, " आबा काय शानपन सांगनार ? " आपुलकीच्या पोटीं त्याची किंमत कमी वाटत होती. पण आबाला महत्त्वाकांक्षा होती. 'इतर शिक्षकांपेक्षांही माझें काम चोख झालें पाहिजे. मलाच खरी आस्था आहे या लोकांबद्दल. आलेली संधि मी दवडणार नाहीं.' आबाबरोबरच राईला—सोम-दत्ताच्या बहिणीला चोर-वस्तींत मास्तरीण म्हणून घेतलें होतें. चोर-वस्तींत

कोणीच ओळखीचें नाहीं, तेव्हां साहजिकच सोमदत्ताचा मित्र म्हणून राई आबाजवळ बोले. त्यांतून बोलायला विषयही पुष्कळ. दोघेंही या धंद्यांत नवीं. आपल्या वर्गाचे अभ्यास, मुलांची हजेरी, नवे प्रयोग, असलें किती तरी बोलायचें असे. राई मांग जातींतील खरी. पण मोठमोठ्या लोकांच्या गोष्टी ऐकून तिला वाटे मागासल्या लोकांनीं सुधारावें. आपण त्यांना मदत करावी. तिला चोर-वस्तींतील नोकरी म्हणजे मोठें थोरलें काम करण्याची सवड असें वाटत होतें. आबा तिच्याशीं बोलायला लागला कीं तो हीं स्वप्नें पाही. ती चोर-वस्ती शिकवून सुधारून रयतेसारखी करण्याचीं तीं स्वप्नें असत आणि त्यांत राई त्याच्याबरोबर चाललेली तो पहात होता. राईही किती तरी आपुलकीनें त्याच्याशीं बोले. तें सारें आठवीत त्याचें मन हलुवारपणें तरंगत राही.

● ● ●

## ४९

सुटीचा—आनंदाचा दिवस होता. आबा आणि त्याची मित्रमंडळी चोर-वस्तीच्या क्लबांत गेली. आज पत्ते, कॅरम, रेडिओ—भरपूर करमणूक करायच्या इराद्यानेंच ते सर्व जण गेले होते. क्लबमध्यें मॅनेजर, फौजदार, पोलिस—इन्स्पेक्टर बसले होते. पत्त्यांचा डाव ऐन रंगांत आला होता. ही मित्रमंडळी आंत गेली. पट्टेवाल्याजवळ पत्ते मागूं लागली. पट्टेवाल्यानें साहेबांजवळ आहेत म्हणून नुसती डोळ्यांनीं खूण केली.

" कॅरम कुठें आहे ? " एकानें विचारलें.

" फौजदारसाहेबांच्याकडे. " पट्टेवाला म्हणाला.

" अन् रेडिओ ? " दुसऱ्यानें विचारलें.

" मॅनेजरसाहेबांकडे. " पट्टेवाल्यानें हळूंच सांगितलें.

आबाला चीड आली. तो मोठ्यानें म्हणाला,

" घरीं ! मॅनेजरसाहेबांच्या घरीं ! " पट्टेवाल्यानें मान हलवली. पण मॅनेजरसाहेबांचेंही आबाकडे लक्ष गेलें.

" काय ? काय ? " म्हणून पत्त्यांतून मान काढून त्यांनीं विचारलें.

आबा—इथें कॅरम नाहीं, रेडिओ नाहीं. लोकांनीं खेळायचं काय इथं ?

आबानें नरमाईनें आश्चर्य दाखवलें. पण त्या सर्वांचाच पारा एकदम चढला.

फौजदारसाहेब एकदम म्हणाले, "अरे का रे! तुम्ही लोक क्लबांत येऊन गोंधळ माजवतां? दिसत नाहीं का इथं हापिसर बसले आहेत?"

आबा मनांत चिडला होता, पण शांत निश्चयी स्वरांत तो म्हणाला, "हा क्लब चोरवस्तींतील लोकांसाठीं आहे. त्या दिवशीं सर्वांदेखत तुम्हीं सांगितलं आणि आतां तुम्हीच इथें बसून आम्हांला बाहेर काढतां?"

पो. इन्स्पेक्टर—फार शहानपन करूं नको. कुना म्होरं बोलतोस? तुला हवं तर मास्तर म्हून येऊनशानी बसत जा. कुनी 'नग' म्हनत न्हाई. समद्यांना कशाला इथं घोळांत टाकतुस!

आबा—मास्तर म्हणून नाहीं, चोर-वस्तींतला माणूस म्हणून मी आलों आहें आणि हे माझे भाईबंद खेळायला आले आहेत.

फौजदार उठले. त्यांनीं आबाच्या खांद्यावर हात ठेवला. "चल जा बाहेर. बोबल त्या लालबावट्याकडे जाऊन जा." आबाला त्यांचा हात हिसकून टाकण्याची इच्छा होती. पण त्याच्यानें तें झालें नाहीं. तो बाहेर जाण्याआधींच इतर पोरांनीं पाय काढता घेतला होता. आबा दारांत उभा राहून म्हणाला,

"इथं पाटी लावा चोर-वस्तींतील लोकांसाठीं हा क्लब नाहीं म्हणून." पुढचें ऐकायला तो उभाही राहिला नाहीं.

चोर-वस्तीसारख्या शहरापासून तुटून पडलेल्या रूक्ष वस्तींत, रात्रंदिवस कामें करून विटलेले ते अधिकारी, पुनः आपल्यापुढील पत्ते उचलून खेळूं लागले. त्यांनीं आबाला एक दोन अपशब्द बोलून समाधान मानलें.

त्यांनाही तेवढीच करमणूक होती. रेडिओ, ग्रामोफोनसारखी कोणतीहि वस्तू घेण्याचें त्यांपैकीं कुणालाही सामर्थ्य नव्हतें. करमणुकीच्या बाबतींत चोर वस्ती इतकेंच रूक्ष जीवन तेथील अधिकारी कंठीत होते.

रूक्ष जीवनांत डोळ्यापुढें दिसणारी हिरवळ डावलणें त्यांना शक्य हो नव्हतें. अधिकाराच्या जोरावरच तेथें सुखानें वावरणें त्यांना शक्य होतें आ ते सारे त्या जोरावर वावरूं लागले.

• • •

## ५०

रात्रीचा अंधार पडत चालल्याने चंद्राचें फिकट चांदणें दिसायला लागलें होतें. नामी घाबरत घाबरत धावत आबाच्या मावळणीकडे आली. आबाची मावळण आणि नवरा कोणाच्याशा झोपडीकडे गेलीं होतीं. संतू घरांत नव्हता. आबा एका कांबळ्यावर पडला होता.

" जाईबाय, जाईबाय. "

" जाईबाय नाहीं इथे. " आबा उभा रहात म्हणाला.

" मला बया लई भ्या लागतं. "

" काय झालं ? "

" काई किडुक ग्येलंसं वाटतंय. सोबत करताय् जरा ? "

आबा काठी घेऊन उठला. नामीच्या पाठोपाठ गेला. नामीनें चिंध्या पेटवल्या. झोपडींत पाहिलें. कुठे कांही नव्हते. ती आबाच्या अंगाला एक दोनदां घासटली. आबा दूर झाला. त्याला वाटलें सहज झाले सारें.

आबा—हट्, कुठ काय आहे ? उगीच भीति वाटली तुला, नामे.

नामीहि हंसून म्हणाली, " सर्रर्र वाजलं, तवा म्हटलं किडुकच हाए जणुं."

आबा जायला निघाला. नामीनें दरवाजांत आडवा हात धरला.

आबा—हें काय ?

नामी—समजलं न्हाई जनूं. इतके दीस जीव लावुनशानी बसल्यें तर पघतोस पन बोलत न्हाईस. असं र काय करतुस ?

आबा—काय बोलायचं ?

नामी—ह्ये मी सांगाया होवं ! तुझ्यासाठीं रोज येनीफनी करत्यें. अंगावर पानी घेत्यें. तूं पघत न्हाईस ?

नामीनें डोक्यावरचा पदर गळूं दिला होता, तो सांवरला नाहीं. खांद्यावरचा पदर सरकला, तोही सांवरला नाहीं. आवाजांत विलक्षण मृदुता आली होती. ती मधूनच आबाच्या चेहऱ्याकडे पाही आणि तिची नजर

जमिनीवर खिळे. आबा नामीकडे पहात होता. खरेंच ती नीटनेटकी दिसत होती. तिनें वेणी घातली होती...त्याच्या आईने अशीच वेणी घातली होती त्या दिवशीं. सोजिरांच्या बराकीपुढें झाडतां झाडतां...आणि तो मनानें पुनः सगळें पाहूं लागला. आणि स्वतः कुठें आहों हेंही विसरला. त्याला नामी दिसेनाशी झाली. चीड आली.

तिनें त्याच्या खांद्यावर हात ठेवला. "पहातुस इकड का न्हाई ?"

आबा—बघतों कीं मी. पण बघून काय करायचंय ?

नामी—काय करायचं ? अन् बाकी मरद काय करत्यात रे ?

जमिनीवरून त्याच्याकडं नजर लावीत ती म्हणाली.

आबा—नामे, मी तुझ्या बापाला सांगितलं आहे. मला लगीन करायचं नाहीं.

नामी—लगीन करायचं न्हाई ? मंग ? असाच -हानार हाइस व्हय ?

आबा—आता नाही करायचं. अजून कांहीं वर्षं अवकाश आहे.

नामी—मंग मला बी वरीस हाए अजुनी.

आबा—जाऊं दे मला, नामे.

नामी—जाऊं द्ये ? कोन मरद हाएस, का हाएस तरी कोन ?

त्वेषानें नामीनें आबाचा हात धरला. आबाच्या अंगांतून विलक्षण चमक निघून गेली. त्यानें हात हिसडून सोडवून घेतला. तो बाहेर जाऊं लागला. कसली तरी विलक्षण भीति त्याला वाटत होती. जणुं आजपर्यंत मनानें घातलेले बांध नामी ठोकरीनें उडवून लावीत होती.

"माझ्या गळ्याची आन हाए तुला. जाऊं नग." सगळा दरवाजा अडवीत नामी उभी राहिली.

"नामे, वेडी आहेस का ? असं करूं नको. आपलं लग्न झालेलं नाहीं आणि मी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं. जाऊं दे मला. तुझ्याशीं कुणीहि लग्न करील अन् तूं सुखी होशील. अशाने तुझं बदनाम अन् माझंही होईल."

"न्हाई. मी तुला सोडूनशानी जाऊं कुठं ? आज सा मयिनं मी तुझ्याकडं डोळं लावूनशानी बसल्यें." नामीनें त्याच्या खांद्यावर मान टाकली. ती त्याला बिलगली. आबाला सुचेना. त्यानें तिला दूर ढकललें. तिनें त्याला जवळ ओढलें. त्याला विलक्षण शिसारी आली !

नामी उपहासानें म्हणाली, "हां. आतां ध्यानीं आलं. तूं मरदच न्हाईस. असा भागूबाईवानी पळत्योस ! शीः ! शीः ! मलाच लाज वाटती. म्यां मन ठिवलं त्यें जवानावर बी न्हाई ठिवलं."

आबाला चीड आली. त्यानें नामीला खसकन् ओढलें. तिचा पदर हिसकला. सारें रक्त जणु मस्तकाकडे धांवत होतें. छेः तो नेहमींचा विचार करीत राहणारा आबा नव्हताच. त्याला सैतानानें जणुं झपाटलें. विचार दूर पळून गेला. वासना नागिणीसारखी फणा उभारून उठली आणि नामीच्या आव्हानाला त्याच्या वासनेनें उत्तर दिलें. नुसता सूड ! तो उठला. त्या खालीं पडलेल्या बीभत्स गोळ्याकडे त्यानें तिटकाऱ्यानें पाहिलें. नामीच्या डोळ्यांतून पाणी ठिबकत होतें.

"ह्ये इमानाचं काम न्हाई आबा." नामी चटकन् सांवरली. संतूचे शब्द ऐकतांच आबाच्या हृदयांतून चमक उठली. तो एकदम मागें वळून पाहूं लागला. संतू त्याच्याकडे पहात होता. आबा जायला निघाला.

"जातुस कुठं भागुबाईवानी ?"

"भागुबाईवानी ? मर्दासारखा चाललों आहे."

"शरम वाटती का काई ?"

संतूने आपल्याला मारलें कसें नाहीं, याचें आश्चर्य वाटत असतांच आबा म्हणाला,

"शरम ? तुझ्या पोरीला शरम आहे का कांहीं ? साप निघाला म्हणून सांगून इथं आणलं, अन्—"

"अन् काय ?" संतू चार पावलें पुढें सरला.

"तिलाच विचार. काय ? आतां कां दांतखिळी बसली तुझी ?"

"यानंच माझ्या अंगावर हात टाकलाय्. मी इथं बसल्यें व्हत्यें तर आला आंतमंदी."

"नामे !" आबा चिडून ओरडला. "हलकट साली !"

"शिया द्यायाचं अन् वराडण्याचं काम न्हाई. माझ्या प्वारीची अब्रू अशी चवाठ्यावर पडली न्हाई. ए शाम्या, ए चंद्या, कल्या, धांवा !" संतूच्या ओरड्याबरोबर मांग-गारुड्यांचीं दहा माणसें जमलीं. आबाची मावळण आणि तिचा नवराही धांवला. अजूनही संतूनें हात उगारला नाहीं याचें

आबाला आश्चर्य वाटत होतें. संतू बडबडत होता. " आतां याला मॅनेजरापुढें उभा करतों. मी न्हाई बघुनशानी माझ्या प्वारीवर हात टाकतोय."

कल्या—अर जा. आबा असं कंदीबी करायाचा न्हाई. तुझी प्वारच फारा दिसापून वळाखतोंय ना मी !

पण आबा कांहीं बोलला नाहीं. त्याचें मस्तक सुन्न झालें. त्याला सगळ्यांच्या नरडीला झोंबायची इच्छा होती. सगळ्यांच्या नजरांनीं तो शरमला होता.

संतू—आतां बऱ्या बोलानं लगीन कर माझ्या पोरीसंगं; न्हाई तर तुझा मुडदा पाडतों.

आबाचे डोळे भरून आले.

आबा—माझा मुडदा पाडायचा आहे ना ? पाड, मुडदा पाड !

आबा छाती पुढें करून संतूपुढें उभा राहिला. संतू त्याच्या अंगावर धांवून गेला. चार जणांनीं आबाला मागें खेंचला. कांहींनीं संतूला खेंचला. आतां संतू कल्याकडे वळून म्हणाला, " बोल, तुझी वानी कां बंद पडली ? आता माझ्या प्वारीचं काय करतुस त्ये कर. न्हाई तर बघ सायबाकडे जातुया आता. "

आबा—चल. साहेबाकडे चल. साहेबाची काय भीति आहे ? सांगेन मी काय सांगायचं तें. नोकरी जाईल, या पलीकडे साहेब काय करतोय माझं ! चल.

आबानें संतूचें मनगट धरलें. आणि मग काय झालें कोण जाणें. संतूने एकदम पड खाल्ली.

" अर, मॅनेजराम्होरं कशाला जाया होवं ! क्येलंस त्ये लई वंगाळ क्येलंस. लगीन करीन म्हून म्हन. मंग हामी बी मिटूनशान् टाकतों. "

' जाणून बुजून संतूच्या सांगीवरून मला नामीनं बोलावलं असेल काय ? ' आबाच्या मनांत शंका आली. संतू बडबडत होता. शिव्या देत होता. पण तो मारायला उठला नाहीं. ' एकूण लग्नासाठीं हा पेंच टाकला होता ! बापाच्या संमतीनें मुलीनें माझ्यावर तोहमत आणली ! ' आबाला किळस आली. ' पुरुषाची अब्रू बाईला घेतां येते तर !' तो नामीच्या झोपडींत होता. आपल्या पायांनीं तेथें आला होता. नामीनें त्याच्यावर किटाळ आणलें तरी

कुणाचाही त्याच्यावर विश्वास बसणार नाही. त्याला सारें सागायची इच्छा होत होती आणि सगळे बडबड करीत असतां, एकाद्या पुतळ्यासारखा तो उभा राहिला.

शेवटीं कल्या म्हणाला, " त्याच्या बापाला बोलवून टिळा लावूनशानी टाकूं. मंग तर झालं ? "

नामी ! अगदीं किळस आली होती त्याला तिची ! आणि त्याचें लग्न ठरविण्याची भाषा मावळणीचा नवरा बोलत होता. आबा तरीही बोलला नाहीं. त्याच्या पगाराच्या लोभानें आज हा हिडिस प्रसंग त्याच्यावर आणला होता. 'मॅनेजर तरी माझ्यावर विश्वास ठेवतील ? आणि नव्या बाई ? मग केवळ यात पकडला गेलों म्हणून नामीशी लग्न करायचं ?' त्याला भानच नव्हतें. त्याचे भवितव्य लोक परस्पर ठरवीत होते आणि तो असहायपणें ठरवूं देत होता.

पण या सगळ्या प्रकाराची बातमी चोर-वस्तीभर पसरली. मॅनेजरांच्या कानावरही गेली. त्या रात्रीं हपिसरासमोर मांग-गारुडी पंच लोक जमले. आबाही त्यांत आणला गेला होता. तो कांहीं बोलला नाहीं. त्याची मावळण आणि कल्याच आबाबद्दल बोलत होतीं. नामीनें आबाला कसा कैचींत धरला, हेंही त्यांनीं सांगितलें, पण संतू आणि त्याचे सोबती गिल्ला करूं लागले. मॅनेजरसाहेबांना कोणत्याच गोष्टींनीं धक्का बसला नव्हता. 'वस्तींत हें असेंच चालते. पंच काय तें ठरवतील' हा त्यांना अनुभव असावा.

" गेन्याला आणि चांगुणाला बोलवून घेऊं आणि मग टिळा लावून टाका." असा सल्ला त्यांनीं दिला. पंचांनीं हाच सल्ला दिला.

● ● ●

# ५१

रजा घेऊन आबा आईबापांना भेटायला गेला. पण त्या आईबापांकडे बघून त्याचें दुःख कोठल्या कोठें लपलें. हिरणगांवचा तलाव बांधून गगनवाडीच्या रयतेचा पाण्याचा दुष्काळ नाहींसा करण्याचा खटाटोप चालला

होता. पण त्या रयतेला पाणी देण्याच्या प्रयत्नांत शेंकडों मजुरांचे जीवनाचे झरे आटत होते. ते सारे मजूर, त्यांच्या बायका आणि मुलें अस्थिपंजरशीं उभीं होतीं. कोणी दमेकरी धांपा टाकीत होते. कोणी तापानें फणफणत बेभान होऊन पडले होते. तीं त्यांच्या सोईसाठीं उभीं केलेलीं पालें माणसांच्या हीन वृत्तीही लाजतील, इतकी हीन होतीं. एका माणसाच्या डोक्यावर पांघरूण घ्यावें, अशीं तीं पालें. सगळीं उघड्यावरच झोंपत. ना कपडा ना पांघरूण.

रोजमुरा दोन दोन आणे. लढाईची धुमश्चक्री. महागाई मी म्हणत होती. दोन आण्यांत मुठभर तांदूळही मिळत नव्हते. उपासाने श्रमून पोरें थोरें पेंगलीं होतीं. तेथें एकही दुकान नव्हते. होतें एक दुकान तें उधारीला कंटाळून उठून गेलें आणि मग दोन दोन आण्याच्या तांदुळासाठीं, ज्वारीसाठीं, शहरचा दहा मैल रस्ता काटूं पहाणारीं अस्थिपंजरें मातकाम संपल्यावर रस्त्याच्या कडेकडेनें पावलें टाकीत तिडबिडत शहराकडे जात नि परत येत. कांहीं कामानें उपाशीं बेभान पडत. कांहीं शेजारच्या झाडांचा पाला तोडून वाटीत. त्यांत तें चिमूटभर धान्याचें पीठ कालवीत आणि ते कडू उंडे स्वतःच्या नि मुलांच्या पोटांत कोंबीत.

आबा आला तेव्हां कोणी पोटांत उठणाऱ्या कळांनीं विवळत होते. कोणा पोराथोरांचीं आंतडीं रक्त गाळीत बसलीं होतीं. तें सारें दृश्य पाहून आबा स्तंभित झाला. त्याला रडूं येईना. अश्रूंना द्वेषानें जणुं बांध घातला होता. समोर उभ्या असलेल्या त्या पुष्ट अधिकाऱ्याचें नरडें धरून दाबावें, असें त्याला वाटलें. शेंकडों मजुरांना कामाला लावून, बेकारी नाहींशी केली, हा टेंभा मिरविण्यासाठीं आणि स्वतःच्या पगारांत वाढ होण्यासाठीं, वंगडींनीं शेंकडों जीव चिरडून टाकायला आणले होते.

आबा कठोरपणें तें पहात होता. आणि कठोरपणें विचार करीत होता. तो नामीबद्दल बोलायला आला होता. आतां त्याला वाटलें, हे शेंकडों लोक अन्यायाखालीं जें मरण मरणार आहेत, त्यापेक्षां नामी गळ्यांत पडून ओढवणारें माझें मरण घोर नाहीं. तो नामीबद्दल एक शब्दही बोलला नाहीं.

उपाशीं पोटीं कळावणाऱ्या त्या पोरांत त्याचीं भावंडेंही होतीं. डोळ्यांत मरणाच्या सांवल्या पडल्या होत्या. त्याच्या भावंडांना नि त्याच्या आईबापांना त्यानें अन्न दिलें असतें. पण बाकीचे शेंकडों जीव ?

चोरांपेक्षांही चोर असलेले ते अधिकारी. त्यांना न्याय शिकवण्याला कोणता कायदा उपयोगी पडत नसला तर त्यांचा जीव कां घेऊं नये, हाच विचार त्याच्या मनांत फुंफाटत होता.

या सगळ्या लोकांना पुनः पानवडला पाठवा म्हणून सांगायला तो निघाला. अत्यंत शांतपणें तो हिरणगांवच्या नायंपल्ली मॅनेजरांजवळ गेला. पण आंत ज्वालामुखी पेटला होता. मॅनेजरसाहेब चहा, पाव, लोणी, फळें खात बसले होते. 'तें सारें ताट उधळून द्यावे का? का येथेंच गळा दाबून प्राण घ्यावा?' पण तो म्हणाला, "साहेब, इथें लोकांचे फार हाल चाललेले दिसतात."

"अरे हाल कसले? लेकांना काम करायला नको! आळशी! दिवस अन् दिवस खणतात, पण दोन आण्यांचं काम पुरं होत नाहीं."

"साहेब त्यांना उपाशीं पोटीं काम करवत नसेल. त्यांचा रोजमुरा वाढवला तर पोट भरेल अन् कामही होईल."

"रोजमुरा वाढवायचा? अरे मजुरांचं कंत्राट आम्हीं घेतलं. तेव्हां कांहीं हिशोब केलाच असेल का नाही? आणखी रोजमुरा: वाढवला तर फायदा काय होणार? आधीच टेंडर टाकलं ते इतकं कमी किंमतीचं टाकलं! त्याच्याखाली कुणीं कंत्राट घेतलंच नसतं."

"मग साहेब तुम्ही तरी कशाला घेतलं? कमी पैशांत कंत्राट घेतलं अन् इकडे लोक उपाशी मेले तर उपयोग काय?"

"उपाशीं मेले? अरे तिकडे पानवडांत बेकार हिंडत होते. इथें माणशीं दोन आणे म्हणजे एकेक कुटुंब दहा दहा आणे रोज मिळवतंय."

आबा उठला. कांहींसा अपमान करण्याच्या बुद्धीनेंच तो एकही शब्द न बोलतां गेला. खोलीबाहेर मॅनेजराचीं तुस्त पोरेंही त्याच्या नजरेंत खुपत होतीं.

त्या रात्रीं त्यानें आपल्या खिशांत होते नव्हते तेवढे पैसे गेन्याजवळ दिले. चांगुणा रडूं लागली. गेन्या रडूं लागला. तीन पोरें रक्त ढेंढाळत होतीं. आईबाप तीं मरूं नयेत म्हणून नवस सांगत होतीं. आतां खिशांत पैसे होते. पण ते चावून खातां येत नव्हते. पुढ्यात होता पाला नि चिमुटभर पीठ.

आबाच्या डोळ्यांतील पाणी आटलें होतें. तो त्वेषानें दांत-मुठी आंवळीत सारें पहात होता. दुसरा दिवस उगवला. पोरें मरायला टाकून आईबाप कामावर गेली. आबा मिळवता म्हणून त्यांना माघारी जातां येणार नव्हतें, कारण गेन्या हजेरी-तारवाला होता.

काम चालू होतें. कपार खणली जात होती. माणसांच्या घामाच्या धारा त्यांना ओलावा आणीत होत्या. माणसांचीं हाडें न तुटतां दगडाचीं छकलें उडत होतीं. मॅनेजर नायंपल्ली ओरडत डाफरत देखरेख करीत होते. ते खालीं खड्ड्यांत बसले होते. आबा मेरेमेरेनें जाऊन वर उभा राहिला. कुणाचें लक्ष नव्हतें. सगळे आत खोल खड्ड्यांत काम करीत होते. आबा गडबडला नाहीं. निश्चयानें तो बाजूला झाला. पायाखालची मोठी धोंड त्याने नीट पाहिली. खालीं खड्ड्यांत मॅनेजरसाहेब उभे होते. ते ओरडले, " साल्यांनो, पगार कमी म्हणून ओरडतां ? काम करायला नको ! मरून जायच्याच लायकीचे आहांत XXXX तुम्ही ! " आबाने वरची शिळा खाली ढकलली. तो वेगानें दूर गेला. खालीं हलकल्लोळ उडाला. आबा त्वरेनें गेला. तो आईबापांच्या पालांत जाऊन आडवा पडला.

सगळीकडे आशंका. घबराट. धांवपळ झाली. एक मोठा अधिकारी माणूस मेल्यानें, बडेबडे अधिकारी पानवडहून आणि गगनवाडीहून चौकशी-साठीं आले. नायंपल्लींचें प्रेत तेथें पडले होतें. आबाची तीन भावंडे तेथून दहा पावलांवर पालाशीं मरून पडलीं होतीं. नायंपल्लीचीं बायकापोरं रडत होतीं. दहा प्रतिष्ठित लोक त्यांचें सांत्वन करीत होते आणि आबाचीं तीन भावंडें उपाशीं-पोटीं, क्रूरतेनें मेलीं, तीं कोणाच्या खिजगणतींतही नव्हती. त्यांच्याशीं बसून रडायला आईबापांचेही अश्रू भ्याले होते. आटले होते.

आबा दोन्हीं दृश्यें पहात होता. त्याला कींव नव्हती. त्याला अंतःकरण नव्हतें. तिन्हीं भावंडांना मूठमाती देऊन तो पुनः पानवडला आला.

● ● ●

# ५२

आबाला एकटेपणाची भयंकर भीति वाटत होती. नायंपल्लीचे प्रेत त्याला सारखें सतावीत होतें आणि 'वरून दगड पडून ॲक्सिडेंट झाला.'—ही त्या प्रेताभोंवती जमलेल्या हपिसरांची भाषा तो पुनः पुनः आठवी. त्याला क्षणभर स्वस्थ वाटे. पण दुसऱ्याच क्षणीं पुनः त्याला कांपरे भरें. कुणी पाहिल असलं तर? चुगली केली तर? त्याला कुजबुजणाऱ्या माणसांची विलक्षण भीति वाटूं लागे.

फाटल्या मनाने तो वावरत होता. त्याचे कशातही लक्ष लागेना. सोबती दूर दिसला तरी त्याला भीति वाटे. "मी बोलणार तर नाही?" आणि तो दूर दूर जाई. त्याला माणसांची भीति वाटत होती आणि माणसाच्या सहानुभूतीसाठी तो वेडा झाला होता. तो भीतीनें दूर दूर, एकटा एकटा हिंडत होता आणि अंतःकरण ओतण्यासाठी त्याला मायेच्या माणसाची भूक लागली होती.

आबाच्या शिणलेल्या मनाचे विलाप मायेनें समजूं शकेल असें माणूस असतें, तर आबा धांवत जाऊन धाय मोकलून रडला असता. तसें रडण्यासाठी त्याचे मन आधार शोधीत होतें. त्याला समजवणारें कोणी नव्हतें; पण नव्हते कसें? त्याला एकदम राईची आठवण झाली. तिला गेल्या पाच सहा दिवसात त्याने पाहिलें नव्हतें आणि त्याला न कळता तिला भेटण्यासाठींही मन व्याकुळ झालें होतें. ती नामी, तो संतू, सगळे मांग-गारुडी त्याच्या नजरेसमोर वावरत होते. संतू जिंकल्याच्या आनंदांत होता. आतां साळसूदपणें तो त्याच्याशीं बोलायला येत होता. आबाच्या पैशाची ऊब त्याला मिळाली नसली तरी केव्हां तरी ती मिळणार ह्या आशेनें संतू-नामी आनंदलीं होतीं. आबा त्यांना टाळीत होता. आणि जसजशी नामीबद्दल किळस वाढत होती, तसतसें त्याचें मन राईसाठीं अधिकच आसावलें होतें. त्याला तिच्याशीं खूप बोलायचें होतें. शाळा सुटली. राई आपल्या घरीं जायला निघाली. रस्त्यांत सहज भेट झाल्यासारखा आबा तिला भेटला. तिलाही आनंद झालेला त्याला दिसला.

" ऑं ? किती दिवसांनीं भेटतांय. रजा काढून गेलां होतां ? "

" होय." हिला सगळे कळले तर नसेल ? आबाला कसेसेंच वाटत होतें. तो तिच्या नजरेत शोध घेत होता. आणि त्याची खात्री झाली. साऱ्या चोर-वस्तींत त्याच्या आणि नामीच्याबद्दल चर्चा चालली होती. ती राईला कळल्याखेरीज राहिली नसेल. पण राईने ओळख कां दिली नाहीं ? ती नेहमींच्यासारखीच हंसतमुखानें लाजत, धिटावत बोलत होती. मींच सगळं सांगितलं तर ? हो. आपल्या माणसाजवळ आपणच सांगितलें पाहिजे. पण ही राई खरंच आपली आहे का ? तो पाहू लागला. ती त्याच्यापेक्षां वयानें थोडी मोठीच होती. सोमदत्तासारखा तिचा भाऊ. रोजचीं ग्रोल्गींगुद्रां किती निराळी होती त्यांच्या घरांत. तीं आंबेडकरांबद्दल बोलत. गांधीजीं-बद्दल बोलत. वर्तमानपत्रे वाचीत. ही राई आमच्यासारखी नाही. पण मी तिच्यासारखा आहे. तो मुकाट्यानें तिच्याबरोबर चालला होता आणि त्याचें मन भरकटत होतें.

" आज बोलत नाहीं आबा तुम्ही ? " तिनें त्याच्याकडे पाहून विचारलें. त्या शब्दांना उच्चारणारा तिचा आवाज किती निराळा ! त्या आवाजानें आबा गाईंवरून आला.

" किती तरी सांगायचं आहे. पण तुम्हांला काय वाटेल कोण जाणे ? "

राई त्याच्याकडे पाहूं लागली. त्याला वाटे, तिला हात धरून खालीं बसवावी. तिच्या मांडीवर डोकें ठेवून रडावें. त्या नजरेंतील आर्द्रता त्याला सहन होईना. तो एकदम म्हणाला,

" राईबाई, तुम्हांला मी बरोबर आलों तर भीति वाटत नाहीं ? "

" नाहीं."

" नाहीं ? असं कसं ? "

" बया ! असं काय बोलताय आज ! "

" मी वाईट आहें. वस्तींतल्या एका पोरीची अब्रू घेतली मीं ! आणि आईबापांना भेटायला गेलों तिथें—"

राईच्या तोंडून शब्द फुटेना. ती आश्चर्यानें, भीतीनें त्याच्याकडे पाहूं लागली. पण आबानें वाक्य संपवलें नाहीं. ती गोष्ट त्याच्याखेरीज कुणाला ठाऊक

नव्हती. ती कळली तर तो फांसावर चढेल! भीतीनें त्याची नजरसुद्धां पालटली. त्याची ती भित्री नजर पाहून राईला आश्चर्य वाटले.

" आबा ! "

तो भानावर आला. त्याने जणुं विचार झाडून टाकण्यासाठीं मान गदगदून झटकली. तिच्याकडे पाहून तो हंसला.

" तुम्हांला भीति वाटत असली तर मी परत जातो."

क्षणभर राई बोलली नाहीं. " तुमचं मन चळलंय् आज."

" मला वेड लागलंय."

" काय झालं आबा ?

अजूनही तिच्या शब्दांतील माया कमी झाली नाहीं तर !

" सांगूं ? "

आणि तीं दोघें एका बाजूला झाडाखालीं बसली. आबानें ओशाळत, शरमत कांहींसें सांगितलें. राई ऐकत होती.

" सगळा पैशासाठीं चावटपणा केलाय त्या पोरीनं, अन् तिच्या बापानं." त्वेषानें ती म्हणाली. " कितीक पोरी करतात असं."

" राईबाई ! " त्यानें भरल्या नजरेनें राईकडे पाहिलें. एका तरी माणसाला कळलं तर माझं मन ! राईनें त्याच्या हातावर हात ठेवला अन् चटकन कसल्याशा जाणीवेनें काढून घेतला. तो हंसला. तिनें ओशाळून नजर फिरविली.

" आज मला कुशींत घेतलं कुणी तर ! लहान पोरासारखं निजावंसं वाटतंय् मला."

राईनें आपले दोन्ही हात पुढें करून ओंजळींत त्याचे हात धरीत हंसत म्हटलें, " इथें माय नाहीं तुमची. उठा." ती उभी राहिली. आबाही उठला. त्याला विलक्षण शांतता वाटत होती.

" आतां मी नोकरी सोडून पळून जाणार आहें."

" काय तरी बोलतां ! "

" खरंच. नाहीं तर नामीशीं लग्न केल्याखेरीज सुटका नाहीं माझी. आणि—" पण त्याला तें सांगवेना आणि राईचेंही लक्ष नव्हतें.

राई चालतां चालतां एकदम थबकली. ती गंभीर झाली. तो ऐकूं लागला. पण ती बोलली नाहीं. तिच्या जातींत शिकलेलीं माणसें नव्हतीं आणि ती जेव्हां जेव्हां विचार करीत शोध घेई तेव्हां तिला उदास वाटूं लागे. आंवतीं भोंवतींच्या अक्षरशत्रु माणसाशीं लग्न करून संसार करण्याची कल्पना तिला भयंकर वाटे. तिचा सोमदत्त म्हणे,

" राई, आपन मांगांनी डोकं वर काढलं पाहिजे. तुला मुंशीपालटीत निवडून आनूं; मंग आपल्याला लोकांचं भलं करतां येईल."

आणि ती सोमदत्त ' शीक ' म्हणाला म्हणून शिकली. मास्तरीण झाली. पण तिचे पुढले आयुष्य वळणाला लावण्याला तिला सोमदत्ताचा उपयोग होत नव्हता. तिला एकोणिसावे वर्ष होते. आबा तिच्यापेक्षां कांहीं महिन्यांनीं लहान होता. तिचे मन कुठल्या वाटा तुडवीत येई आणि शेवटीं आबा-भोंवतीं विसावे. आज तिचें मन भरून आलें होतें. तरीही तें सावध होतें. आबा चांगला आहे. आबाची तळमळ, कळकळ तिला दिसत होती. आबाचा प्रामाणिकपणा तिला पटला होता. इतरांपेक्षां तो निराळा होता. चोर-वस्तींत कितीक उलाढाली आबामुळें झाल्या होत्या. तिला त्याचें कौतुक होतें. पण ती मांग होती आणि तो मांग-गारुडी होता. तिची जात उच्च होती आणि त्याची जात दाखलेवाल्याची होती. ती साव जातींतली होती, तो चोर जातींतला होता. या विचारानें ती नेहमींच थबके. आजही ती थबकली. गंभीर झाली. पण अनावर असें कांहीं कांहीं तिच्या मनाचे बांध फोडायला बघत होतें. ती म्हणाली,

" आबा, तुम्ही जाऊं नका. या वस्तीवर शाळेंत शिकवायास आलें पन तुमचीच सई सारखी होत असती. "

आबाच्या दुःखी अंतःकरणावर हळुवार फुंकर घातली गेली. आतां तो आपल्या माणसाजवळ बोलत होता. " मी गेलों नाहीं तर इथले लोक मला घालवतील."

" घालवतील तेव्हां पाहूं. मी आहे तंवर जाऊं नका."

" अन् तुम्ही एक दिवस निघून जाल तेव्हां ? "

" तेव्हां मी तुमच्याबरोबर येईन."

" लग्न करून ? "

आणि राईनें चोरटी नजर टाकीत 'होय' म्हटलें. आबा चकित झाला. आबाच्या विझत्या आशांना तेलवात मिळाली. दोन्ही अंतःकरणांत संकोच नि असीम आपुलकी होती. नवथर तारुण्याच्या कातरतेनें तीं दोघेंही दूर दूर उभी राहून एकमेकांकडे पहात होतीं. स्पर्शानें एकमेकांच्या पावित्र्याचा भंग करण्याला दोघेंही भीत होतीं.

● ● ●

## ५३

सरकारी मंत्र्यांचा मुक्काम एका मोठ्या गिरणीवाल्याकडे पडला होता. ते चोर-वस्ती पाहायला येणार, म्हणून चोर-वस्तींत कोण धांदल उडाली होती. मॅनेजरसाहेबांकडून रेडिओ, फौजदारसाहेबांकडून ग्रामोफोन, कॅरम् बोर्ड क्लबच्या जागी तांतडीनें आणून ठेवला. स्वच्छता, टापटीप, प्रदर्शन, सर्व व्यवस्था चोख ठेवण्यासाठीं सगळे झटत होते. चोर-वस्तीच्या लोकांच्या मदतीने सगळें होत होतें आणि चोर-वस्तींतील लोकांना या चोखपणाचा अर्थही कळत नव्हता. आबाला चीड आली. आपल्या भाईबंदांबद्दल उद्वेग वाटूं लागला. तो नेहमींचाच पाहुण्यादेखतचा तमाशाः पारध्यांचा फांसे टाकण्याचा खेळ, कैकाड्यांच्या दरोड्यांची तयारी, ताडी पिऊन बेभानपणें हाणमार करणाऱ्या चोर वस्तींतील माणसाची व स्त्रीची नक्कल, भाटांच्या पोरीचा नाच—सगळें तेंच. नेहमींचेंच. पण वस्तींतील लोकांना उत्साह चढला होता. कारण त्या मेल्या वस्तींत कधीं कांहींही करमणूक नसे. वर्षाचे तीनशेंपासष्ट दिवस आणि अशीं कित्येक वर्षें तेंच तें. धर्मसुद्धां मेल्यासारखाच होता. त्यामुळें डफाची थाप निमाली होती. देवापुढें बळीच्या रक्ताचा थेंबही गळत नव्हता. कांहीं शिल्लक राहिलें नव्हतें.

सगळे लोक जमले. मंत्री आले. खेळा—आनंदाचा तमाशा झाला. भाषणें झालीं. उपदेश झाले. सरकारनें चोर-वस्तीसाठीं किती सुधारणा केल्या आहेत, बेकारी कशी कमी केली आहे याची पुनरुक्ति झाली. आबाच्या पोटांत धडधडत होतें. भीतीनें. त्याचा रागही अनिवार झाला होता. सगळ्या

अंगांतून भीतीनें जणुं वाफा निघत होत्या. पण त्याला बोलण्याची इच्छा दाबतां आली नाही. तो मास्तर होता. त्याला कुणी अडवलें नाहीं. तो एकदम पुढे गेला. त्याला बोलतां येईलसेंही वाटेना. पुढें काय होईल याचाही विचार त्याच्या डोक्यांत आला नाहीं. तो उडत्या नसांनींच पाहुण्यांपुढें उभा राहिला आणि म्हणाला, " सरकार, मला बोलायला परवानगी द्या." आणि पाहुण्यांनी मनापासून त्याला प्रोत्साहन दिलें. इतर अधिकारी गडबडले. त्यांना ठरल्या कार्यक्रमांत आबानें आपणहून लुडबुड केल्याचा राग आला. ते चुळबुळले आणि आकुंचित नजरांनी पाहूं लागले. एकानें तर आबा मंत्र्यांशीं बोलत असतांच जवळ जाऊन हंसतमुखानें त्याला मागें ओढलें; पण मंत्र्यांनींच 'बोला' म्हटल्यावर नाइलाज झाला. आबाला नीट बोलतां येईना. तो चांचरला. उगीचच तो पाहुण्यांकडे पाही. चाचरे. उगीचच आंवतींभोंवतीं पाही. बोले. खिशात हात घाली, काढी. पण तो बोलला.

" सरकार, मी सेटलमेंटमधला आहें. मी थोडं शिकलों. सरकारनें मेहेरबानी केली. मला नोकरी दिली."

अधिकाऱ्यांना हायसे वाटलें. सरकारबद्दल आणि अधिकाऱ्यांबद्दल कृतज्ञता दाखवतो आहे ? मग हरकत नाहीं. आबा म्हणाला,

" महाराज, मी सांगतों याबद्दल माफ करा. मी चोर-जातीचा आहें, पण खोट बोलतों असं समजूं नका. इथें सरकारनें आमच्या लोकांकरतां क्लब काढला. पण त्या क्लबांत अधिकाऱ्यांखेरीज कुणाला खेळतां येत नाहीं, बसतां येत नाहीं. मी खोटं नाहीं सांगत. तुमचा विश्वास बसणार नाहीं, पण विचारा सगळ्यांना. "

अधिकारी कावरेबावरे झाले. मंत्री आस्थेनें ऐकूं लागले.

" महाराज, रागाऊं नका. माझी नोकरीसुद्धां जाईल मीं हें आपल्यासमोर सांगितलं म्हणून. पण मला रहावत नाहीं. मी गांधी बोर्डिंगांत होतों. तेव्हां-पासून मला कळतं कीं खरं बोलायला हवं माणसानं. म्हणूनच म्हणतों, सरकारने आमचा क्लब आम्हांला वापरूं द्यावा.

" सरकारनें बेकारी नाहीशी केली, पण पोटभर भाकरी दिली नाहीं. माझा आईबापं तारेंत होतीं. त्यांना काम द्यायचं म्हणून हिरणगांवला नेलं. तिथें

आठ नऊ तास काम करून, रोजाला दोन आणे मजुरी ! महाराज, दोन आण्यांत एक तरी भाकर होते का ? मी खरं सांगतो. रागावूं नका. महाराज, माझीं आईबापं अन् कितीक लोक हें असलं खातात. हें किती कडू लागतं पहा. ”

आबानें हिरणगांवचे पिठाचे आणि पाल्याचे उंडे टेबलावर ठेवले. मंत्री काळजीपूर्वक बघूं लागले.

“ महाराज, तुम्हांला हें खाऊन पहा म्हणून कसं सांगूं ? मायबाप, तुम्ही मोठे आहां. मला तुमचा अपमान करायचा नाहीं. पण मी खरं सांगतों, पोट भरेना म्हणून आमचे लोक हें खातात तिथे. पण गरीब झालों, तरी आम्हांलासुद्धां हें गोड लागत नाहीं, महाराज. मला वाटतं आमची पोटं मोठ्या माणसांसारखींच असतील. देव काय सगळ्यांना सारखंच जन्माला आणतो. माझीं तीन भावंडं रक्त ढेंढाळून मेलीं अन् आणखी कितीक लोक बीमार आहेत सरकार. आपण देव. हिथं आलांत. आम्हीं धांवा केला देवासाठी. मायबाप ! आपण हिरणगांवला जाऊन पहा. मी खोटं नाही सांगत. महाराज, बेकारांना कामं दिलीं तरी दोन आण्याचे दगड पोटांत भरून कसे पचतील महाराज ? महाराज, हे पाहिलेत अधिकारी माझ्याकडे कसे पहाताहेत ? मला वाटतं, ते मला मारतील, तुरुंगांत टाकतील, माझी नोकरी जाईल. मला भीति वाटते सरकार. माझी मरायची इच्छा नाहीं. पण नोकरी गेली तर तीन भावंडांच्या मागोमाग मलाही मराव लागेल सरकार. पण मरतांना बरं वाटेल, कीं मी बोललों मायबापाजवळ. मायबाप, माफ करा. मला पुष्कळ सांगायचं आहे. पण सांगतां येत नाहीं. ”

आबा थांबला. मंत्र्यांचा चेहरा गंभीर झाला होता. आबा जागेवर गेला. अधिकाऱ्यांच्या नजरांत सूड असला तरी पूतनामावशीसारख्या मायावी नजरांनी हंसूं हंसण्याचा प्रयत्न चालला होता. आबा थकला. तो आपल्या लोकांत जाऊन मटकन् बसला. तो घामानें पाघळत होता. मंत्री बोलायला उठले. त्यांनीं चोर-वस्तीला चोऱ्या न करण्याबद्दल उपदेश केला. संपांत सामील न होण्याबद्दल उपदेश केला आणि शेवटीं, “ तुमच्या तक्रारींची नीट चौकशी होईल, ” असें आश्वासन दिलें. त्यांनीं पुनः आबाकडे पाहिलें नाहीं. आबा थकून ताप आल्यासारखा बसला होता.

समारंभ संपला. त्याला जणुं सगळ्यांनीं वाळीत टाकलें होतें. वस्तींतील लोकांना आबा बोलला हें आवडलें. पण आबाची उघडउघड पाठ थोपट ण्याची त्यांना भीति वाटली. न जाणों, अधिकारी आबावर रागावले तर आपल्यावर रागवायचे. म्हणून त्यांनीं आबाला टाळलें. मास्तर लोकांना तर आबाबद्दल आस्था नव्हतीच. अधिकारी " बरं, पाहून घेऊं ! " या विचा-रानें त्याच्याकडे दुर्लक्ष करीत होते. आबाला वाईट वाटलें. त्याला कसलीशी भीति वाटूं लागली आणि माणसें पांगलींही नव्हतीं तोंच तो तेथून निघून गेला. त्याचें मन राईसाठीं आक्रोश करीत होतें.

● ● ●

# ५४

सारे लोक समारंभाच्या बाजूला लोटले असल्याने वस्ती ओसशी पडली होती. आबा गर्दीगर्दीनें दुतर्फा रिकाम्या पडलेल्या झोपड्यांतून जात होता. तो एकदम थबकला. " हा कोण माणूस ? " तो खिदळत होता. नामी त्याचा हात ओढीत हंसत होती. तो तिचा हात ओढीत हंसत होता. तो चोर-वस्ती-तला नव्हता. झोपडीच्या दारांतच ती खिदळत-झोंबत होतीं. आबाच्या मस्तकांतून एक चमक निघून गेली. " ही अशी आहे तर ! तिला कळलं पाहिजे मीं पाहिलं हें. " आणि तो झोपडीसमोर उभा राहिला. नामीचें लक्ष गेलें. ती ओशाळली. दुसरा माणूस मागें वळून पाहूं लागला. नीटनेटक्या कपड्यांचा ! कोण होता कोण जाणें ! आबाला पहातांच तो जाऊं लागला.

" जाऊं नका राव ! तुमचं नांव काय ? "

" तूं कोण विचारणारा ?

" मी ? मी कोण तें सांगेन मग. "

" अरे जा ! " म्हणून नव्या माणसानें आबाला ढकलून पळ काढला. आबा रागानें जळफळत नामीकडे पाहूं लागला.

" काय ग रांडे ! हे उद्योग करतेस ? असे किती आहेत आणखी ? "

"चूक झाली माझी. "

" चूक झाली ? किती वेळां झाली ? अन् आतां बापासमोर सांगतेस का नरडं धरूं तुझं ? लग्न कशाला करायला हवं माझ्याशीं ? अन् त्याच्याशीं ? बोल बोल. आतां मढ्यासारखी उभी नको राहूं. आणूं का तुझ्यांत जीव ? "

तो पुढें सरकला आणि नरडें धरल्यासारखी नामी ओरडूं लागली. लोक जमले. आबाला गय करण्याची इच्छा नव्हती. तो मोठमोठ्यानें सगळ्यांना सांगूं लागला. संतू आलेला पहाताच तो म्हणाला,

" घे घे तुझी मुलगी. आज दुसऱ्या माणसाला झोपडींत आणून झगडा घालीत होती. त्या दिवशी मला ओढलं. उद्यां आणखी कुणाचा मुडदा पाडील. अन् मला म्हणतोस माझ्या पोरीशीं लगीन कर. अरे ही काय लगीन करणारी पोर आहे का ? मुरळी साली. "

" ए, अर काय नसतीं बालाटं घेतूस ? " संतू जोरानें अंगावर आला.

" नसतीं बालाटं ? काय ग ? आता कुणासमोर हंसत खिदळत होतीस ? "

नामी—कवां ?

आबाला राहवलें नाहीं. त्यानें नामीवर हात उगारला आणि संतू ओरडत आबाच्या अंगावर गेला. त्यानें आबाच्या डोक्यांत लाकूड हाणलें. आबा निश्चेष्ट पडला. कल्या आणि मावळण धांवत आलीं. संतू आणि त्याचे लोक एका बाजूला आणि कल्या आणि त्याचे लोक एका बाजूला. धुमश्चक्री माजली. शब्दांचे फुटाणे. काठीचे तडाखे. पोलिस धांवले. मारामारी करणारांना पकडलें. आबाची इस्पितळांत रवानगी झाली. पण कोणी अधिकारी म्हणाले,

" साल्याला बरी शिक्षा झाली. मंत्रीसाहेबांच्या पुढें तक्रारी करतो ! "

● ● ●

## ५५

मंत्र्यांना आबाच्या साध्यासुध्या पण अंतःकरण हलविणाऱ्या भाषणाचा विसर पडला नव्हता. आजपर्यंत प्रजेवर अनेक रीतीनें अन्याय झाले आहेत

याची त्यांना जाणीव होती. त्यामुळें प्रजेच्या दुःखांच्या कहाण्या ऐकल्यावर त्यांच्यावर उतारा शोधून देणे हें आपले कर्तव्य आहे असें मंत्र्यांना वाटलें.

सभा संपल्यानंतर ते चोर-वस्तीच्या अधिकाऱ्यांजवळ आपल्या दर्जाला शोभेल अशा रीतीनें मोजके बोलले. पण तेवढ्यानेंही अधिकाऱ्यांना थोडें बावरल्यासारखें झालें. आणि मंत्रीसाहेब निघून गेल्यावर दोघे दोघे हळूहळू कुजबुजले ' आज आबानें साल्यानें फार चावटपणा केला. लेकाला दाखवलं पाहिजे.' असें म्हणाले.

मॅनेजर वगडीची प्रामाणिक समजूतही त्यांनीं बोलून दाखवली.

" जुन्या जमान्यात आम्ही कांही करीत नव्हतों. आता कॉंग्रेसचे मंत्री म्हणून जीव तोडून कामं करतों, यांना चोरांना कामं शोधून काढायला धडपडतों तर हे लोक जास्तच शेफारल्यासारखं करतात. "

त्या दिवशीं मंत्री निघून गेल्यानंतर एकमेकांशीं बोलून सांत्वन शोधणारे अधिकारी बाह्यतः जरी शांत झाले तरी सर्वांनाच अंतर्यामी भीति वाटत होती; कारण मंत्रीसाहेबांनी ' आपण चौकशी करूं ' असे स्पष्ट आश्वासन भर सभेंत दिले होतें.

दुसऱ्या तिसऱ्या दिवशींच मॅनेजरला जाब विचारणारें पत्र वरिष्ठ ऑफिसरकडून आले. त्या पत्रांत ( १ ) चोर-वस्तीच्या लोकांसाठीं असणारें करमणुकीचें साहित्य तुम्ही कां वापरतां ? ( २ ) हिरणगांवच्या लोकांची राहण्याची व्यवस्था नीट कां केली नाहीं ? ( ३ ) त्यांच्यासाठीं काय काय सोई आहेत ? ( ४ ) त्यांच्या रोजमुऱ्याचें प्रमाण काय ?

अशासारखे प्रश्न विचारले होते. त्या प्रश्नांचीं उत्तरें देणें हें वंगडी मॅनेजरांना मोठेंच जबाबदारीचें काम होऊन बसलें होतें. वरिष्ठांच्या प्रश्नाचीं उत्तरें बिनतोड देण्याची खटपट वंगडी करीत असतां त्यांच्या मनांतील दुःखें उलून येत होतीं.

त्यांना आठवलें; रिपन्‌साहेबांची कारकीर्द संपली आणि वंगडींची स्थिति घरावर लावलेल्या मोरासारखी झाली. जसा वारा येईल, त्याप्रमाणें एकाच ठिकाणीं गिरगिर झरझर फिरायला ते तयार झाले. असें करण्यांत त्यांना थोड्या मानसिक वेदना होत्या का ? हें सारें पोटाची खळगी भरण्यासाठीं करतांना त्यांना कितीतरी त्रास होत होता.

जो चरखा, जी टकळी, जी खादी त्यांना दृष्टीसमोर नको असल्याचा आजपर्यंतचा रिवाज होता, तीच खादी, चरखा नि टकळी सक्तीनें मुलांसाठीं आणवण्याची खटपट मन मारून वंगडींनींच केली होती. आपली कॉंग्रेसभक्ति नव्या कारकीर्दीच्या पायाशीं रुजूं करण्याचा वंगडींनीं किती कसोशीनें प्रयत्न केला होता !

त्यांना हीही भीति वाटे, कीं कॉंग्रेस आज आहे उद्यां नाहीं. मग पुनः गोऱ्यांचें राज्य. यासाठीं मधून मधून गोऱ्या कलेक्टरला कामानिमित्त ते भेटायला जात. त्या भेटींत कामाबरोबरच कॉंग्रेसच्या राज्यांत चोर वस्ती कशी शेफारली आहे हेंही कलेक्टराच्या नजरेला आणीत.

वंगडींना पुरें माहीत होतें, कीं गोरा कलेक्टर तो गोराच—त्याला कॉंग्रेस-बद्दल भक्ति वाटणेंच शक्य नव्हतें. त्याची तळमळ गोऱ्या सत्तेसाठींच. तेव्हां ती सत्ता पुनः आली, तर आपण तिची भक्ति करण्यांत मागें पडलों असें व्हायला नको.

गोऱ्या मिशनऱ्यांबद्दल त्यांना तिरस्कार वाटत असूनही वंगडी कधींमधीं चर्चच्या निमित्तानें जात नि मिशनऱ्यांना भेटत. ‘ सद्यःस्थिती ’वर मिशन-ऱ्यांना आवडेलशी चर्चा करीत. कॉंग्रेस सरकारनें हिंदूंना नोकऱ्यांत भरून ख्रिस्त्यांवर अन्याय चालवला आहे, हेंही सांगायला ते विसरत नसत. शिवाय ख्रिस्तीधर्मीयांचें सदाचरण डोळ्यांपुढें नसल्यानें चोर-वस्तीची नैतिकदृष्ट्या कशी अवनति होत आहे, हेंही ते मिशनरी साहेबाला सांगत.

इकडे चोर-वस्तींत समारंभ करून लहान मोठ्या कॉंग्रेस-भक्तांना समारंभाचे मुख्य पाहुणे म्हणून वंगडी बोलावीत.

वंगडींना दुःख होतें ते हेंच कीं, या सगळ्यांची मर्जी आपण शंभर रुपयांची नोकरी संभाळण्यासाठीं राखतों. वंगडींनाही कच्चींबच्चीं सहासात लेकरें होतीं. गोरी सत्ता, हिंदी सत्ता यांच्या वादळांत आपल्या लेकरांचें अन्न जाऊं नये हीच वंगडींची खरी काळजी. त्या काळजीमुळेंच त्यांना हा मोरासारखा नाच करावा लागत होता. त्याचें दुःख त्यांना थोडें नव्हतें. पण नोकरी म्हटलें कीं सर्वांना असेंच करावें लागतें. तरच ती टिकते, हेंही वंगडींना माहीत होतें. पण त्यांच्या या सगळ्या प्रयत्नांत आबानें त्यांचे वाभाडे काढून त्यांना ‘ लबाड ’ ठरवलें, याचें त्यांना फार वाईट वाटलें.

जी स्थिति वंगडीची, तीच सर्व लहान-मोठया ऑफिसरांची. त्या सर्वांनीं मिळून आपली बाजू बळकट करण्यासाठीं चोर-वस्तीच्या लोकांच्याच साक्षी नोंदवल्या.

"चोर-वस्तीच्या लोकांना उत्तेजन देण्यासाठींच आम्ही अधिकारी मंडळी क्लबांत बसत होतों. आमच्याबरोबर पुढील नांवांची चोर-वस्तींतील मंडळी असत." असे म्हणून पन्नासहून जास्त लोकांची नांवें व त्या मंडळींचे आंगठेही घेऊन वंगडींनी आपल्या विधानाला बळकटी आणली.

ज्या लोकांनी आंगठे दिले ते क्लबांत कधींच गेले नव्हते पण त्यांना वाटलें, "आपण आज आंगठे दिले तर मॅनेजरसाहेब आपलं भलं करतील."

रेडिओ व ग्रामोफोन, दुरुस्तीसाठीं द्यावयाचा असल्यानें अधिकाऱ्यांच्या घरी नेला गेला होता, असेही वंगडींनी लिहून कळवलें.

हिरणगांवच्या कामाबद्दल मोठें स्पष्टीकरण त्यांनी दिले.

१ हिरणगांवला कोणताही दुकानदार चार दिवसांवर टिकला नाहीं याचें कारण चोर-वस्तींतील लोक पैसे बुडवीत.

२ हिरणगांवच्या कामाचें कंत्राट जेवढ्या रकमेचें घेतलें, जेवढ्या रकमेंत दिली त्याहून अधिक मजुरी देणें परवडलेंच नसतें. कंत्राट अधिक रकमेचे घेतलें असतें तर तें काम आपल्याला न मिळतां दुसऱ्या कंत्राटदाराला मिळालें असतें. कमींत कमी रकमेचें टेंडर टाकल्यानेंच कंत्राट मिळालें.

३ पानवडला भिक्षा मागून खाण्याइतक्या वाईट स्थितींतील लोकांना, रोजी दोन आणे मजुरी हें पुष्कळच समाधान आहे.

अर्धवट शिकलेलीं चोर-वस्तींतील मुलें 'लालबावट्या'च्या नादाला लागून उमट झालीं आहेत. अधिकाऱ्यांविरुद्ध चोर-वस्तीला उठवण्याचें काम तीं करतात आणि आबा त्यांचा म्होरक्या आहे. ही वंगडींची प्रामाणिक समजूतही त्यांनीं कागदीं नोंदवून वरिष्ठांच्या कानावर घातली, आणि त्याबद्दलचे पुरावे सादर केले.

अधिकाऱ्यांच्या श्रेणीप्रमाणें वंगडींचें खुलासापत्रक चढत चढत मंत्र्यापर्यंत गेलें. प्रत्येक श्रेणीच्या अधिकाऱ्यानें त्या पत्रकावर आपापल्या समजुतीप्रमाणें शेरे मारले होते. प्रत्येकानें कनिष्ठाशीं थोडा मतभेद दाखवून पण त्याचीच री ओढली होती.

चोर-वस्तींत कामे करणाऱ्या प्रत्येक अधिकाऱ्याला तेथील आधिकाऱ्याच्या रूक्ष जीवनाची चांगली कल्पना होती. नजरेपुढे कोणतेंही सुंदर दृश्य नाहीं. सारख्या तक्रारी-तक्रारी. चोर-वस्तीतील कचकच, वटवट, तक्रारी, भानगडी —चौवीस तास तेच. चौवीस तासांत कधी काम संपल्याचे समाधान नाहीं. सगळ्या आधिकाऱ्याच्या आयुष्यांना रटाळपणा आला होता. अशा स्थितींत चोर-वस्तीतील करमणुकीची साधनें अधिकाऱ्यांनी वापरली असलीं, तरी तो काय भयंकर गुन्हा होता ? उलट इतक्या रूक्षपणानें राहून अधिकारी कामें करीत, हीच केवढी धन्यतेची गोष्ट होती.

प्रत्येक श्रेणीच्या अधिकाऱ्याच्या अंतःकरणांतील माणुसकी जागी होऊन शेरे लिहिले गेले होते. खुलासेपत्रक मंत्र्यांकडे गेले. त्यांनी तें पाहिलें. त्यांचें समाधान झालें. 'खरोखरच लालबावट्याच्या नादानें तरुण पिढीचीं मुलें मोठा आंव आणून तक्रारी करतात,' ही त्यांची खात्री झाली. इतरत्रही त्यांना हाच अनुभव येत नव्हता का ? मंत्र्यांना चौकशीचें समाधान मिळालें.

डोंगर पोखरून उंदीरही न निघाल्यानें सगळ्याच अधिकाऱ्यांना हायसें झालें आणि सर्वजण आबाबद्दल तिटकाऱ्यानें बोलूं लागले. त्या सगळ्या प्रकरणांत चोर-वस्तीतील अधिकाऱ्याच्या 'सर्व्हिस्-बुकांत' वाकडी नोंद पडली नाहीं हें केवढें समाधान त्यांना होतें. एक वेडीवाकडी नोंद वरिष्ठ अधिकाऱ्यानें केली असती कीं पगार-वाढ, वरची जागा, नोकरीची शाश्वती, सारें सारे घोटाळ्याचें झालें असतें.

रूक्ष जीवनांत पोटाच्या खळगीसाठींच धडपडणाऱ्या, त्या शें-पन्नास रुपये मिळवणाऱ्या लहान मोठ्या अधिकाऱ्यांनीं, सुखाच्या क्षणिक मोहांना बळी पडून केलेल्या चुकांची सारवासारव केली आणि सर्वांनीं सुटकेचे निःश्वास सोडले. पण त्यांच्याच सारखी धडपड करणारा आबा दोषी ठरला.

● ● ●

# ५६

बाईसाहेबांनीं बोलावल्यावरून आबा त्यांना भेटायला गेला. त्या काय विचारतील या कल्पनेनेच आबा गोंधळून गेला होता. आजही त्यांनीं त्याला खुर्चीवर बसायला सांगितलें. नीट चौकशी केली.

बाईसाहेब—गायकवाड, तुम्ही दवाखान्यांत असतांना कारखान्यांतील सतरंज्यांना गिऱ्हाईक आलें होतें.

आबा—कोठीमध्यें सगळ्या सतरंज्या आहेत.

बाईसाहेब—नाहींत! कोठीमध्यें मोठ्या हॉलमध्यें घालण्याजोग्या दोन सतरंज्या असायला हव्या होत्या. दोन्ही तिथें नाहींत.

आबा—पण मी दवाखान्यांत गेलों, त्या दिवशींसुद्धां कारखान्यांत होत्या सतरंज्या, बाईसाहेब.

बाईसाहेब—हें पहा; तुमची नेमणूक केली तेव्हां मॅनेजरसाहेब तुमच्या नेमणुकीच्या विरुद्ध असतांनाही मीं तुम्हांला नोकरीवर घेतलें.

आबा—होय बाईसाहेब. माझ्यावर उपकार झाले.

बाईसाहेब—पण तुम्ही अशा रीतीनें वागायला लागलां तर तुम्हांला कामावर टिकवणं कठीण जाईल.

आबा—मी काय केलं?

बाईसाहेब—काय केलं? सतरंज्या कुठें आहेत?

आबाला वाटले होतें नामीवरून बाई बोलतील. हें भलतेंच काय झालें? त्याला कल्पनाही नव्हती.

आबा—मला माहीत नाहीं.

बाईसाहेब—किल्ल्या कुणाजवळ असतात?

आबा—मी दवाखान्यांत जाईपर्यंत माझ्याजवळ होत्या.

बाईसाहेब—आणि मग मॅनेजरसाहेबांकडे दिल्या. मॅनेजरसाहेब सतरंज्या घेतील असं तुम्हांला वाटतं? त्यांनींच माझ्याकडे किल्ल्या पाठवल्या.

आबा गोंधळून गेला. बाईनीं तीव्रतेनें त्याच्याकडे पाहिलें.

" मला ४८ तासांत तुम्हीं समाधानकारक उत्तर दिलं नाहीं तर मला तुमच्या बाबतींत कडक व्हावं लागेल."

आबा हतबुद्ध होऊन पाहूं लागला. तो घराकडे आला तों त्याच्या पायांतील शक्ति जणुं झरून गेली होती. चोरीचा आळ ! तो घरीं आला. त्यानें व्याकुळतेने जमिनीवर अंग टाकले.

" कां ? काय व्हाया लागलं ?"

" जाईबाई !"

" काय ?"

" कांही नाहीं."

" अर अस काय करतुस ? त्या नामीचा ग्येला मुडदा मार्तात. हामी हाओत तंवर तिला न्हाई लगीन करूं द्येत. पंच ग्येले हाएत काय ? तुझ्या बापाला बोलवूनशानी घ्येतलंय. आतां आला म्हजी पंचाम्होरंच व्हईल काय व्हायाचं त्ये."

आबाला सहस्र वेदना होत होत्या. ती नामी, सतू, आईबाप, चोरीचा आळ, सगळीकडून टोचणी. त्याच्या डोक्याच्या शिरा धडधडत होत्या. कल्या काय काय घेऊन आला होता तिकडेही त्याचें लक्ष नव्हतें.

" ह्ये काय ?" जाईनें विचारलें.

" शुः, वराडतीस कशापायीं ?"

जाई आश्चर्यानें बघत होती. " अन् ही अवदसा कशापायीं ? दारू पिन्याची बंदी झाली हाए. शुध ग्येली काय तुझी ?"

" तूं वाइच गप्प बैस. आज फौजदारसायबानं सांगितलं हाए दारूची भट्टी लावाया."

आबा एकदम उठून बसला. " काय म्हणतोस ?"

कल्या हंसून म्हणाला, " अर अमलदाराला दारू मिळत न्हाई. तवां पायां पडाया लागत्यात. परवां त्या नाऱ्यानं बी दारू करूनशानी दिली. धा बाटल्या. अन् रातचं संमदं पित्यात कलपांत बसूनशानी."

" अन् तुला पकडलं म्हंजे ?"

" येडा हाएस तूं. आबा. अर फौजदारानंच सांगितलंय तर पकडणार कोन ?"

" मॅनेजर."

" हा तुझी. अर म्यानेजर बी पितो. कांग्रेस आल्यापून त्यांना कुटं मिळतीया प्याया ? आज बघ तूं जरा मजा. आपल्या मरीआईला बी न्हाई मिळली ताडी फारा दिसांत."

आबा—कल्या, हें बरं नाही.

कल्या—तूं चीपचाप बैस.

पण आबा उठला. मावळणीनें त्याची समजावणी केली. पण तो म्हणाला,

" मी झालोय चोर, अन् तूं घाल दारूची भट्टी. दोघं मिळून जाऊं तुरुंगांत हवा खायला. अन् अंमलदार क्लबात बसतील आपल्याला कोठडींत टाकून." तो निघून गेला. असह्य प्रकाशाचे झोतांनीं जणुं त्याची नजर अंधारल्यासारखी झाली.

तो नव्यानें चोर-वस्तीत आला. तेव्हां वन्या सांगत होता, कीं सुतार-कारखान्यांतील सामान मास्तरांनीं विकलें. आतां सतरंज्या मॅनेजरांनीं विकल्या असतील ! फौजदार जर दारू गाळायला सांगतात, तर मॅनेजर सतरंज्या कशावरून विकणार नाहींत ? तो संशयाने वेडावून गेला. हें सगळं सांगायचं कुणाला ? बारण्यांना ? पण तो बारण्याकडे जायलाही भीत होता. त्याला नोकरी लागल्यापासून तो बारण्याकडे गेला नव्हता. त्याला नोकरी सांभाळायची होती. पुनः गिरणींत संप झाला तेव्हां बारण्यानी त्याला घरी बोलावून घेतले आणि लोकांची समजूत घालायला सांगितले. पण नोकरी टिकवण्यासाटी आबानें कांहीं केलें नाहीं. बारणे नुसते चिथावणी देतात, उद्यां नोकरी गेली तर पोट कसें भरूं ? संपांत जाऊनच काश्या, वन्या सगळे बेकार होऊन हिंडत होते. तो पुनः गेलाच नाहीं. आज त्याला आठवण झाली; पण त्याची पावलें आतां त्यांच्याकडे वळतना.

आबा मॅनेजरसाहेबांच्या बंगल्यावर गेला. त्याची नजर शोध घेत होती. मॅनेजरसाहेबांच्या पुढच्याच हॉलमध्यें कारखान्यांतील मोठी सतरंजी पाहून तो थक्क झाला. मॅनेजरसाहेब बाहेर आले, तुसडेपणानेंच त्यांनीं विचारलें,

" काय रे !"

" साहेब, मीं किल्ल्या दिल्या आपल्याकडे कारखान्याच्या अन् त्यानंतर इस्पितळांत गेलों. तर बाईसाहेब म्हणतात, ' कारखान्यांत मोठी सतरंजी

नाहीं.' तेव्हा मी आपल्याला विचारायला आलोंय, 'कुणाला दिली का' म्हणून."

"साल्या, इथ विचारायला आलास ? शरम नाहीं वाटत ? मीं तुझ्या बाईसाहेबांना म्हटलंच होतं आधीं, की तुमच्यासारख्या चोर-जातींतल्या लोकाना मास्तर म्हणून घेऊं नका. पण त्यांना फार वाटत होतं. आतां सतरंजी गेली म्हणतात. अशी कशी सतरंजी जाईल ? तिला कांहीं पाय नाहींत पळायला. आतां पन्नास रुपये तुझा बाप दील का ?"

"पण साहेब ?"

"पण काय ? पण काय रे ? हरामखोरा ! सहा इयत्ता शिकलास तर तुला वाटतंय् आकाशाला हात लागले. इकडे त्या पोरीला निजवलंस, इकडे त्या मास्तरणीबरोबर हिंडत असतोस. त्या दिवशी ते साहेब आले तर बोंबाबोंब केलीस आमच्या नांवानं. लाज नाहीं वाटत ? जा, आतां तुझी कॉंग्रेस चालली तुरुंगांत. तो गांधी पण गेला तुरुंगांत. लेका, तुला तुरुंग दाखवायला हवा. साले कॉंग्रेस म्हणून फार डोक्यावर चढले."

आबा थक्क झाला. ज्या सतरंजीवर ते उभे होते, त्या सतरंजीकडे तो पाहूं लागला. मॅनेजरसाहेब डाफरले, "चल जा. काय तुला म्हणायचं आहे तें लिहून दे. बंगल्यावर येऊन त्रास देऊं नको."

आबाला तिरस्कार आला. 'आतां या मॅनेजरला दाखवतों चांगलं.' असे स्वतःशीं पुटपुटत तो बाईच्याकडे गेला. त्यानें स्पष्ट सांगितलें, "कारखान्यांतून सतरंजी मॅनेजरसाहेबांनीं नेली आहे. तुम्ही जाऊन पहा."

बाई---काय सांगतां ? कुणाबद्दल बोलतां आहां ?

आबाला आतां कशाचीच पर्वा नव्हती. एवीं तेवीं नोकरी जाणारच; मग या चोर अंमलदाराचें नांव घेऊन नोकरी जाऊं दे.

आबा त्वेषानें म्हणाला, "मी स्वतः ती सतरंजी पाहून आलों आहें. आमचे अंमलदारच असं करायला लागले तर त्यांना कुणी आवरायचं ? आज मॅनेजरसाहेबांनीं सतरंजी नेली. काल माझ्या मावळणीच्या नवऱ्याला फौजदारांनीं दारू गाळायला सांगितली."

बाई---गायकवाड ! संभाळून बोला.

आबा——आजपवतर संभाळूनच बोललों, बाईसाहेब. तुमचे माझ्यावर उपकार झाले आहेत. पण नोकरीवरून काढण्याआधी खात्री करून घ्या अन् मग मला खुशाल काढा.

बाई विचारांत पडल्या. त्यांनीं आबाला जायला सांगितलें.

मिशनऱ्यांकडून पानवडच्या चोर-वस्तीचा कारभार सरकारकडे आला तेव्हां स्थावर जंगम बरीच मिळकत मिशनऱ्यांनीं एक सट्ट्यानें सरकारला विकली. जी जी मिळकत विकली तिची यादी तयार होती. वरिष्ठ ऑफिसर-कडे त्या यादीची प्रत होती, तशीच मिशनऱ्यांकडेही होती आणि वंगडी मॅनेजर होते, म्हणून त्यांच्याही फाइलला एक प्रत लागलेली होती.

चोर-वस्ती मुंबई इलाख्यांत जेथे जेथे असे, तेथे तेथें मॅनेजरांना राहण्या-साठीं घरेंही बांधलेलीं असत. पण तीं अगदीं सामान्य प्रतीचीं, फारशा सोई नसलेलीं. वंगडी मॅनेजरांची अनेक ठिकाणी बदली होतां होतां ते पानवडच्या वस्तीवर आले होते. कुठेंही नाही एवढा मोठा बंगला त्यांना राहण्याला मिळाला होता. मिशनऱ्यांनीं सरकारच्या स्वाधीन केलेले लांकडी सामानही बंगल्यांत भरपूर होतें. त्यामुळें वंगडी सुखांत होते.

वंगडी आल्यापासून त्यांना बंगल्याचा व आंतील उंची सामानाचा उपभोग घेतां आला होता; पण एकाएकीं वरिष्ठांची आज्ञा होऊन एक दिवस सर्व लांकडी सामानाची पुनः यादी करून तें लिलांवानें फुंकून टाकण्याचें ठरलें. यादींत सामान लिहितांना मिशनऱ्यांनी दिलेल्या सामानापैकी काय मोडलें तोडलें होतें, तेंही नमूद करावयाचें होतें आणि चांगल्या सामानाचा लिलांव करावयाचा होता. स्वतःच्या घरचें सामान लिलांवांत काढल्याइतकें वंगडींना मनात वाईट वाटत होतें. ‘ काय बुवा रोज नवीं नवीं कामं लादतात आमच्या-वर ! ’ त्यांचें मन कुरकुरूं लागलें.

वंगडींनीं मोडक्या व चांगल्या सामानाची यादी स्वतः केली. तेव्हां कांहीं कांहीं अत्यंत गरजेचें,त्यांच्या बंगल्यांत वापरलें जाणारें सामान, आतां कायमचेंच जाणार, ही कल्पना त्यांना त्रास देत होती. त्यांच्याहीपेक्षां त्यांच्या बायकोला ही गोष्ट फारच लागून राहिली होती. मुलेंही विरस झाल्यासारखीं दिसलीं. ते मायेचे बंध—अशा मनाच्या अवस्थेंत सांपडलेले पाहून वंगडींना वाईट वाटत होतें. पण कर्तव्य केलेंच पाहिजे म्हणून त्यांनीं गड्यांकरवीं सर्व सामान बाहेर

काढलें. हें काम करीत असतां त्यांना सारखें वाटे, 'आमचं काम झालं थोडं, त्यांत व्याह्यांनीं धाडलं घोडं!' हीं सगळीं जादा कामं अंगावर पडतात. त्यांतून फायदा नाहीं दमडीचा. ही रुखरुख त्यांच्या मनाला होती.

सामान बाहेर काढतांना एका टेबलाचा पाय पिचल्यासारखा झाला. एका खुर्चीचा स्क्रू निघाल्याने ती खिळखिळी झाल्यासारखी दिसली. एक दोन कपाटेंही खिळखिळीशीं वाटलीं. मॅनेजर वंगडींनी त्या सर्वांची 'मोडकें तोडकें' सामान म्हणून पुनः बंगल्यांतच पाठवणी केली. 'अगदीं मोडलेलें,' 'दुरुस्त न होणारे कचरा सामान' असा रिपोर्टही वर करून टाकला.

आतां तें सामान घरांत असलें, तरी मोडकें, फेंकून दिलेलें सामान स्वतः दुरुस्त केलें, असें म्हणूनच ते राजरोस वापरीत होते. आणि कां वापरूं नये? त्यांच्या कष्टांचा मोबदला नसेल कुणी देत, तर त्यांनी कां घेऊं नये? तरीही पूर्वीं बंगला सामानानें जसा शोभिवंत दिसे, तसा या पाचसहाच वस्तूंनी दिसत नव्हता. कारण रिपेरी करतांना आलेला थोडासा बोजडपणा, कुणाच्याही लक्षांत आला असता.

पायाना गार फरशी त्रास देत असे. त्या गारव्याचा घरांतील सर्वांना त्रास होई. सगळ्यांची कुरकूर सुरू होती. पण एवढ्या मोठ्या बंगल्याच्या हॉलला पुरेशी सतरंजी विकत घेणें हें वंगडींना कधींच शक्य होणारे नव्हते. सतरंजीपेक्षांही इतर किती तरी निकडीच्या गोष्टी घेणेंच त्यांना अजून जमत नव्हतें. कुणा मुलांना गादी होती, कुणाला नव्हती. कुणाकुणाला रोजचे कपडे होते, पण सणावाराचे कपडे नव्हते. पगार शंभर रुपये. घरांत खाणारीं माणसें आठ. त्यांतून आजारपणही येत होतें.

पायांना बाधणाऱ्या गारठ्यानें आजार येत होता आणि वंगडी विचार करीत होते. आबाच्या चुलत्यानें किल्ल्या मॅनेजरकडे दिल्याबरोबर वंगडींच्या डोक्यांत वीज चमकली.

विणकामाच्या कारखान्यांतील पोरें ३० फूट लांब ३० फूट रुंद सतरंजी विणीत असलेलीं त्यांना देखरेखीच्या वेळीं दिसत रोज. त्या सतरंजीसाठीं सूत आणण्याची व्यवस्था त्यांनींच स्वतः बाईसाहेबांसाठीं म्हणून केली होती.

वंगडींना सुताची किंमत दिल्यानंतर सतरंजी घेणें गैर वाटलें नाहीं. मजुरी कशाला द्यायची? एर्वीतेर्वीं शाळेंतील शिकाऊ पोरांनींच ती तयार

केली होती. आणि आपण कांहीं थोडे कष्ट करीत नाहीं. त्या मानानें पगार काय मिळतोय आपल्याला ? मनानें आपले दुःख ओकलें.

आपण चोवीस तास चोर-वस्तीचें काम करीत असतां, सुताची किंमत देऊन सतरंजी घेतली तर त्यात काय गैर आहे ? वंगडीना तें योग्यच वाटत होतें. आणि म्हणूनच त्यांनी कारखाना उघडून दोन्ही मोठाल्या सतरंज्या आपल्या घरीं नेल्या. आणि ऑफिसांत सुताची तेवढी किंमत भरून टाकण्याचे ठरवले. सुताच्या किंमतीपेक्षा अधिक होणारी मजुरी देणें त्याना शक्यही नव्हते.

ऑफिसांत पहातां सुताची किंमतही थोडी नव्हती. तीही मॅनेजराच्या खिशाला जडच झाली असती. सतरंज्या तर घरात येऊन पडल्याही होत्या. मग रिकाम्या खिशात हात घालून विचार करता करता, सुताचीही किंमत द्यायची नाहीं, असें वंगडीनीं ठरवलें. पायाना बाधणारा गारठा सध्यां तर निवारला. त्यांनीं स्वतःची समजूत घातली.

त्यांच्या मनांत 'बाईसाहेब तक्रार करतील कीं काय' अशी शंका आली. ते गोंधळले. 'पण सतरंजीसारख्या सतरंज्या बाजारांत मिळत नाहींत का ?' त्यांच्या मनानें त्यांना विचारलें. बाईसाहेब मॅनेजरांकडे गेल्या तरी त्या बाहेरच्या बाहेर जात. त्यांना सतरंज्या दिसायला किती तरी दिवस लागतील.

वंगडी स्वस्थ झाले. आतां ती सतरंजी आपण गगनवाडीच्या दुकानांतच घेतली आहे अशी त्यांनीं मनाची पक्की समजूत घातली.

● ● ●

## ५७

"राईबाई, खरं सांगतां ?"

"खरं म्हंजे ? माझ्याच वर्गातलीं चार पोरं होतीं. मीं स्वतः त्यांना डोक्यावर सतरंजी नेतांना पाहिलं."

"तुम्ही बाईसाहेबांच्या पुढें सांगाल ?"

"हो." आणि तीं दोघं बाईसाहेबांच्या बंगल्यावर गेलीं. त्यांनीं पोरांना विचारलें. पोरांनींही सतरंजी नेल्याचें सांगितलें. बाई थक्क झाल्या.

इतक्यांत मॅनेजरच स्वतः आले. त्यांनीं आबाकडे आणि राईकडे तिरस्काराची नजर टाकली आणि ते इंग्रजींत म्हणाले, "या मास्तरला कामावरून काढायला हवा."

बाई कांहीच बोलल्या नाहीत.

"या मास्तरचें वर्तन चांगलें नाही. तुम्हांला परवांचा गोंधळ कळलाच असेल. वस्तीवर याच्यामुळें अशीं भांडणं होतील तर शिस्त राखणं कठीण जाईल. अन् तो आतां मास्तर म्हणून काम करीत असल्यानें त्याच्या वर्तनाचा परिणाम वस्तीवर झाल्याशिवाय राहणार नाहीं. मी आज रिपोर्ट करणार आहें वर. तुमचं त्याच्या बाबतींतील म्हणणं कळवा. तुमची पण सतरंजी गेली म्हणे कारखान्यांतून!"

"हो. गेली."

आबाला वाटले आता बाई त्यांना सांगतील. तो आशेनें बघू लागला. पण बाई कांही बोलल्या नाहींत. मॅनेजर उठले. जातां जातां ते राईला म्हणाले,

"काय बाई. तुम्ही या पोराबरोबर हिंडत जाऊं नका. चांगलं नाहीं तें."

अधिकाऱ्याच्या तोऱ्यांत शब्दांचे चाबूक हाणीत मॅनेजर निघून गेले. राईही गोंधळून गेली. कांही क्षण कोणीच बोलले नाही.

आबा उठला. 'जातों' म्हणाला. बाईनीं नुसतें 'हुं' म्हटलें. राईला लाजेनेंच त्याच्याबरोबर जाणें शक्य नव्हतें. तीही मागून निघून गेली.

आबाला त्या वस्तींत कुणाकडेही बघतांना तिटकाराच वाटत होता. त्याला वाटे बाईसाहेब खरा रिपोर्ट देतील. पण त्याही स्तब्ध बसलेल्या पाहून त्याचा तिटकारा वाढला.

विठाबाईंना मॅनेजरचें वर्तन निंद्य वाटलें. पण त्यांनाही नोकरी करायची होती. टिकवायची होती. आज 'सत्य' 'सत्य' म्हणून आबाचा कड घेऊन मॅनेजरविरुद्ध रिपोर्ट केला तरी तो सिद्ध होणें किती कठिण होतें! आणि उद्यां मॅनेजर उरफाटले तर!

सतरंजीसारखी सतरंजी असूं शकते. गगनवाडींतील कोणताही दुकानदार सतरंजी विकत घेतल्याची पावती मॅनेजरना देणें अशक्य नव्हतें. सतरंजीला

लागलेलें सूत शिकाऊ मुलांनीं नासलें म्हटलें तरीहि चालण्याजोगें होतें.

विठाबाईनीं सर्व बाजूंनीं विचार केला. आज मॅनेजरविरुद्ध लिहून उद्यां मॅनेजर विनाकारण माझ्यावरही कांहीं किटाळ आणूं लागले तर ? त्यापेक्षां या भानगडींत न पडणेंच बरें. विठाबाई गप्प बसल्या. मॅनेजर आबाविरुद्ध बोलत असतांही त्यांनीं आबाची कड घेतली नाहीं. आपल्याला निराळेंच कांहीं कळलें आहे असें चेहऱ्यावर दर्शविलेंही नाहीं.

त्या सगळ्या नोकरीच्या गुलामांनीं आबाच्या विरुद्ध बोलून किंवा गप्प बसून आबाविरुद्ध रिपोर्ट वर पाठवला. आबाचा रिपोर्ट ऐकणारें कोणी नव्हतें.

आबाची नोकरी जाणार ही वदंता मास्तरांमध्यें केव्हांच पसरली होती. राईलाही ती कळली. ती कळली नव्हती आबालाच. त्याला जेव्हां चोवीस तासाच्या आंत बडतर्फ केलें, तेव्हां तो रागाने वेडा झाला. त्याच्याभोंवतींचें तें स्वच्छ कपड्यांचें, साहेबी वाणीचें जग त्याला भोंदू दगलबाजसें दिसूं लागले. चोराहून चोर असलेल्या त्या अधिकारी वर्गानें, क्षणार्धांत त्याच्या स्वच्छ आयुष्यावर डांबर फांसलें. या जाणिवेनें तो चिडून वाटेल तें बोलत होता, बडबडत होता.

तो आपल्या मावळणीकडे गेला. तेथें कल्यानें चोरून दारू गाळल्याबद्दल त्याला पकडलें होते. मावळण ऊर बडवून रडत होती. आबाच्या डोळ्यांत खून चढला होता. तो पिंपळाच्या पाराशीं उभा राहून गरगर डोळे फिरवीत पहात होता. कल्याला दारू गाळायला लावून उलट आपल्या वासना शांत करणाऱ्या कल्यालाच गुन्हेगार म्हणून पकडून देणाऱ्या आणि पगारवाढीचें पुण्यही पदरांत पाडून घेणाऱ्या इन्स्पेक्टराचें नरडें त्यानें दाबलें असतें. पण तो कुठें नाहींसा झाला कोण जाणे !

मावळणीचें रडणें, कल्याचा बडबड, सगळें सगळें त्याला असह्य झालें. हातांत असतें, तर एका विजेच्या कल्लोळानें त्याने तें अन्यायाचें जग जाळून टाकलें असतें. तो त्वेषानें उठला. मरायचें पण पुनः चोर-वस्तींत यायचें नाहीं असा त्यानें निश्चय केला.

त्याचीं पावलें लांब लांब पडत होतीं. श्वास जोरानें चालला होता.

सगळें जग भोंवतीं गिरगिरत होतें. शून्य रस्त्यानें त्याचें मन आणखी पिसें केलें होतें.

● ● ●

## ५८

" आबा ! "

त्यानें चटकन् पाहिलें. राई ! आणि ' राई ! ' म्हणून पोटांतील राग अश्रुरूपानें तिच्या मायेचा विसांवा घेण्यासाठीं उसासून बाहेर पडला. त्यानें दोन्ही हातांनीं तिचे हात घट्ट धरले. राईच्या डोळ्यांना धारा लागल्या. आबाच्या मनाची आग विझूं लागली.

तीं दोघें बोलत होतीं. साऱ्या अन्यायाचा पाढा वाचला-ऐकला गेला. आबाचें मन शांत झाले.

" राई ! मला तुझ्याशिवाय जगांत कुणी नाहीं." आज मोकळेपणानें तो बोलला. राईनें मान खालीं घातली.

" राई, माझ्या मनाची भाषा कळणारं माणूस मला मिळालं आहे. अजून मी धडपडेन; अजून मी माणसासारखा जगण्याची धडपड करीन; तुझ्या जिवावर, तुझ्या सोबतीनें."

त्यानें तिचा हात आपल्या हातांत घेतला. तिनें तो हळूच सोडवून घेतला. ती विमनस्कपणें दूर पाहूं लागली.

" कां ? " तो नजर खिळवून म्हणाला.

ती क्षणभर बोलली नाहीं.

" राई ? "

तिनें त्याच्याकडे नुसतें पाहिलें. तिचे डोळे भरून आले होते.

" आबा ! तुमची माझी मैत्री या जल्मीं तुटायची नाहीं."

" मग ? रडतेस कां ? "

**राई—पन मैत्री म्हंजे लगीन नाहीं. अन् बाईमानसाच्या अन् बाप्यांच्या मैत्रीला कांहीं किंमत नाहीं.**

आबा तीव्र स्वरांत म्हणाला, " आपलं लग्न होणार नाहीं ? "

राईनें मान हलवली. आबानें त्याच स्वरांत विचारलें, " कां ? "

ती बोलली नाहीं. त्यानें तिला गदगदां हलवून म्हटलें, ' कां ? कां ? बोल."

" आबा ! मी जात मानत नाहीं. पन—"

" पण काय—पण काय ? बोल." तो अधीरतेनें विचारूं लागला. ती पुनः मुकी झाली.

" बोल. बोल. पण काय ? पण मी मांग-गारुडी. चोर-जातींतला. बेकार—म्हणून तुझा बाप, तुझा भाऊ तुला लग्न करूं देणार नाहींत. होय ना ? होय ना ? बोल. बोल."

तो तिला निष्ठुरपणें गदगदां हलवीत म्हणाला. ती घाबरून पहात होती.

" बोल. बोल. चांडाळणी. बोल. बापासाठीं, भावासाठीं, तूं लग्न करणार नाहींस. होय ना ? "

तिनें " होय " म्हणून मान हलवली.

आबाच्या तोंडून रागाने, निराशेनें शब्द फुटेना, त्यानें तिला सोडलें. जळत्या नजरेनें त्यानें तिच्याकडे पाहिलें. पुनः पाहिलें आणि तो निघून गेला. तिच्या आर्त हांकेचा पुनः कानोसा घेण्याचेंही त्याच्या मनांत आलें नाहीं.

● ● ●

## ५९

रात्रीचे नऊ वाजले होते. राहू केतूंनीं गिळलेला चंद्र सुटकेच्या आनंदांत भरभर पुनः आकाशमार्गानें चालला. ' दे दान सुटे गिरान–' शेंकडों बायका, मुलें आणि पुरुष कर्कश आवाजांत रस्त्यानें ओरडत चाललीं होतीं. पुण्य साधायला तत्पर असणारी पापी आणि पुण्यवान् जनता धर्मबुद्धीनें दान करीत होती. कोणी जुने फाटके कपडे, कुणी अन्न, कुणी पैसे. आणि ते ओवाळलेलें पाप घेत मांग नि मांग-गारुडी हिंडत होते. रस्ते जणुं त्यांचेंच सम्राज्यसें झाले

होते. आणि आज चिडलेला कावलेला आबाही भेसूर ओरडत होता, " द्या दान सुटे गिऱ्हाण." तें सगळें हिडीस वाटत होतें त्याला. त्याला असें ओरडण्याचीही गरज नव्हती. पण त्याला इतकी किळस आली होती कीं ' मनुष्यपण विसरून डबक्यांतलें डुक्कर करतों तुला." असें म्हणणारा एकादा जादुगार भेटता, तरी आबानें म्हटलें असतें, " कर मला डुक्कर."

तो मुर्दाडपणें हिंडत होता. आणि त्याच्या जातीच्या सगळ्या लोकांचें लक्ष त्याच्याकडे जात होतें. त्यांना नवल वाटत होतें. सुधारक देवळांत शिरल्यावर ज्या अचंब्यानें धार्मिक लोक त्याच्याकडे पहातात, तसेंच तें नवल होतें. आणि आबा चिडून ओरडत होता, " द्या. गारुड्याला पैसा द्या." एकादी धार्मिक बाई पैसा द्यायला बाहेर आल्यावर, पचवीस माणसें, ' बाई मला ', ' बाई मला ' करीत धांवत. आणि फेकल्या तुकड्याना पंचवीस कुत्री झोंबावीं, तशीं टाकलेल्या दानाला झोंबत. तें आबाला जमत नव्हतें. पण आतां तेंही करायचें त्यानें ठरवलें. चेवानें तो दानावर तुटून पडत होता. एकाद्या नंदीबैलासारखे कपडे खांद्यावर टाकून, तो आणखी दानासाठीं घराघराशीं ओरडत होता.

घरांतील दिव्याचा स्वच्छ प्रकाश. त्यात पांढऱ्या स्वच्छ कपड्यांनीं ते पांढऱ्या शुभ्र दाढीचे वृद्ध गृहस्थ शोभून दिसत होते. बाहेर रस्त्यावर चाललेल्या भिकाऱ्यांच्या तांड्याकडे त्याचें लक्षही नव्हते. बाहेर एक पोरगी दान द्यायला आली. आबा पुढें आला. त्याचेंही आंत लक्ष नव्हतें. त्याने हात पुढे केला. त्या मुलीच्या हातांतील पाटली ! केवढें तोंड वासलें होतें तिनें ! आबा बेफाम झाला होता. आतां सगळे सगळे करायचें त्यानें ठरवले. ती पाटली जणुं त्याला हंसून बोलवत होती. क्षणार्धात आबाला अन्न वाढायला पुढें झालेल्या हातांतील पाटली आबानें हिसकली. मुलगी ओरडली. आबा पळाला. त्याच्याकडे बोट दाखवीत ती मुलगी ओरडत होती. त्याच्यामागें कुणीसें धांवत होतें. ' चोर चोर.' पण रस्त्यांत सगळे तेच लोक. कुणी त्याला पकडलें नाहीं. ते पांढऱ्या शुभ्र दाढीचे गृहस्थ ओरडत होते. शेजारच्या घरांतील लोक ओरड्यानें बाहेर आले. पण कित्येक नुसते ' मला काय त्याचें ? ' म्हणून पहात राहिले. आणि एकानें मात्र सायकलवर टांग मारून आबाला धरलें. ते म्हातारे गृहस्थ आले. चार लोक तेवढ्यांतच जमले.

हो. तोच तो आवाज...एक दोनच वाक्यें. आबा पाहूं लागला.

“ अरे काय रे, तुला भिक्षा घालायलां पोरगी आली आणि तूं तिची पाटली ओढून पळतोस ? ”

“ दादा ! ” आबा एकदम वाकून त्यांच्या पायां पडला.

एक म्हणाला, “ अहो, चौकीवर न्या. पहा, पायां पडून वेळ भागवायला बघताय ‘ दादा ’ ‘ मामा ’ करून.”

दुसरा म्हणाला, “ साल्यांना धर्मच करूं नये.”

पण भागवत गुरुजी बोलले नाहींत. ते त्या परिचित आवाजाचा शोध घेत होते. त्यांनीं आबाला उठवलें.

“ कोण तूं ? ”

“ मी आबा ! तुमचा आबा गायकवाड ! ” गहिंवरून आबा म्हणाला.

भागवत गुरुजीना आठवलें. त्या बोर्डिंगांत आबा त्यांचा आवडता होता.

“ आबा ! आबा ! बेटा, काय केलंस हें ? ” आबानें मुकाट्यानें पाटली पुढें केली. चार लोक त्याला चौकीवर नेण्यासाठीं झगडूं लागले. भागवतांनीं आबाच्या खांद्यावर हात ठेवला. “ त्याला चौकीवर नेऊं नका. मी सोडला आहे त्याला.” भागवत स्तब्धपणें आबाकडे पहात राहिले. आबाही तितक्याच स्थिरपणें त्यांच्याकडे पहात होता. भागवत न बोलतां घराकडे वळले.

तो त्यांच्या मागोमाग घराशीं आला. त्यानें हाक मारली. “ दादा ! ” आबाला हाताशीं धरून भागवतांनीं आंत नेलें. घरचीं माणसें कडकडत त्याच्याकडे बघूं लागलीं. भागवतांनीं त्यांना शांत केलें.

“ हा माझा विद्यार्थी आहे. ”

आबानें मान खालीं घातली.

“ हा मांग-गारुडी मुलगा आहे. बारा वर्षे माझ्याजवळ होता. सगळ्यांत प्रामाणिक होता हा. कधीं खोटं बोलला, तरी आपण होऊन रडत येऊन सांगायचा ‘ मी चुकलों ’ म्हणून.”

“ म्हणून चोरी केली वाटतं ? ” पाटली हातांत घालीत मुलगी फणकाऱ्यानें म्हणाली.

“ मला शरम वाटते आबा तुझी. ”

आबा बोलला नाहीं. त्याच्या डोळ्यांतून पाणी ओघळत होतें.

" कां चोरी केलीस तूं ? "

" दादा ! तुम्ही मला विचारतां हें ? माझे आईबाप झालांत बारा वर्षे आणि एक दिवस अचानक आबाला बाहेर पाठवलंत. त्या दिवशींच फांसावर कां नाहीं चढवलंत ? आजपर्यंत, अगदीं आजपर्यंत मीं प्रयत्न केला तुम्हीं शिकवलेली माणुसकी घेऊन वावरायचा. आतां नाहीं जमत मला. आतां मी चोऱ्या करीन. दरवडे घालीन. खून करीन. "

" आबा ! " तीव्रतेनें दादा म्हणाले.

" होय दादा ! तुम्ही सगळं शिकवलं ! पण तुम्हीं शिकवलेला खरेपणा मला उपयोगीं नाहीं पडला. तुम्हीं शिकवलेला स्वच्छपणा मला उपयोगीं पडला नाहीं. तो मला टिकवतां आला नाहीं. तुम्हीं जी माणुसकी शिकवली ती मला कुणीं दाखवली नाहीं. दादा, तुम्ही फसवलंत मला. बारा वर्षे तुमच्याजवळ राहून बाहेर आलों. आणि चोर-जातीचा म्हणून मला आजपर्यंत सर्वांनीं डागलं. मी काम करायला तयार असतांना काम दिलं नाहीं. चोरी केली नाहीं, तरी चोरी लादली माझ्यावर. नाहीं. मी चुकलों. पोट जळेना तेव्हां मीं चोरी केली. दादा ! शिकवलीत ती अशी विद्या कशाला शिकवलीत ? या असल्या शापलेल्या जगांत वावरायला मला उपयोगीं पडेल, अशी विद्या कां नाहीं दिलीत ? ही पांढरपेशा माणसांची राहणी शिकवून मला मांग-गारुड्यांच्या अस्पृश्यांच्या जगांत पाठवलंत ! माझ्या मनाला एक दिवस तरी शांतता-समाधान मिळालं असेल का ? त्यापेक्षां ती नीति, ती स्वच्छता तुम्हीं शिकवायचीच नाहीं. जें शिक्षण आमच्या जगांत वावरायला उपयोगीं पडत नाहीं, तें शिक्षण देऊन जळत ठेवलंत मला. मग मी काय करणार ? मीं चोरी केली आहे. पोरीची अब्रू घेतली आहे—"

" आबा ! "

" खून केला आहे. "

" आबा ! काय बोलतो आहेस तूं ! "

" हो. मीं सगळं केलं आहे आणि करीन. मला संभावित चोरी करायला तुम्हीं शिकवलं नाहीं. जगांत जातिभेद आहेत आणि त्या जातिभेदाच्या वरवंट्याखालीं तूं रगडला जाशील, असं सांगितलं नाहीं तुम्हीं मला. तुम्हीं सांगितलं, तूं चोर-जातीचा आहेस, पण चोरी केली नाहींस तर तुझ्यावरचं

किटाळ जाईल. पण तें गेलं नाहीं, दादा. सगळ्या संभावितांनीं चोऱ्या केल्या आणि किटाळ माझ्यावर घातलं. मी मांग-गारुडी म्हणून रयतेनं मला दूर सारलं. ''

'' आबा ! ऐक; यापुढं तूं चोरी करायची नाहींस. तुला मी जेवायला घालतों. माझ्याबरोबर चल तूं स्वराज्य मिळेपर्यंत. स्वराज्य मिळालं कीं तुला मी ज्या जगासाठीं वाढवलं तें जग तुझ्याभोंवतीं आपोआप निर्माण होईल. महात्माजींच्या पुण्याईनं निर्माण केलेलं जग तुला कधीं लाथाडणार नाहीं.''

आबा हतबुद्ध होऊन पाहूं लागला. '' पण हें तरी सगळं खरं का ? ''

● ● ●

## ६०

फिरत्या भिंगरीसारखे दिवस नि रात्री गिरकत जात होत्या. गोरें राज्य उलथून टाकण्याची ती प्रचंड धडपड ! त्यांत रयतेंतील कितीक तरुण पोरें होतीं. त्यांच्यापैकीं कितीक दोन दोन रुपयांसाठीं पोलिसांच्या कानाला लागून दगलबाजी करीत, तर कित्येक प्राणही पणाला लावून रात्रंदिवस चळवळीचा फैलाव करीत होतीं. कोण तो उत्साह ! त्या उत्साहाच्या ओघांत आबाही सांपडला होता. आबाबरोबर चोर-वस्तींतील कितीक पोरें ! तीं पार बदलून गेलीं होतीं. त्यांना चोरीची आठवण नव्हती. खाण्याची शुद्ध नव्हती. आबा सांगेल तें करायचें. त्यांच्यापैकीं कोणीही रुपयासाठींही फितुरी केली नाहीं. आबाचें एकच काम—दादांनीं दिलेला मजकूर सायक्लोस्टाइलवर लिहून काढायचा. आबाच्या झोपडीकडे कधीं कुणाचेंही लक्ष गेलें नाहीं. बोलून चालून चोरवस्तींतील अडाण्यांची ती झोपडी ! पण त्या झोपडींत गगन-वाडीच्या साऱ्या चळवळीच्या आज्ञा लिहिल्या जात होत्या. आज मात्र दादांनीं आबाला बोलावलें तें लिहिण्यासाठीं नाहीं.

'' आबा, मरणाला भितोस कीं नाहीं ? '' हंसत हळू आवाजांत त्यांनीं विचारलें.

" भितो दादा ! पण तुम्हीं सांगितल्यावर नाहीं भिणार. काय करायचंय ? " आबानें किती उत्कंठेने विचारलें.

" गगनवाडीला परवां गोऱ्या शिपायांची पलटण यायची आहे चळवळीच्या बंदोबस्तासाठीं ! आपण त्यांचा बंदोबस्त करायचा आहे. "

आबा स्तंभित झाला. त्याला काय करायचें कळेना.

" येथून तीन मैलांवर जाऊन रुळाखालच्या फिश-प्लेट्स् काढायच्या. गाडी पुलाखालीं गेली पाहिजे."

आबाच्या अंगावर धाडसाचे रोमांच उभे राहिले. तो क्षणभर बघतच राहिला. नंतर म्हणाला, " चोरजातीच्या माणसाला कठिण नाहीं ! "

दादा हंसले, " जातीचा अभिमान एकदां तरी वाटला तुला. "

" पलटण खलास करीन तेव्हां वाटेल. " आबा गेला. परत आला.

" मेलों तर ! निरोप द्या. " असे म्हणून तो पायां पडला. दादांनीं त्याच्या पाठीवर हात ठेवला. आबानें कृतज्ञतेनें पाहिलें. तो निघून गेला.

● ● ●

## ६१

अमावास्येची रात्र. आबा आणि त्याचे तिघे तरुण सोबती चालले होते. त्यांच्यापैकीं कोणीही बोलत नव्हतें. एक गाडी त्यांच्या देखतच निघून गेली. आतां तीच गाडी यावयाची होती. चार तास अवकाश होता. ते ठिकाणावर जाऊन पोहोंचले. त्यांनीं माती बाजूला केली. आधींच दोन दिवस काळजी-पूर्वक पुरून ठेवलेलीं हत्यारे बाहेर काढलीं. खणतांना ' खट्-खण् ' आवाज होई. ते बावरून इकडे तिकडे पहात. पुनः ' कर्रर्र, खट्-खण् '. एक तास ते धडपडत होते. बोल्ट निघाले. प्लेटी मोकळ्या झाल्या. घाम पुशीत ते चौघे उठले. त्यांनीं दडण्याची जागा केव्हांच हेरून ठेवली होती. ते गर्दीनें दूर गेले. टेकाडामागें बसले. तेथें रात्रीं येऊन त्यांना कोणी पहाणार नव्हतें. ते कुज-बुजत गाडीची वाट पहात होते.

शेवटीं ती आली. दिव्याच्या तीक्ष्ण नजरा मैलावरचा शोध घेत होत्या. जणुं धडधडत्या अंतःकरणानें गाडी पुढें येत होती. तिच्या निःश्वासाची वाफ वाऱ्यावर पिंजारत होती. आबा आणि त्याचे दोस्त धडधडत्या अंतःकरणानें पहात होते, उत्कंठेनें रक्त सळसळ धांवत होतें. त्याचाही आवाज त्यांच्या कानांत ऐकूं येत होता. क्षण-क्षण चालले. गाडी येत होती. क्षण गेले. गाडी आली. 'चू, शेवटी कांहीच झालं नाहीं?' स्वतःला प्रत्येक जण विचारीत होता. डोळ्यांत सर्वस्व आणून पहात होता. 'अरे! शेवटीं सगळं फुकट!' एक जण दबत्या आवाजांत म्हणाला. तोंच धाड् धाड् धाड् आवाज झाला. तरुणांचा इंद्रियांवर ताबा राहिला नाहीं. किती डबे पडले कोण जाणे! ते चौघे पळत सुटले. न जाणों, त्यांचा शोध घेत कोणी येईल! त्यांना कुणाला सोबत्याची फिकीर करावयालाही वेळ नव्हता. त्यांना भानच नव्हतें. तें पडणारांचें ओरडणे, कण्हणें नि धाड्धाड् आवाज अजून त्यांचा पाठलाग करीत होतीं. दूर दूर दिव्याचे झोत पडत होते आणि या चौघां-भोंवतीं अंधार दाटत होता.

सारी गगनवाडी हादरून गेली. गोऱ्या पलटणीपैकीं पस्तीस जण जिवंत राहिले. बाकी सर्व ठार. कित्येकांना आनंद झाला. कित्येक म्हणत होते, 'असलीं आसुरीं कृत्यं महात्माजींना मुळींच पसंत पडणार नाहींत.' कुणी म्हणत, 'हें कसलं राजकारण? या गाडींत आमचे नात्याचे लोक असते तर तेही गेले असते.' अनेक लोक अनेक तऱ्हांनीं बोलत होते. गुप्त कार्यकर्त्यांचा उत्साह शिगेला पोंचला होता. काळजींतही निधडेपणा, बेदर-कारी आली होती. कित्येकांनीं तर जिवाचा जुगार मांडला होता. इकडे नोकरशाहीनें सगळींच अस्त्रें परजलीं होतीं. अपराधी—निरपराधी पकडले जात होते. गुप्त पोलिसांच्या कारवाईला ऊत आला होता. दोन दोन रुपयांची खैरात करून दगलबाजी बोकाळत होती. माणसांच्या जन्माला आलेले किडे दोन दोन रुपड्यांसाठीं कपटाचीं जाळीं पसरून, मैत्रीचें नाटक करून कार्यकर्त्यांना पकडून देत होते. अशाच दोन रुपयांसाठीं आबाचा हाताचा छापखाना एकानें दाखवून दिला. आबा पकडला गेला. त्याचे साथीदार पकडले गेले. दादा पकडले गेले. अभि-मानानें छाती फुगवीत सगळे तुरुंगाकडे गेले. महात्माजींच्या नांवाच्या

घोषणा ! घोषणांबरोबर पाठीवर हाणले जाणारे आसूड जणुं फुलांची कोमलता घेऊन त्यांच्या पाठीवर पडत होते नि उडणारे रक्तबिंदु नवीं नवीं बीजें पेरीत होते.

• • •

## ६२

१५ ऑगस्ट ! तो हिंदी स्वातंत्र्याचा दिवस होता. साऱ्या भारतांत अपूर्व उत्साहानें ती रात्र साजरी केली जात होती. दीडशें वर्षांच्या शृंखला गळून पडल्या. दूरचीं भयंकर स्वप्नें दिसत असतांहि त्या आनंदोत्सवांत उत्सव न मानणारा अभागी हिंदी बांधव कोणीही सांपडला नसता. ४२ सालच्या ‘ करा नाहीं तर मरा ’ चळवळींतील आघाडीवर असलेलीं माणसें केव्हांच सुटली होतीं. आणि आबाला वाटलें आतां आपल्यालाही सोडतील. स्वराज्याच्या त्या घोषणा, महात्माजींच्या नांवाच्या घोषणा, तुरुंगाच्या भिंती फोडून त्याच्या कानावर आदळत होत्या. आबा आणि आबासारखे कांहीं आनंदाश्रु गाळीत होते. आबाला आनंद झाला होता आणि स्वतःची भयानक विवंचनाही. तुरुंगांत तो ‘ क ’ वर्गाचा कैदी होता. पण त्याला दोनदां बाहेर न मिळालेली पोटभर भाकरी मिळत होती. त्याला सोडलें तर ? त्याच उत्सवाच्या आनंदाच्या दिवशीं त्याला उपाशीं रहावें लागेल ! पण तो त्या दिवशीं सुटलाच नाहीं. कित्येक दिवस गेले.

सगळे म्हणत ‘ आज सुटणार.’ कित्येक राजकीय कैदी सुटले पण आबा व कांहीं थोडे लोक सुटले नाहींत. त्यांचें ‘ रेकॉर्ड ’ तपासलें नव्हतें. ते ‘ क ’ वर्गातील कैदी चोर–दरवडेखोर–खुनी कीं राजकीय कैदी याचा पत्ता काढला नव्हता ! आणि आबाचें मन डागल्यासारखें झालें. पुनः चोर ! चोर ! चोर ! ती त्याची जात अजून त्याला छळीत होती. त्यानें केलेलें सारें मातीमोल होत होतें.

एक, दोन, तीन दिवस झाले. आणि मग आबा आणि बाकीचे कांहीं सुटले. उत्साहाच्या भरांत लोकांनीं त्यांना मोटरींत घातलें. आणि एका

मोठ्या थोरल्या माणसांच्या महासागरांत सोडलें. लोकांनीं पुढाऱ्यांच्या नांवांचा जयघोष केला. सुटलेल्या कैद्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. लोकांनीं त्यांना उचललें, डोक्यावर धरलें आणि गर्दीतून समोरच्या मोठ्या थोरल्या व्यासपीठावर आणून ठेवलें. लोक पहात होते. स्वातंत्र्याच्या लढ्यांत आत्मार्पण करायला तयार झालेल्या त्या मुक्तांकडे कौतुकानें, आदराने पहात होते.

आबाला कृतकृत्य वाटलें. त्या आनंदाच्या वेदनाही त्याला असह्य वाटत होत्या. तो कधीं न वावरलेल्या त्या जगांत वावरत होता, कधी न पाहिलेलीं दृश्यें पहात होता आणि कधी नाहीं त्या उत्सवांत बुडून गेला होता. त्याला स्वतःचा विसर पडला. तो उत्साहानें वाहून गेला. आयुष्यांतील संकटांचे पर्वत त्या क्षणीं त्याच्या खिजगणतींतही नव्हते. त्या दुमदुमणाऱ्या जयघोषांनीं त्याला महात्माजींना पहाण्याची अनिवार इच्छा झाली.

तो समारंभ संपला. लोक पांगले. लोक घरीं जात होते. आणि त्याच्याकडे पहातां पहातां पंख कापलेल्या पांखरासारखा आबा जणुं आकाशांतून खोल खोल दरींत पडला.

मोठमोठे प्रचंड वाडे आणि घरें त्याच्यासभोंवती त्याला सर्वत्र दिसत होतीं. माणसांचे लोट धरणांतून सुटलेल्या पाण्यासारखे पांचही रस्त्यांना पांगत होते. पण त्यांत एकाही घरानें त्याला 'आपला' म्हणून आश्रय दिला नसता आणि एकाही माणसानें ' तूं माझा ' म्हणून त्याला सहानुभूतीचा स्पर्श लाभूं दिला नसता. तो भांबावला. जायचें कुठें ? नि कसें ? त्याच्याबरोबर सुटलेल्या लोकांच्या नातेवाईकांनी त्यांना प्रेमाश्रूंनीं न्हाणलें आणि कोडकौतुकानें घरीं नेलें. आबाच्या हृदयांत वेदना उठली होती. गर्दी ओसरली. तुरळक माणसें दिसत होतीं. तीं आपल्या व्यवहारांत चूर. आबाकडे कोणाचें लक्षही गेलें नाहीं आणि आबा–देशासाठीं तीन वर्षें तुरुंगांत पिचणारा आबा—जगाच्या तुरुंगांत पिचल्या मनानें चालला होता. त्याला सगळे विसरले होते. तो सगळीकडे हिंडला. पण त्याला घर सांपडणारें नव्हतें. आणि त्याचें मन त्याच्या कळाहीन घराकडेच ओढूं लागलें. तेंच त्याचें घर होतें. त्या जमावांतून सुटलेला प्रत्येक माणूस ज्या भावनेनें स्वतःच्या घराकडे ओढला, त्याच भावनेनें आबाचें मन शेंकडों मैल दूर असलेल्या त्या भिकार

झोपडीकडे ओढलें गेलें. त्या शहरांतील कोणताही मायाबंध त्याला ओढीना आणि तो, त्या ओंवाळून टाकलेल्या माणसांच्या, उकिरड्यांतील मायाबंधाच्या ओढीनें निघाला. तेथें त्याला ' आबा ' म्हणून हांक मारणारीं शेंकडों माणसें होती. त्यांच्या त्या हांकेसाठीं त्याचें मन भुकेलें होतें.

आबा वस्तीवर आला. त्याला पाहून सगळ्या वस्तीला आनंद झाला. त्यानें 'गांधीबाबांनीं स्वराज्य मिळवून दिलें' म्हणून सांगितलें. तुरुंगांत पडलेल्या मोठमोठ्या लोकांच्या गंमती सांगितल्या, विचार सांगितले. तुरुंगांतून बाहेर आल्यानंतरची ती मोठी सभा केवढी होती, लोक आनंदानें कसे बेहोष झाले होते हें सांगितलें. एकदांच नव्हे, सभेत नव्हे, अनेकदां; जो भेटेल त्याला. जो विचारील त्याला. आणि तें ऐकतां ऐकतां तीं बथ्थड अंतःकरणे ओलावत. त्यांना आबा मोठा वाटूं लागला.

आबाला मात्र ते लोक होते तेथेंच व तसेच पडलेले दिसले. त्याला वाईट वाटलें. पण आतां त्याला जणुं पित्याची नजर आली होती. आपले आईबाप आणि ते सगळे लोक—त्या सगळ्यांची काळजी वाटत होती. तो पुनः दादांना भेटणार होता. पुनः त्यांच्या सल्ल्यानें काम करणार होता. कधीं नव्हे, इतका जिव्हाळा त्या समोरच्या लोकांबद्दल त्याला वाटत होता. आणि कधीं नव्हे, इतके प्रचंड आशा-आकांक्षांचे मनोरे दमदार मन बांधीत होतें.

आतां तो स्वस्थ बसत नसे. राही वस्तीवर, पण जाई दादांकडे. त्याचे दादा त्या साऱ्या वस्तीचे दादा झाले होते. ते म्हणत, " आपण रस्ते करूं. " " आपण नळ आणूं." " आपण शाळा घालूं." " आपण सूत काढूं. " " आपण कापड विणूं." " चऱ्हाटें विणूं." " कातडीं कमावूं ! "—किती किती आशांचे सूर्य तेजाळूं लागले आणि आबा तेजानें न्हाऊन निघाला.

● ● ●

# ६३

आबा ती बातमी वाचून अक्षरशः नाचूं लागला. वेड्यासारखा ज्याला त्याला तो सांगूं लागला. 'आतां मांग नाहीं, मांग-गारुडी नाहीं, महार नाहीं,

नि ब्राह्मण नाहीं. सगळे सारखे.' स्वातंत्र्य आलें. कधीं नव्हे तें झालें. स्वातंत्र्य आलें म्हणून झालें. आणि तुरुंगांतील तीन वर्षांच्या तपस्येचें तें गोडसें फळ प्रत्यक्ष स्वातंत्र्यापेक्षांही त्याला गोड वाटत होतें. कित्येकांनीं त्याच्या उत्साहावर पाणी ओतलें.

"अर, कॉंग्रेसनं जाती काडल्या तरी आपली भीड है ना, ती कुटं जातीया ? आपली रीत सोडाया ग्येलों तर मरीआई भलं न्हाई करनार."

आबा त्यांचा उपहास करूं लागला. त्यानें दहा पंधरा पोरें गोळा केलीं. "चला रे हॉटेलांत जाऊं." आणि तीं सारीं पोरें बालिश उत्साहानें तारुण्याच्या रंगेलपणानें हॉटेलांत घुसलीं. त्यांना कोणीं मना केलें नाहीं. त्यांचें कोणी स्वागत केलें नाहीं. चिडून त्यांच्यापुढें कपबशा सारणारा पोऱ्या नि कपाळाला शेंकडों आंठया घातलेला मालक त्या चहा पिणाऱ्यांच्या खिजगणतींतही नव्हते. ते आंत गेले ते सगळ्यांच्या अंगाला घसटत आणि मनानें मोहरून बाहेर आले तेही नव्या स्पर्शाची जाणीव भोगीत. 'वा रे कॉंग्रेस ! वा रे गांधी बाबा ! काय काय केलें त्यांनीं आमच्यासाठीं !'

तीं तरुण मुलें वेडावलीं होतीं. तीं कोणत्याही सार्वजनिक नळावर पाणी पीत हुंदाडत होतीं. मार खात होतीं. स्पृश्य जगाच्या कपाळावरील आंठयांकडे उपहासानें पहात होतीं. कोणत्याही देवळांत शिरत होतीं, आणि डोक्यावर घांव घेत होतीं. देवाच्या मायेची पांखर घेऊन, बेडरपणें स्पृश्य जगाच्या, नरड्याशीं झोंबू पहाणाऱ्या रागीट नजरांशीं, नजर भिडवीत होतीं. पण अखेरीस त्या देवदर्शनानें त्यांचीं पोटें भरलीं नाहींत. त्या स्पृश्यांच्या नळावर पाणी पिऊन त्यांचें समाधान झालें नाहीं. मग तीं समाधानासाठीं पाहूं लागलीं. त्यांना तीनच माणसें माहीत होतीं. गांधीबाबा, दादा आणि आबा. आतां त्यांच्या नजरांना पूर्वीचा पिंपळाच्या पारावरील माशा हांकीत बसणारा आबा दिसतच नव्हता. त्यांना धाडसी, पराक्रमी, स्वराज्य मिळवणारा, सत्यधर्मी, सगळ्यांसाठीं प्राण पणाला लावणारा आबा दिसत होता.

आतां तीं तरुण पोरें त्याच्याजवळ येत तीं प्रेमानें आणि आदरानें. दिवस चालले. तेथें रस्ते होऊं लागले. सगळी मांग-गारुडी वस्ती पावडीं कुदळीं घेऊन राबे. पण तें सारें राबणें नव्हतेंच. तो हौशीचा मामला होता. कामावरून

दमून म्हातारीं कोतारींही जमत आणि पाटीभर माती टाकायला लागत. नळ आला. झोंपड्या उंचावल्या. सगळीं सगळ्यांना मदत करीत. दादाही आणि आबाही. झोपडी-झोपडींतून बायका रहाट फिरवीत होत्या. दिवस जात होते. आणखी कांहीं दिवस गेले. महागाई वाढत होती. कमाई पुरत नव्हती. गिरणींत लागलीं तीं फार थोडीं माणसें. बाकी फुटकळ उद्योग करीत. गिरणींत माणसें लागत थोडीं, निघत जास्त.

काँग्रेस ! काँग्रेसनें काय केलें ! ती सगळीच क्रांति ! लुळ्या-पांगळ्या पोरां-बद्दल आईला अधिकच माया वाटते. त्या मागासलेल्या लोकांच्यासाठीं काँग्रेस सरकार वाटेल तें करायला तयार होतें. त्यांना म्हणे गिरणींत, शाळेंत, निर-निराळ्या खात्यांत, कुठेंही नोकऱ्या ! सगळ्यांच्या आधीं !

पण आबा कष्टी मनानें पाहूं लागला. पंचवीस वर्षें सर्वस्वीं जीवन बांधून टाकल्यासारखें करूनही त्यांच्यांत शिकलेलीं माणसें नव्हतीं ! दलितांवर आलेली ती प्रेमाची, औदार्याची लाट जणुं दगडांवरून पुढें जात होती. त्या साऱ्या चोर-वस्तींतील त्या पांच हजार माणसांत मराठी पांच इयत्तांवर शिकलेलीं सात माणसें होतीं आणि इंग्रजी शिकलेलीं तीन होतीं ! पंचवीस वर्षांत त्यांना सुधारायला केलेल्या कायद्यांनीं नि अधिकारी माणसांनीं एवढेंच त्यांच्यासाठीं केलें होतें. आबाला मास्तर म्हणून गगनवाडीच्या शाळेंत नोकरी लागली. त्या चोर-वस्तीच्या अधिकाऱ्यांच्या अधिकाराच्या जांचणींतून कायमची मुक्तता झाली, म्हणून आबानें दीर्घ निःश्वास सोडला.

स्वराज्य आलें. जातीची कांचणी गेली आणि चोर-वस्तींतील शेंकडों माणसांची मुक्तता झाली. तोच आनंद स्वतंत्रतेचा खरा आनंद होता. मुक्त झालेले लोक पुनः आपल्या आपल्या जातवाल्यांना धरून पालें घालून स्वतंत्र वस्ती करून राहूं लागले. तेथें त्यांना कोणीं हटकणारें नव्हतें. रोज कुणाला सलाम करायचा नव्हता. कुणापुढें दहादां तोंड वेंगाडून साध्यासुध्या जीव-नाच्या गरजा भागवायच्या नव्हत्या. अट्टल गुन्हेगार अजूनही तारेंत खितपत असले तरी शेंकडों असहाय माणसें मुक्ततेच्या आनंदानें जिवंतशीं झालीं होतीं. त्यांतच गेन्या आणि चांगुणाही. त्या आनंदांतच आनंद मानणारा आबा आपल्या आईबापांच्या नव्या झोपडींत राहूं लागला.

आबा नोकरीला जाई. संध्याकाळीं घरीं येई. सभोंवतीं नजर टाकी. मुक्ततेच्या आनंदानें फुललेली ती वस्ती कशाचाही विचार करीत नव्हती. आतां मुलांना शाळेंत सक्तीनें कोण नेईल ? कोणी नाहीं ! म्हणूनच वस्तींतील लोकांना आनंद होत होता ! आतां भीक मागितली तर कोण बंदी करणार ? या कल्पनेतच त्यांना सुख वाटत होतें ! आणि एकादें दुसरें चुकलें जनावर आणून परस्पर पैसा केला तरी कोण विचारणार ? अशा धाडसानें ते फुलत होते ! आणि पुन: त्याच कर्दमाकडे हौशीनें धांवण्याचा संकल्प करीत होते. दुसऱ्या कशाची हौस वाटणारीं मनें पंचवीस वर्षांत तेंथे तयार झाली नव्हती—करतां आली नव्हती.

आबाला वेदना होत होत्या. तो नोकरीला जाई आणि त्याचे वस्तीवरील लोकही कामाला जात. ना ताडी ना माडी. पैसा दारूंत उडत नव्हता. पण महागाई फार. पैसा पुरतही नव्हता. आणि मग रयतेंतील ज्या संभावितांना दारू प्यायची असे आणि कायद्याची ज्यांना भीति वाटे, ते रयतेतील लोक, या गरिबांना, या चोरांना, दारू गाळायला लावीत आणि त्यांच्या चोऱ्यांचा थोडका मोबदला देऊन त्यांच्या चोऱ्या पचवीत. तोच क्रम ! कितीक वर्षांचा ! आबा सगळें पहात होता. ऐकत होता. त्याला त्या सभ्य, संभावित, प्रामाणिक लोकांची शिसारी बसली होती. आणि त्याच्या दूषित दृष्टीनें प्रामाणिक नि अप्रामाणिक रयत लोकांना सारखेंच चोर ठरविलें होतें. या सभ्य लोकांची सभ्यता राखण्यासाठीं चोरजाती पापांनीं हात बरबटीत, तेव्हां आबाला ओरडून सांगावेसें वाटे, 'पहा कोण बदमाष आहेत ते.' पण त्याची ओरड कुणी ऐकली नसती; कारण तो सभ्य धंदा होता ! त्यांत बुडणारा आणि बुडवणारा आंधळे, मुके आणि बहिरे होते.

कधीं नव्हे इतकी आपुलकी त्या चोर-जातीबद्दल आबाला वाटत होती. आणि तो नोकरी करीत असतां त्याचे विचार चालत, 'मीं काय केलं म्हणजे हे लोक सुधारतील ?'

आबाला तीं सारी भीत. आबाच्या देखत वाईटसाईट बोलायला भीत. वाईट वागायलाही भीत. त्या वस्तींत एकही घर असें नव्हतें, कीं जें आबाच्या उपकाराखालीं दबलें नव्हतें. त्यांचे घाव त्यानें सोसले होते. आणि त्यांच्यावर होणारे आघात त्यानें सोसले होते. पण महागाई वाढत होती.

काबाडकष्टांनीं मिळणारें उत्पन्न पुरत नव्हतें आणि ते लोक आबाकडे पहात विचार करीत. ‘ हा देव माणूस आहे. पण याचं ऐकून पोट भरत नाहीं.’ रस्ते केले नि घरें झालीं, माणसें शिकलीं, स्वच्छ राहूं लागलीं. देखली शोभा वाढली होती. पण मनाची शोभा जाऊं लागली. रिकामीं आंतडीं नाहीं नाहीं ते विचार मनांत आणीत. ते दादा किती स्वच्छ, किती पवित्र, किती स्वार्थहीन होते. तसाच आबाही. पण आबाला प्रपंच नव्हता. बाकीच्यांना प्रपंच होता. मिळणारें उत्पन्न एका माणसाला पोसणारें. बाकी लहान पोरांना काय घालायचें ? रुपया शेराची धारण. भिवा गारुडी चिडून म्हणाला, “ ही बुवागिरी आमच्या कामाला येत न्हाई. चोरीचा धरम लई वंगाळ पन चांगल्या धरमानं प्वाटं भरतात काय ? लई खरं खरं बोललं अन् सावासारखं वागलं आपुन समद्यांनीं, तरी जग तर तसं वागत न्हाई ना ! दुकानांत ग्येलों अन् जवार आनली, तर ती अर्धा सेर बी पदरांत पडत न्हाई. दुकानदार ख्वाटं कराया लागलं तर त्ये चालतं; मंग हामीच कशापायीं हामचा धरम सोडायाचा ? कुनी तरी कुनाला गिळाया बसलंच हाई. मंग हामी का उपास काढायाचे ? हामी बी का न्हाई गिळायाचं ? ”

भिवा बोलला. त्याला साथ कुणी केली नाहीं. आबानें सगळ्यांकडे पाहिलें. समाधानाचा श्वास टाकला. भिवाच्या पुढें हात जोडून तो म्हणाला, “ इतकी शोभा कमावलीत, आतां काळं फासू नका. त्या शोभेचे धनी तुम्हीच आहां. तुम्हीच रस्ते केले. पोरं शाळेला पाठवायला लागलां. मन आणि देह पवित्र केले. आतां पुनः तो चिखल नको. ज्या देवानं हें केलं तो पुनः आपला पाठिराखा होईल.” सगळ्यांनीं माना हलवल्या. भिवा लाजला. गप्प बसला.

आणखी कांहीं दिवस गेले. महागाई वाढतच होती. गिरणीला पुरेसा कापूस नाहीं म्हणून कामगार काढले. एक हजार बेकार झाले. ते धूळ तोंडांत भरीत डोकीं आपटूं लागले. पण कुणाला कींव आली नाहीं. गांवांतील रस्त्याचीं कामें संपलीं. माणसें काढलीं. त्यांनीं डोळे पांढरे केले. त्या बेकारीच्या ज्वाळांत वस्तीवरीलही कितीक होरपळत होते. मग पुनः कित्येकांचा भिकेचा धंदा सुरू झाला. कितीक बारीकसारीक हाताळपणा करूं लागले. आबा सगळें पहात होता. त्याच्या मनाला जबरदस्त वेदना

होऊं लागल्या. तो आपले सारे पैसे निराशेच्या धुंदींत देऊन टाकूं लागला. आईबाप तळतळूं लागले. तेही भीक मागूं लागले पण आबाला सर्वांचीच रुखरुख वाटत होती. आणि त्या रात्रीं पुनः दहा जण जमले! तेव्हां भिवा म्हणाला, "आज दरवडा घालूं. गाई-म्हशींचं खिल्लार आहे नानूशेटाकडं." सगळे 'होय' म्हणायचे थांबले ते आबाच्या नजरेखालीं. पण ते 'नको' म्हणाले नाहींत! त्यांनीं भिवाला खोडून काढलें नाहीं.

आबाच्या अंतःकरणांत चर्रर्र झालें. त्याला वाटलें होतें, स्वराज्य आलें, आतां शीणभाग संपला. त्याला वाटलें, कॉंग्रेसचें राज्य आलें, पोटाची अबदा टळली. आतां माया, सहानुभूतीचें राज्य आलें. आणि हें काय? प्रत्येक वस्तू महाग, बेकारीचा नंगा नाच. रयतेंतही! आणि तो मागासलेल्या जातींवरील अधिकाऱ्यांकडे गेला. गिरणीवाल्यांकडे गेला. म्युनिसिपालिटीच्या प्रेसिडेंटकडे गेला. दादांच्या सांवलींत तो सर्वांना भेटला आणि सगळे हंसले. कुणी वावगें बोललें नाहीं. त्याला सहानुभूतीचा लोंढा आल्यासारखें वाटलें. पण ते तरी बिचारे काय करणार?

तेही पटावरील प्याद्यांप्रमाणें वावरत होते. आबा ज्यांना ज्यांना भेटला ते सारे एका चक्रव्यूहांत सांपडले होते. त्यांच्यापैकीं कित्येकांना 'कांहीं तरी' करून दाखविण्याची उत्कट इच्छा होती. त्यांच्या अंतःकरणांत सहानुभूति होती. माणुसकी होती. पण 'कांहीं तरी' कसें करावें याचा उलगडा त्यांना होत नव्हता. तेही भांबावलेले असत. ते ज्या उच्चपदावर बसले होते, तेथून गरजवंत, गरीब, पोटार्थी निराळी अपेक्षा करीत होते. आणि गरजवंत नसणारे अगदीं उरफाटी अपेक्षा करीत होते.

बेकारी नसावी, हें प्रेसिडेंटला, मोठमोठ्या अधिकाऱ्यांना, मोठमोठ्या मंत्र्यांना का कळत नव्हतें? त्यांची तर प्रामाणिक इच्छा होती कीं, भारतात काम करणाराला पोटाला मिळालेंच पाहिजे. पण काम देणारे ते नव्हते. काम देणारे त्यांच्या हातांत नव्हते; काम देणारांच्या हातांत ते सांपडलेले होते.

गरीबगुरीब ओरडून सांगत, 'आम्ही लाखोंनीं तुरुंग भरले, हाल काढले आणि म्हणून स्वराज्य मिळालें.' मोठमोठे अधिकारी सांगत 'होय. मान्य आहे.' आणि इकडे धनिक उद्योगपति नुसत्या नजरेनें वचक दाखवून सांगत,

' आमचा पाठिंबा नसता तर कांहींही झालें नसतें.' आणि त्यांच्याही नजरे-खालीं हे अधिकारी चेपले जात. मंत्री चेपले जात.

मंत्र्यांनीं निश्चय केला असता, तरी मथुरादासासारख्या गिरणी-मालकाला नाखूष करणें त्यांना जमलें नसतें; कारण त्या सर्वांची प्रामाणिक समजूत होती कीं या धनिकांच्या पाठिंब्यानेच स्वराज्य मिळालें आणि त्यांच्यामुळेंच तें टिकणार. इकडे बेकार ओरडत, गरीबगुरीब ओरडत, तेंही अंतःकरणांतील सहानुभूतीमुळें ऐकवत नसे. मग उद्योगपतींना ते मधून मधून डिंवचीत. पण त्याचें स्वरूप लाडांत डिंवचण्याइतकें अगर लाचारीनें डिंवचण्याचें नाटक करण्याइतकें मृदु असे.

गिरणीमालकांनीं, उद्योगपतींनीं ओढवून आणलेली बेकारी नाहींशी करण्याचे मार्ग दिसत असूनही ते अवलंबण्याचें धैर्य कुणालाही होत नव्हतें. मग गरजवंतांच्या ओरड्याला ते 'सबूर' 'सबूर' म्हणून शांत करूं बघत. 'एका दिवसांत बेकारी कुणाला कशी नाहींशी करतां येईल ?' म्हणून दरडावून ते विचारीत. लाचारी स्वीकारून उद्योगपतींना वठणीवर आणण्याचें काम एका दिवसांत नव्हे, तर केव्हांच शक्य होणार नाहीं, हें त्यांना उमगत नसे. आणि इच्छाही नव्हती उमगून घेण्याची.

त्यांना पुनः सत्ता मिळवायची झाल्यास याच उद्योगपतींच्या पाठिंब्यानें ती मिळणार होती. त्यांना धुडकावून दिल्यास आपल्या हातीं असणाऱ्या सत्तेचा बुडबुडा केव्हांच फुटेल ही त्यांची खात्री होती. आणि सारे अधि-कारी, सत्ताधीश, प्यादीं होऊन वावरत होते. आपल्या हातीं असणाऱ्या सत्तेनें गरिबांचें कल्याण करूं, अशा भ्रमांत वावरत होते.

मग ते सारे, दुःखी बेकारांच्या मागण्या ऐकून सहानुभूतीनें हंसत, ऐकत, प्रेमळपणें हंसत नि स्वस्थ बसत. ते ज्या चक्रव्यूहांत गिरागिरत होते, त्यांतून बाहेर पडलेल्या लोकांना ते हिणवीत, पण उद्योगपतींच्या पदराला धरून. त्या उद्योगपतींच्यामुळें चक्रव्यूहाबाहेरच्या लोकांना कधींही सत्ता मिळणार नाहीं, सत्ता मिळाली तर ती आपल्यालाच मिळेल असें त्यांना वाटे. उद्योगपतीच सत्ताधीश झाल्यावर गरिबांचें कांहींच साधणार नाहीं. त्यापेक्षां थोडी सत्ता आपल्याकडे आली तर आपण गरिबांचें हित निश्चित साधूं असें त्यांना वाटे.

चक्रव्यूहांतून मुक्त झालेले लोक निस्पृहपणे, निर्भयपणें बोलत. गरीब-गुरिबांना, नागरिकांना 'जागे व्हा, जागे रहा' म्हणून आवर्जून सांगत. तेव्हां गरीबगुरिबांच्या अगर नागरिकांच्या कल्याणापेक्षांही या मुक्त लोकांना दडपून टाकण्यांत सत्ताधीश शक्तिसर्वस्व खर्च करीत, उद्योगपतींच्या आश्रयाला अधिकाधिक बिलगत. आणि सामान्य माणसें त्या ओढगस्तांकडे खोट्या आशेनें बघत रहात.

● ● ●

## ६४

त्याच समाधानानें आबा घरी आला.

तो समाधानाने घरीं आला. वाट पहात राहिला. धीर धरायला सागून त्यानें वडीलधाऱ्यांना थाबवलें. दिवस गेले. महिने गेले. कांहीं झालें नाही. आश्वासनाचे शब्द वाऱ्यावर विरले. हसूं नाहींसें झालें. ती ओळख, तो परिचय बुझला. आणि रिकामीं पोटे तटतटूं लागलीं. आबाला टाळूं लागलीं. टाळून टाळून जमणारांत एकाचे अनेक झाले. ठेंच लागून बोटें बधिर होतात. त्यांना पुनः मार कळेनासा होतो. पहारीनें खणून खणून नाजुक हातांना घट्टे पडतात आणि मग कातडी दुखावत नाहीं. दुःखें सोसून सोसून मने मरतात आणि मग दुःखेंच संवयींचीं होतात. साऱ्या वस्तीचें तसें झालें होतें कीं नाहीं कोण जाणें, पण आबाचें तसें झालें नव्हते. इतक्या आपदा बघून–सोसूनही त्याचें मन बथ्थड झालें नव्हते. न कळत्या वयापासून तारुण्यापर्यंत उत्तमोत्तम लोकांचें सान्निध्य, त्यांच्या विचारांनीं त्याच्या मनाची केलेली घडण, त्याला दगडासारखा बथ्थड होऊं देईना. हवा लागतांच फॉस्फरस जळत रहावा तसा तो जळतच होता. अजून त्याला थंड ठेवणारें जीवन त्याला आटोक्याबाहेरचें दिसत होतें. नोकरीमुळें झालेला आनंद आणि त्याच मूठभर पैशानें उत्पन्न झालेलीं वादळें–त्याला या सगळ्याचें स्वरूप कांहीं निराळेंच दिसूं लागलें. नामीचा निर्लज्जपणा, संतूचे डावपेंच, भावंडांचें मरण, आईबापाचें अस्थि-पंजर हें सारें, सारें दारिद्र्याच्या पोटींच.

पुनः तो अधिकाऱ्यांकडे गेला. तळतळून म्हणाला, " आज वीस पंचवीस वर्षे चोर-वस्ती कायद्याच्या बंधनात ठेवूनही सरकारनें तें दारिद्य कां घालवलें नाहीं ? नादान स्वार्थी अधिकारी दारिद्र्यालाही दळून स्वतःच्या पोळीवर तूप ओढीत असतां त्यांना अधिकारावर कां ठेवलें ? आम्ही चोर ना ? कां चोरी करतों ? आम्ही अडाणी कां ? तुमच्या ताब्यांत आमचीं जीवितें असतां, कां अडाणी ठेवलें तुम्ही आम्हांला ? वीस वर्षांत इतर कारणांनीं पाठी सडकल्या, तुरुंग दाखवले, अर्धपोटीं ठेवलें, त्याऐवजीं शिकण्यासाठीं सर्वांच्या पाठी कां नाहीं सडकल्या ? शिकण्यासाठीं तुरुंगांत कां नाहीं टाकलं ? पोरांची ताटातूट करून त्यांना आईबापं कायमचीं वर्ज्य केलीं असतींत, तर दुःखानें आईबापांचा एकदाच निकाल लागला असता. हीं नव्या नव्या पिढीचीं आईबापं पुनः पुनः तींच दुःखं भोगायला ठेवलीं कशाला ? वीस पंचवीस वर्षे अधिकारी म्हणून फुकटखाऊ लोक पोसले सरकारनें. त्याऐवजीं एवढा पैसा कठोर आणि प्रामाणिक प्रयत्नांना खर्च झाला असता, तर आज सारी चोरवस्ती रयतेसारखी झाली असती. साऱ्या अधिकाऱ्यांच्या आणि लवाजम्याच्या खर्चांत सारीं आईबापं शिक्षित झालीं असतीं. सरकारी प्रचंड कारखाना निघून तेथें साऱ्या चोरवस्तीच्या पोटाची कायम सोय लागली असती. वीस आणि पंचवीस वर्षे चोर वस्तीच्या अधिकाराचं भूषण सरकारनें मिरवलं. रयतेच्या डोळ्यांत धूळ फेकली कीं आम्ही तुम्हांला चोरांपासून बचावतों म्हणून—आणि पुनः कंगाल, अर्धपोटीं, अडाणी स्थितींत चोर-वस्तीला वाऱ्यावर सोडून, रयतेची हानि आणि चोर-वस्तीची अधोगति साधलीत. पुनः ते चोर म्हणून हिंडणार. आणखी चोऱ्या करणार. आणखी हीनतेंत पिचणार आणि पुनः चोरी हा धर्म वाटणार त्यांना !

तुम्हांला रयतेला बचावायचें आहे ना ? चोरांना चोरीपासून फिरवायचं आहे ना माघारं ? मग त्यांच्यापैकीं प्रत्येकाला प्रामाणिक कष्ट करायला वाव द्या. प्रामाणिक कष्ट करणारांना भरपेट जगतां येईल इतका दाम द्या. आणि त्यांना दिसूं द्या कीं साव म्हणून वावरणारे, प्रतिष्ठा मिरवणारे त्यांच्याहून भयंकर चोऱ्या करीत नाहींत. तुम्ही मायबाप सरकार ना ?

पण तो अधिकारी तरी काय करणार ? त्याला अधिकार असला तरी तोही कुणाच्या तरी मर्जीनेंच राहणार होता. पूर्वी गोऱ्या राज्यांत कुणाविरुद्ध बोलावें म्हणजे बढती मिळेल, याचा त्यानें अभ्यास केला होता. स्वराज्यांत कुणाची खुशामत करावी व कुणाविरुद्ध बोलावें म्हणजे आपलें आसन स्थिर राहील, याचाही तो अभ्यास करीत होता.

त्याच्या डोळ्यापुढलें विश्व म्हणजे त्याचें घर, त्याची बायको आणि मुलें. त्यांच्या पोटासाठीं तो खपत होता. ५०० रुपये तो मिळवीत असला, तरी नोकरीची लाचारी सामान्य माणसाइतकीच त्यालाही करावी लागत होती.

गरिबांनी रिकाम्या पोटासाठीं केलेलें आक्रंदन नि वाद हीं ' समाज-सत्तावाद ' या एका शत्रुपक्षांत घालणें, हे त्या अधिकाऱ्याला सोपें व सोईचें होतें. त्यालाही याहून कीस काढणे, भले बुरें पहाणें, खरें-खोटें निवडणें सोईचें नव्हतें.

आबाचा सारा त्वेष अस्थानीं आहे, असें वाटून घेण्याचा तो अधिकारी सराव करीत होता. पण प्रजेशीं सभ्यपणे व अदबीनें वागण्याच्या वरून आलेल्या हुकुमाप्रमाणें तो सभ्यपणें वागत होता. सभ्यपणें अबोल बनला होता. स्वतःच्या मनाला ' आबाच चुकतो आहे ' असें म्हणण्याचा सराव लावीत होता. आणि आतां आबाला मूर्ख म्हणून शिव्या देत होता.

" पुनः बोलूं आपण. तुम्ही शांत होऊन बोलायला या." असा पोक्त सल्ला त्यानें आबाला दिला आणि आबा न पावलेल्या त्या मातीच्या देवाकडे तिरस्कारानें पाहूं लागला.

" महाराज, ही शांतपणें बोलायची आणि पाह्यची वेळ आहे का ? आजपर्यंत मी ओरडून चुचकारून माझ्या लोकांना ' चोरीपासून दूर रहा ' म्हणून सागितलं. पण मीं त्यांना पोटभर अन्न दिलं नाहीं. ते आतां चोरी करतील, तर त्यांना ' नको ' म्हणून कोणच्या तोंडानं सांगूं ? "

" हें पहा गायकवाड, तुम्ही सध्यां सोशॅलिझम्‌च्या नाहीं तर कम्युनिझम्‌च्या तावडींत सांपडलेले दिसतां. "

" सोशॅलिझम् ? कम्युनिझम् ? म्हणजे काय ? मला त्यांतलं कांहीं कळत नाहीं, महाराज. मला हीं मोठमोठीं राजकारणांतलीं माणसं काय म्हणतात,

हें कळत नाहीं. माझं रिकामं पोट काय म्हणतं, एवढंच मला कळंत. माझ्या भोंवतालच्या लोकांची रिकामीं आंतडीं कशीं कालवतात, हें मला कळत. त्यांचे अश्रू न पुसतां जागच्या जागीं आटवले तर घाणेरडे विचार कसे पोसले जातात हें मला कळतं. यालाच का कम्युनिझम् म्हणतां तुम्ही ? दुर्दैव माझं. माझ्या रिकाम्या पोटाच्या आचाराना आणि विचारांना कम्यु-निझम्चा शिक्का मारून तुम्ही तिकडं दुर्लक्ष करणार ? ''

आबा निघून गेला. तो खिन्न झाला होता. वस्तींतील लोकांनीं दरवडा घालायचे ठरवलें तेव्हां तो अधिक खिन्न झाला. आबापासून लपवून ठेवूनहि तें आबाला कळलें. तो त्यांच्या म्होरक्याकडे गेला.

'' शिवा, आपण आजवर देवाला आळवलं. देवानं आपलीं मनं शुद्ध टेवलीं. आपला चोरीचा कलंक आतां जाणार. इतक्या वर्षांचीं तपं फुकट घालवूं नका. मी चोरी करूं देणार नाहीं तुम्हाला. तुरुंगांत जाऊं देणार नाहीं.'' कुणी कांहीं बोललें नाहीं. पण त्या स्तब्धतेंतून जणु सूर उठत होते,

'' आबा, खरं आहे. पण भूक लागली की सुचत नाहीं. उपाशीं पोरं रडायला लागलीं कीं सुचत नाही. या बेकारीनं अन् महागाईनं मारायला काढलीं आहेत गरीबगुरिबं. ''

आबा म्हणाला, '' शिवादादा, आपण मरूं या. पण चोरी करायची नाहीं. आपण मरूं म्हणजे सरकार आणि आपल्याला पिळणारे लोक जागे होतील आपल्या मढ्याकडे पाहून. त्यांना पाझर फुटेल. आपली पिढी मरेल पण पुढली पिढी जगेल. आपण चोरी करायची नाहीं. सगळ्यांना ओरडून सांगून भुकं मरायचं. मी तुम्हांला चोरी करूं देणार नाहीं. तुरुगांत जाऊं देणार नाहीं.''

आणि ती गरिबगुरीब भुकेलीं अंतःकरणें मुकेपणानें ओरडत होतीं,

'' अरे मूर्खा ! तुरुगांत जाऊं देणार नाहीं ? तुरुंग कशासाठीं असतात माहीत आहे का ? वाईट विचाराचे लोक चिरडून टाकण्यासाठीं त्यांना तुरुंगांत टाकतात. अन् चांगल्या लोकांनाहि चिरडून टाकण्यासाठीं त्यांना तुरुंगांत टाकतात. आपण चांगले म्हणून तुरुंगांत जाऊं. चागले अन् वाईट हें ठरवणारें कोण ? बाहेर बऱ्यावाईटाची छपणूक करण्याचं ज्यांना साधलं आहे ते सत्ताधीश.''

इकडे आबा बोलत होता. "तुम्ही दरवडा घातलात तर मी तुमचीं नांवं सरकारला सांगेन." आणि त्या सर्वांना वाटलें, आबाचा जीव घ्यावा. पण ते बोलले नाहींत.

त्यांनीं सांगितलें, "आम्हीं तुझ्यासाठीं दरोड्याचा विचार सोडला."

आबाला आनंदाचें भरतें आलें. आबा शांत चित्तानें झोपला. त्याच्या सात्त्विकतेचा जय झाला होता. रात्र दाटत होती. रिकामीं पोटें पस्तावलीं. पोरें रडूं लागलीं, बायका कावूं लागल्या आणि तीं माणसें पुनः जमलीं. चिडलीं. आपल्या मार्गांतील सात्त्विकतेची धोंड त्यांना असह्य झाली. भिवा-दादा उठला. "आम्ही मरूं काय म्हून? कोण सावपणानं जगतं आहे? आबा येडा आहे."

त्यानें मोठा थोरला दगड आबाच्या डोक्यांत टाकला. "आतां हा नांवं सांगणार न्हाई आपलीं. या भल्या मानसाला सुखान मरूं दे." त्यांना वाईट वाटलें. पण ते माघारी फिरले नाहींत. त्यांनीं त्या सात्त्विकतेकडे पाहिलंही नाहीं. ते सारे अमानुष जगांतील सात्त्विकतेचा मुडदा पाडून दरवडा घालायला निघून गेले. जगण्याच्या प्रयत्नासाठीं धडपडत गेले. अमानुष जगांत जगायला उपयोगी पडणारीं हत्यारें परजीत गेले.

अमानुषता विचकटपणें खिदळूं लागली. आबाच्या शवाकडे पहातां पहातां अनेक हुतात्म्यांच्या आठवणी काढीत सात्त्विकता खिन्न झाली. सत्ता आणि मत्ता न्यायाचे आणि सात्त्विकतेचे बुरखे घेऊन त्या 'गुन्हेगारांना' पकडण्या-साठीं कायद्याचे पाश, फांस आणि सूळ उभे करण्याच्या तयारींत गुंग झाली.

